

## प्रभाकर पाध्ये ह्यांचें साहित्य

आजकालचा महाराष्ट्र (सहकार्यांनें)

प्रकाशांतील व्यक्ति

पाकिस्तान कीं पन्नास टक्के ?

कलेचीं क्षितिजें

व्याधाची चांदणी

कृष्णकमळीची वेल

अर्धवर्तुळें

तीन तपस्वी

समाजवादाचें नवदर्शन

Yugoslavia : Land of New Horizons

नवें जग : नवीं क्षितिजें



"हा मूळ पुतळा. याच्या प्रतिकृति
युगोस्लाव्हिआंत सर्वत्र आढळतात." —पृ. ५२

रोमच्या रस्त्यावर
जीवनाला भर
आला होता."
—पृ. १४









" शेक्सपिअर मेमोरिअल थिएटर याच नदीच्या विमल प्रवाहांत आपलें भव्य प्रतिबिंब खेळवीत उभें आहे."
—पृ. १३६

" राष्ट्रसंघाच्या निरनिराळ्या सभासदांच्या सहकार्यानें ही लेजंग इमारत उठली."
—पृ. १०३

" एक अनपेक्षित दृश्य दिसलें." —पृ. १०१

" पिकॅडली सर्कसमधला इरॉसचा कलामय पुतळा ..."
—पृ. १२७

" आणि एकदम मुंबईचा मरीन ड्राईव्ह समोर उघडला." —पृ. १६३







" माझ्यापुढें आकाशभेदी इमारती उभ्या होत्या. " — पृ. १५९

इटलींतील दृश्यांची छायाचित्रें
'ई. एन्. आय. टी.'च्या कृपेनें.

# नवें जग : नवीं क्षितिजें

## : १ :

ऑक्टोबरमध्यें मी युरोपला जायला निघालों तेव्हां अनेक मित्रांनीं मला आश्चर्यानें विचारलें, " अहो, युरोपच्या प्रवासाला ही कोणती वेळ तुम्हीं शोधून काढली ! "

कारण युरोपला जायचें म्हणजे वसंतांत अगर उन्हाळ्यांत. युरोपच्या निसर्गाला तेव्हांच भर आलेला असतो.

Oh, to be in England !
Now that April's there

असें मुळीं रॉबर्ट ब्रौनिंगनें म्हणूनच ठेवलें आहे, आणि मी तर हिंवाळ्याचें स्वागत करायला निघालों होतों. आचार्य अत्रे ह्यांनीं मला लंडनला कांहींही करून जाण्याचा सल्ला दिला, पण त्याच वेळीं हार्डीची एक कविता म्हणून दाखवून, नोव्हेंबरमध्यें इंग्लंडांत धुक्याखेरीज कांहींच दिसत नाहीं असें सानुभव सांगितलें होतें.

पण beggars cannot be choosers ! मला ऑक्टोबरमध्येंच जाणे भाग होते. आणि मी पानगळीच्या अखेरी अखेरीला जात असल्यानें उघडीं बोडकीं, करपलेलीं, पर्णहीन झाडे पाहाण्याची तयारी ठेवली होती.

पण, वृक्षांचे जें सौदर्य हिंदुस्थानांत कधीं पाहायला मिळतच नाहीं तें मला पाहायला मिळाले. मी ऑक्टोबर-नोव्हेंबरांत आलों हा एक भाग्यरेखेचा विलासच ठरला.

*　　　*　　　*

मी त्रिएस्तच्या विमानतळावरून त्रिएस्त शहराकडे निघालो होतों. मी एकटाच उतारू असल्यानें ॲव्हिओनीच्या टूरिंग गाडींतूनच चाललों होतों.

मी हा प्रवास जन्मांत विसरूं शकणार नाहीं. हा प्रदेश खडकाळच आहे. पण रस्ता कॉंक्रिटचा आरस्पानी आहे, आणि त्याच्या उजव्या बाजूला समुद्र आणि डाव्या बाजूला डोंगर कित्येक मैल आहे.

पाहिलें तों डोंगर फुललेला! जणूं कोणीं पिवळ्या-लाल फुलांच्या राशीच्या राशी ह्या खडकावर उधळून दिल्या आहेत. माझ्या हिंदु मनाला अर्थात् शिवलिंगावरील पूजेची आठवण झाली. शंकर हें हिमालयाचेंच प्रतीक मानलेले नाहीं काय?

हिंवाळ्यांत युरोपांत कांहीं विशिष्ट फुलें फुलतात हें मला ऐकून माहीत होतें, पण तीं अशीं रानोमाळ फुलत असतील आणि खडकाळ प्रदेशांत फुलत असतील हें मनाला पटेना. हीं कसलीं फुलें हें कोणाला विचारतांही येईना. मोटारींत मी आणि ड्रायव्हर ह्यांखेरीज दुसरा कोणी प्राणी नव्हता आणि ड्रायव्हरला इंग्रजीचा एक शब्द कळत असेल तर शपथ! फुलांची ही उधळण निर्भर नेत्रांनीं पाहण्यापलीकडे मी दुसरें कांहीं करूं शकत नव्हतों.

दुपारीं त्रिएस्त स्टेशनवरील अमेरिकन आर. टी. ओ.मधील अधिकाऱ्यानें सांगितलें कीं हीं फुलें नसून पानें आहेत आणि ह्या ऋतूंत तीं असलाच मदीर-सुंदर रंग धारण करतात. हिंवाळा आला कीं युरोपांतलीं झाडें सारीच्या सारीं पिवळीं किंवा लाल होतात. त्यांची ही पानगळीची पूर्वतयारी. झाडांचीं पानें जगाचा निरोप घेण्यापूर्वी जणुं संन्यास घेत असतात! आपल्याकडच्या प्रमाणें झाडाचें एकेक पान पिकलें, गळलें असें तिकडे होत नाहीं. झाडाचीं बहुतेक सर्व पानें पिकतात आणि पिकलेल्या अवस्थेंत कांहीं काल झाडावर राहातात. तेवढ्या अवधींत झाडावर सुवर्णाची अगर कुंकुमाची शोभा पसरते.

जिनीव्हांत मला लोकांनीं सांगितलें कीं, पानगळीच्या हंगामांतली ही शोभा पाहण्यासाठीं दूरदूरचे प्रवासी मुद्दाम स्वित्झर्लंडमध्यें येतात. निसर्गसौंदर्याच्या ह्या आगळ्या उल्हासांतही स्वित्झर्लंडचें पाऊल पुढेंच!

पण त्रिएस्तभोंवतालच्या ह्या प्रदेशांतलें हें संन्यस्त 'पुष्पां'चें सौंदर्य वेगळेंच होतें. ह्या खडकाळ प्रदेशांत द्राक्षांच्या बागा खूप आहेत. द्राक्षवेलीचीं पानें लाल लाल बनतात आणि त्यांच्यावर रंगरेषांचे तरंग उठतात. द्राक्षांच्या पिकलेल्या पानांचें सौंदर्यही त्यामुळें मदीर वाटतें! मस्त वाटतें!

मी ह्या हंगामांत युरोपला आलों म्हणून मला हें अनपेक्षित सौंदर्य अनुभवायला मिळालें. हौशी प्रवासी युरोपचें वसंत-सौंदर्य अनुभवतात तसें कांहींसें सौंदर्य आपल्या देशांतही उसळतें. पण हें पानगळीचें असामान्य सौंदर्य मी ह्या हंगामांत गेल्यामुळेंच पाहायला मिळालें. म्हणून मीं मनांत म्हटलें,

" माझं भाग्य विशेषच नाहीं का ! "

★ ★ ★

पुढें मी नोव्हेंबर महिन्यांतच लंडनला गेलों. तेथे दोन आठवडे होतों. पण ज्या धुक्याची भीति मला अन्यांनीं घातली होती तें कांहीं त्या दरम्यान अवतरलें नाहीं.

हें तरी एक भाग्यच नव्हे काय ?

पण माझे हे भाग्य युगोस्लाव्हिआंत मला पदोपदीं प्रत्ययास आलें.

टिटोच्या भेटीचेच उदाहरण घ्या. मी युगोस्लाव्हिआला निघालों तेव्हां टिटोची भेट घेण्याचा विचार माझ्या मनाला स्पर्श करून गेला होता. पण तें किती अशक्य आहे, हेंही मला लगेच जाणवलें होतें. एका कम्युनिस्ट राष्ट्राचा सर्वाधिकारी ह्या दृष्टीनें स्टॅलिनच्या जीवनाच्या दर्पणांतच टिटोचें प्रतिबिंब मी पाहत होतों आणि स्टॅलिनची भेट किती दुर्मिळ होती हें मला माहीत होतें.

पण झाग्रेबला मी ज्या हॉटेल एस्प्लेनाडमध्यें राहात होतों त्याच हॉटेलांत एरिक् जॉन्सन नांवाचे एक स्वीडिश पत्रकार उतरले होते. त्यांनीं मला आशा दाखविली.

ते स्वतः मार्शल टिटोची भेट घेऊन आले होते. सुप्रसिद्ध ब्रिटिश पत्रकार आणि लेखक मि. कॉनी झिलियाकुस हे टिटोचे मित्र आहेत. त्यांच्यामुळेंच एरिक् जॉन्सनची टिटोशीं मुलाखत झाली होती. जॉन्सननीं मला मुलाखत मिळवून देण्याची खटपट करण्याबद्दल झिलियाकुसना पत्र दिलें.

बेलग्रेडला गेल्याबरोबर मीं झिलियाकुसना फोन केला. लगेच त्यांनीं मला सायंकाळीं जेवणाचें निमंत्रण दिलें. मी मनांत आनंदलों. जो गृहस्थ लगेच जेवणाचें निमंत्रण देतो तो पुढची खटपट करीलच.

मी जेवायला गेलों. झिलियाकुसना पत्र दिलें. त्यांनीं सांगितलें, " मार्शलची भेट होणें जवळ जवळ अशक्य आहे. ते फार कामांत असतात. त्यांना असल्या गोष्टींना फुरसत असते कुठें ! "

मी भारतीय असल्यानें मार्शल माझी भेट घेण्यास संमति देतील, असें मीं सुचविलें.

" पण तुम्ही कांहीं त्यांना भेटूं पाहणारे पहिलेच भारतीय नाहीं, " झिलियाकुसनीं स्पष्ट सांगितलें.

माझा हिरमोड माझ्या चेहेऱ्यावर उमटल्यामुळेंच कीं काय, ‘ तरी पण मी प्रयत्न करीन ’ असें आश्वासन झिलियाकुसनीं दिले. पण त्या आश्वासनांत कांहीं राम नव्हता.

झिलियाकुस आणि त्यांच्या सुंदर शालीन पत्नी ह्यांनीं दिलेल्या आतिथ्यशील भोजनांत मीं माझी निराशा विसरण्याचा प्रयत्न केला !

मार्शलना भेटण्याची सारी आशा मीं सोडून दिली.

पण —

भारतांतील युगोस्लाव्हिआचे वकील डॉ. विल्फान ह्यांची, मी गेलों तेव्हां नुकतीच नेमणूक झाली होती. साहजिकच विल्फान-पतिपत्नींना भारतीयांबद्दल उत्सुकता आणि आपुलकी निर्माण झाली होती. त्यांच्या ह्या प्रेमार्द्र वृत्तीचा फायदा मिळणारा मी पहिलाच भारतीय तेथें उपस्थित झालो होतों.

डॉ. जोझे विल्फान आणि श्रीमती मारिआ विल्फान ह्या युगोस्लाव्हियांतील महत्त्वपूर्ण व्यक्ति आहेत. विल्फान हे एकदां युगोस्लाव्ह सरकारचे ॲटर्नी जनरल होते. नंतर ते युनोमध्यें युगोस्लाव्हिआचे कायम प्रतिनिधि होते. त्यानंतर ते युगोस्लाव्ह सरकारचे उप-परराष्ट्रमंत्री होते. आज ते प्रेसिडेंट टिटो ह्यांचे सरचिटणीस आहेत. आणि त्यांच्या पत्नी मारिआ ‘ सोशॉलिस्ट अलायन्स ’च्या परदेशी खात्याच्या कार्यवाह आहेत. त्यावेळीं त्या माहिती-खात्याच्या उपप्रमुख होत्या. मी बेल्ग्रेडमध्यें आलो असे समजल्यावर मारिआंनीं मला दुसऱ्या दिवशीं जेवणाचें आमंत्रण दिलें. त्यावेळीं ह्या महत्त्वपूर्ण जोडप्याच्या भारतविषयक आस्थेचा पुरेपूर अनुभव मला आला. त्यांच्याकडे मीं साडेतीन तास गप्पा मारल्या.

त्यांचा निरोप घेतां घेतां मीं टिटोला भेटण्याची इच्छा बोलून दाखविली. विल्फान म्हणाले, “ खात्री नाहीं, पण प्रयत्न करतों. ”

ह्या उद्गारांत आश्वासन नव्हतें, पण आवाजांत अभिवचन होतें. मी मुलाखतीच्या निरोपाची वाट पाहात राहिलों.

बेल्डग्रेड सोडण्याच्या दोन दिवस अगोदरपर्यंत कसलाही निरोप आला नाहीं. मीं आशा सोडली. इतक्यांत शब्द आला, “ उद्यां सकाळीं अकरा वाजतां. ”

*   *   *

मार्शल टिटोंची भेट घेण्याचा विचार ठीक होता, पण भेट ठरल्यानंतर मात्र मला थोडें 'नर्व्हस'च वाटूं लागलें. त्या दिवशीं सायंकाळीं पत्रकारांच्या क्लबांत मला खाना होता. तेव्हां विल्फान उपस्थित होते. त्यांना मीं म्हटले, "मुलाखतीच्या वेळीं आपण बरोबर येऊं शकाल का?"

विल्फान उत्तरले, "मला त्याच वेळीं एका अमेरिकन पत्रकाराला भेटायचें आहे, नाहीं तर आलों असतों."

मी मारिआ विल्फानकडे वळून म्हटलें, "आपण तरी?"

"छट् छट्, मला त्या भरीस घालूं नका. शिवाय मला ऑफिसांत काम आहे."

"मला त्या भरीस घालूं नका" असें विल्फान कां म्हणाल्या ते मल दुसऱ्या दिवशीं समजलें. विल्फान स्लोव्हेनिअन आहेत आणि मार्शलना भराभर लांब लांब वाक्यांच्या सर्बियनमध्यें बोलण्याची संवय आहे. माझ्याबरोबर दुभाष्या म्हणून यायचें त्यांना थोडें बिकटच वाटत होतें.

पण दुसऱ्या दिवशीं मला टिटोकडे नेण्यास मोटर आली तेव्हां आंत मारिआच होत्या. मार्शल टिटोंचा नेहमींचा दुभाष्या ऐन वेळीं आजारी पडल्यामुळे ती कामगिरी त्यांच्याकडेच आली होती!

* * *

भाग्याची अशीच रेखा युगोस्लाव्हिआविषयींचें सत्य जाणून घेतांना वारंवार उमटली. अनेक गोष्टींचा अचानक पडताळा आला. अनेक व्यक्तींची अगदीं योगायोगाने गांठ पडली.

## : २ :

माझ्या युरोपच्या प्रवासांतील योगायोगाला प्रवासाअगोदरच सुरुवात झाली होती.

सेप्टेंबर १९५१ ची गोष्ट. मद्रासच्या जेमिनी स्टुडिओनें कांहीं पत्रकारांना आपला स्टुडिओ पाहण्यास निमंत्रण दिलें होतें.

एक दिवस जेमिनीचे मुंबईचे प्रतिनिधि श्रीनिवासन् मजकडे आले आणि म्हणाले,

" मीं तुमची एका इंग्लिश हॉटेलमध्यें व्यवस्था केली आहे."

" अस्सं का? छान!" मी उत्तरलों, " एखादे वेळीं ह्या अनुभवाचा उपयोग होईल."

— मी मद्रासहून आलों तेव्हां माझ्या टेबलावर युगोस्लाव्हिआचें निमंत्रण पडलेलें होतें !

श्रीनिवासन्नीं विचारलें होतें, " तुम्ही गाडीनें जाणार कीं विमानानें?"

मी म्हटलें, " अर्थात् विमानानें." –तेव्हांपासून विमानाचा प्रवास जो माझ्या पाठीमागें लागला तो मी नोव्हेंबरच्या १० तारखेस जिनीवाला येईपर्यंत. मध्यंतरीं एकदोनदांच आगगाडींत बसलों असेन.

* * *

विमानाच्या प्रवासाची नवीनता मद्रासच्या प्रवासांतच गेली होती. पण त्या पहिल्या प्रवासाचा अनुभव अद्यापही ताजा आहेसें वाटतें.

सांताक्रूजला विमानांत बसलों. आंत बसून स्थिरस्थावरतों तोंच विमान वर चढलें. विमान मुंबईवरून पलीकडे गेलें. खालच्या इमारती पाहिल्या, कारखाने पाहिले, रस्ते पाहिले, बागा पाहिल्या.

किती क्षुद्र दिसत होत्या त्या !

हें मानवाचें कर्तृत्व ! खालीं पृथ्वी किती विशाल दिसत होती ! तिचे किती तऱ्हतऱ्हचे रंग दिसत होते ! किती वेगवेगळीं दर्शनें होत होतीं ! आणि पृथ्वीच्या कोणत्या तरी एखाद्या कोपऱ्यांत छोटीं छोटीं शहरें – माळावर मध्येंच दगडांची रास असावी तशीं – दिसत होतीं !

हें मानवाचें कर्तृत्व ! आणि त्याचा मानवाला कोण अभिमान ! ह्या कर्तृत्वाच्या जोरावर, साऱ्या पृथ्वीवर प्रभुत्व प्रस्थापित करण्याची आकांक्षा तो बाळगतो !

पण हा विचारच विसंगत होता. मी बसलों होतों तें विमान हीच मानवाच्या बुद्धिवभवाची साक्ष होती, आणि त्या बुद्धिवैभवावर मिरवत मिरवत मानवाच्या कर्तृत्वाला क्षुद्र लेखण्याचा मी प्रयत्न करीत होतों !

असा माझ्या मनांत उलट सुलट विचार चालू होता तोंच आमचें विमान सह्याद्रीच्या श्रेणींवर आलें होतें. खालीं आडव्या उभ्या पसरलेल्या डोंगरांचें मोठें नवीन नवलपूर्ण दर्शन झालें.

सह्याद्रीचे ते डोंगर आणि त्यांच्यावरचीं लहान मोठीं पठारें मला छोट्या छोट्या पडक्या घरांप्रमाणें भासलीं.

दुरून डोंगर साजरे अशी मराठींत म्हण आहे. येथें दुरून म्हणजे जवळून! फार दुरून मला ते पडक्या घरांप्रमाणेंच दिसले!

* * *

दूर क्षितिजावर—म्हणजे अंतराळांतल्या क्षितिजावर—ढग होते आणि ते पर्वतांच्या हिमाच्छादित शिखरांप्रमाणें दिसत होते.

जरा वेळानें आम्ही ढगांच्या वर आलों. ढग आकाशांत तरंगत होते. जणुं त्यांची त्रिशंकूप्रमाणे अवस्था झाली होती!

माझ्या मनांत विचार आला, आजच्या मानवी संस्कृतीची अवस्था ह्या ढगांप्रमाणेंच नाहीं का?—त्रिशंकूप्रमाणे टांगलेली!

जरा वेळानें, आकाशांत विखुरलेले ढग सैनिकांच्या राहुट्यांप्रमाणें दिसूं लागले—आणि वाटलें, मला आजच्या संस्कृतीची आठवण झाली तेंच बरोबर. आज मानवी संस्कृतीला लष्करी तळाची कळा आलेली नाहीं काय?

* * *

विमानांत वर गेलें म्हणजे आपण तत्त्वज्ञानी बनतों हेंच खरें. कवि सुद्धां बनतों. कवि आणि तत्त्वज्ञ ह्यांचीं डोकीं ढगांत असतात असें म्हणतात! आम्ही तर परमेश्वराप्रमाणें ढगांच्याही वर होतों. तेव्हां तत्त्वज्ञ आणि कवि हेही आम्हांला क्षुद्र वाटावे ह्यांत काय नवल!

विमानांत कल्पनाविलासाला चालना मिळावी हें स्वाभाविक आहे. दोघांचाही आकाशाशीं संबंध असतो. मुख्य म्हणजे पृथ्वीवर क्षुद्र प्राण्याप्रमाणें सरपटणें दोघांनाही मान्य नाहीं.

विमानांत तत्त्वज्ञानाचे झटके यावे हेंही स्वाभाविकच. आपण मृत्यूच्या सरहद्दीवर वावरत असतों. पुढच्या क्षणाची शाश्वति नसते. तत्त्वज्ञ वृत्तीच्या निर्मितीला ह्याहून अनुकूल परिस्थिति कोणती?

माझ्या मनांत विचार आला, हे जे ढग दिसतात, ते पृथ्वीचे निःश्वासच नव्हेत काय? वेगानें जाणाऱ्या विमानांतून ते जड दिसत होते.

—पण मग वाटलें, “हे पृथ्वीचे निःश्वास नव्हेत!—आजच्या व्याकुळ मानवतेचे!”

विमानांत मृत्यूच्या विचाराची सारखी सोबत असते. अर्थात्च माझ्या मनांत विचार आला — cloud thou art, to cloud thou returnest!

कालिदास म्हणाला होता —

धूमज्योतिः सलिलमरुतां सन्निपातः क्व मेघः।
सन्देशार्थाः क्व पटुकरणैः प्राणिभिः प्रापणीयाः ॥

पण कालिदास पृथ्वीवरून लिहीत होता. तो विमानांत आला असता तर त्याला पटलें असतें कीं — cloud thou art, to cloud thou returnest!

— खरेंच ढग आणि माणूस ह्यांत कांहीं फरक नाहीं.

ज्या पंचमहाभूतांचा ढग हा एक प्रकार आहे त्याच पंचमहाभूतांनीं हा मानवी देह बनविला आहे!

★ ★ ★

विमानांतून ढगांचे हें आकाशांतलें विश्व दिसतें तसेंच पृथ्वीवर त्यांच्या ज्या निःशरीर सावल्या पडतात त्याही दिसतात.

किंबहुना विमानांतून आकाशापेक्षां पृथ्वीकडेच अधिक लक्ष जातें. वरून — अन्तराळांतून पृथ्वी कशी दिसते हें तर विमानाचें मुख्य कुतूहल!

विमानांतून नद्या अजगराप्रमाणे आडव्यातिडव्या पसरलेल्या दिसतात. अजगराच्या अंगावरची कात चमकते तसें नद्यांचें पाणी सूर्यप्रकाशांत चमकतें. रस्ते पायवाटेप्रमाणें दिसतात. झाडांचीं झुडपे होतात!...

★ ★ ★

युगोस्लाव्हिआला जाण्यासाठीं २० ऑक्टोबर रोजीं मी दुपारीं दोन वाजतां विमानांत बसलों तेव्हां विमानाच्या प्रवासाची नवीनता निघून गेलेली होती —

आणि थोड्याच मिनिटांच्या अवधींत आमचें विमान समुद्रावर आल्यामुळें वर आकाश, भोंवतालीं आकाश आणि खालीं आकाशासारखा दिसणारा समुद्र ह्यांखेरीज कांहींच दिसेनासें होतें. आकाशाच्या अवकाशांत जे असंख्य ग्रह आणि तारे आहेत त्यांतलाच, आपलें विमान म्हणजे एखादा ग्रह, म्हणजे ग्रहबिन्दु, असें वाटलें.

मात्र मुंबई सोडतां सोडतां, झपाट्यानें दूर दूर जाणारा किनारा, किनाऱ्या-वरच्या माडांच्या बागा, मधूनमधून दिसणारा एखादा टुमदार बंगला ह्यांचें

दर्शन होऊन आपण भारतापासून दूर जात असल्याची अस्वस्थ जाणीव मात्र झाली.

थोड्याच वेळांत समुद्रावर एखादे दिसणारें शिडाचे जहाज एवढेच पृथ्वीवरील मानवी संस्कृतीचें चिन्ह उरलें. हीं जहाजे म्हणजे दूर दूर पसरलेल्या सपाट गद्य समुद्रावरचे काव्याचे बिंदु होते. विशाल जड पदार्थांचे तुरळक जीवनबिंदु! तेही कमी कमी होत जाऊन अखेरीस समुद्राच्या जड सपाट पृष्ठाखेरीज कांहींच दिसेनासें झालें.

* * *

मी आर्मस्ट्रॉंगचें ‘टिटो ॲण्ड गोलिआथ’ हें पुस्तक वाचण्यांत गढून गेलो. युगोस्लाव्हिआला जाण्यापूर्वी त्या देशाचें कांहीं ज्ञान मिळाले तर मिळविण्याचा माझा प्रयत्न सुरू होता.

कांहीं वेळानें खिडकींतून बाहेर खालीं पाहिलें तो खालच्या समुद्राचा रंग मातट लाल झाला होता. ‘हा तांबडा समुद्र तर नव्हे?’ असा विचार माझ्या मनांत आला आणि माझें मलाच हसूं आलें. तांबड्या समुद्राचे पाणी लाल नसतें, कधींकधीं कांठावरची लाल वाळू समुद्राच्या पाण्यावर उडून क्वचित् लालपणाचा भास होतो हें मीं ऐकलेलें होते.

मीं ‘होस्टेस’ला विचारलें. तिनें माहिती दिली कीं आम्ही पर्शियाच्या आखातापलीकडे आलेले असून खालीं आरबी वाळवंट आहे!

* * *

जरा वेळानें सूर्य मावळला. नंतर चागला काळोख पडला. खालीं मधून-मधून मोठा जाळ झालेला दिसे. क्वचित् दिवे दिसत. हाच, एवढाच मानवी जीवनाच्या अस्तित्वाचा पुरावा.

थोड्या वेळानें दूर विजेच्या दिव्यांची मालिका दिसली. तो दहरानचा विमानतळ होता. हा विमानतळ म्हणजे अमेरिकनांचा लष्करी तळ असल्यासारखे दिसलें. जिकडे तिकडे अमेरिकन सोजीर दिसले. त्यांच्या बरोबर त्यांची खेळकर, मनमोकळी, स्नेहशील, बेछूट वृत्तिही दिसली.

अमेरिकनांचे वैभवही दिसलें. दहरानचा विमानतळ चांगला समृद्ध आहे. ह्या मानानें बसऱ्याचा दरिद्रीच म्हणावा लागेल.

कैरोला आमचें विमान आलें तेव्हां माझा डोळा लागला होता. होस्टेसनें मला जागें केलें आणि सांगितलें कीं, तुम्हांला उतरायचें नसलें तर तुम्ही विमानांत बसून राहूं शकतां. मग हिनें उठविलेंच कशाला? अर्थात्‌ तिचें बरोबर होतें. मला कैरोचा विमानतळ पाहायचा असला तर संधि चुकूं नये ही तिची रास्त इच्छा. पण मला मनांतल्या मनांत थोडा रागच आला. तेव्हां जी झोप उडाली ती — त्यानंतर चार पांच दिवस मला धड झोप लागली नाहीं.

कैरोच्या विमानतळाबाहेर एका अत्यंत आधुनिक शहराचें दर्शन झालें. गांवांत जाऊन शहर पाहण्यास वेळ नव्हता, आणि परत येतांना सुएझ कालव्याच्या प्रदेशांत गडबड असल्यामुळें कैरोला जाण्याचा बेत मनांतल्या मनांत गुंडाळून ठेवावा लागला.

* * *

कैरोला बरेचसे उतारू विमानांत चढले, आणि प्रथमच विमान भरलें.

एक ‘मजेदार जोडपें’ आंत आलें होतें. मध्यम वयाच्या त्या नवराबायकोला एकत्र बसायचें होतें, पण तशी जागाच मोकळी नव्हती. दोघेंही पिसाळलीं. “आम्हांला एकत्र बसायला कां मिळूं नये?” असा करडा सवाल त्यांनीं केला. ‘हा अन्याय होता’ ह्याबद्दल त्यांची मनोमन खात्री होती, पण अन्याय कोणीं केला हें त्यांना सांगतां येईना. त्यामुळें अकारण क्रुद्ध मुद्रेनें बसायचें आणि मधूनमधून तिरसट नजरेनें होस्टेसकडे पाहायचें एवढेंच त्यांच्या हातीं उरलें.

अखेरीस होस्टेसनें आपल्या जागा त्यांना देऊन त्यांचें मीलन घडवून आणलें.

* * *

मुंबईला चढलेल्या प्रवाश्यांत एकानें माझें लक्ष तेव्हांच वेधून घेतलें होतें. मला डिकन्सच्या पिक्‌विक्‌ची आठवण झाली. ठेंगणी ठुसकी, स्थूल, वाटोळी आकृति. गबाळ! कपडे चुरगाळलेले! हिरवा शर्ट, सफेत कॉलर, बिनटांचांचे स्लिपर्स घालून स्वारी विमानांत चढली होती. सुरकुतलेल्या चेहेऱ्यावरचे अरुंद पिचपिचित डोळे आणि अंड्यासारखें टक्कल पडलेलें डोकें — अर्थात्‌ चेहेरा करुणविनोदी!

विमानात बसल्यापासून तो सारखी व्हिस्की पीत होता. विमानतळ आला कीं बाहेर जाण्यासाठीं एखाद्या बालकाच्या औत्सुक्यानें दरवाज्यापाशीं तो सर्वांच्या अगोदर हजर होत असे.

* * *

सहा वाजण्याच्या सुमारास ( मी दर विमानतळावर घड्याळाचा कांटा मागें सारीत होतों ) इटलीचें दर्शन झालें — धुकट दर्शन. सभोंवतालच्या धुक्यांतून सकाळीं जागीं होणाऱ्या इटॅलिअन खेड्यांचें ते दर्शन !

: ३ :

रोमच्या विमानतळावर सुमारें ६॥ वाजतां उतरलों.

आतां धुकें बरेंच कमी झाले होते. हवेंत थंडी होती, पण गारठा नव्हता. आकाशांत तुरळक ढग होते, पण पावसाचें लक्षण नव्हतें. ( त्यानंतर सुमारें पंधरा दिवसांनीं पावसानें साऱ्या इटलींत धुमाकूळ उडवून दिला. ) चांगलें उजाडलें होतें. पूर्वेकडच्या आकाशानें लाल प्रसाधनास आरंभ केला होता. पण सूर्य उगवण्यास अद्याप अवकाश होता. ऑक्टोबरमध्ये येथें ७॥–८ च्या सुमारास सूर्य उगवतो आणि ५–५। च्या सुमारास मावळतो. दक्षिणायन म्हणजे काय तें दक्षिण आकाशांत डोलत जाणाऱ्या ह्या सूर्याकडे पाहिलें म्हणजे प्रत्ययास येते.

नवखेपणाचा बावर मनावर होताच. हे बावरलेल मन समोर जे जें दिसे त्याची त्याची भारतांतील गोष्टीशीं तुलना करूं पाहत होतें. रोमचा विमानतळ कांहीं मोठा भव्य वाटला नाहीं. पण युरोपमध्यें जी गोष्ट प्रत्येक वेळीं जाणवते ती ह्या इटलींतही जाणवली. लोक अधिक व्यवस्थित आहेत – आणि त्यांनीं जीवनाच्या प्रत्येक अंगाची संघटना करण्याचा प्रयत्न केला आहे. विमान-तळावरच्या उतारूंच्या शिस्तशील वर्तनांतच हें जाणवलें.

विमानतळावर आमच्या पासपोर्टांची वगैरे कडक चौकशी झालीच, पण आमच्या पाशीं असलेल्या नोटा, नाणीं इत्यादींचा हिशेबही तक्ते भरून आम्हांला द्यावा लागला. हा फॉर्म आम्हांला परत देण्यांत आला व जपून ठेवण्यांत यावा

असें बजावण्यांत आलें, पण त्यानंतर आणखो एकवार मी इटलींतून येऊन गेलों तरी कोणी त्या फॉर्मकडे कधीं ढुंकून पाहिलें नाहीं अगर त्याची साधी चौकशीही केली नाहीं.

★ ★ ★

विमानतळावर मला एक ठेंगणा पण अतिशय देखणा गृहस्थ दिसला. त्याच्या चेहेऱ्यावर हास्य खेळत होते, आणि त्याच्या नजरेत स्नेहाचें निमंत्रणच होतें. कां नकळे, तो इंग्रज असावासें मला वाटलें. त्याला विचारलें, "Are you a journalist?" (आपण पत्रकार आहांत काय ?) तो म्हणाला, "No, I am a businessman." (नाहीं, मी व्यापारी आहें.)

★ ★ ★

त्याच्याशीं माझें बोलणें चालू असतांच माझें इमारतीबाहेर झाडांकडे लक्ष जात होतें. तीं इवलालीं, खुरटीं, जवळपास निष्पर्ण झाडें पाहून वाटलें,

"युरोपमधला निसर्ग हा असाच असणार—निस्तेज, खुरटलेला."

मला मद्रासची आठवण झाली. मद्रासचीं झाडें मुंबईच्या मानानें थोराड आणि त्यांचीं पानें किती तरी अधिक तेजस्वी आणि हिरवींगार वाटलीं होतीं. मद्रासचें प्रखर ऊन पिऊनपिऊन तीं अशीं तकतकीत बनलीं होतीं. ज्या युरोपला असें प्रखर ऊन मिळत नाहीं तेथल्या निसर्गाच्या अंगावर अशी कांति कशी झळाळणार ?

★ ★ ★

विमानतळापासून शहर पंधरा मैल दूर आहे. 'ट्वा'च्या मोटरमधून जातांना इटलीच्या ग्रामीण भागाचें दर्शन झालें. देशावरच्या भागांत थोडा पाऊस अधिक पडला तर जसें दिसेल तसें वाटलें. गवत हिरवें होतें, पण दंवामुळें त्याच्या हिरव्या रंगावर आर्द्र राखट कळा दिसत होती. युरोपमध्यें फार उतरत्या छपराचीं घरें दिसतात. पण येथलीं, आपल्याकडच्या धाब्याच्या घरांसारखीं घरें पाहून आश्चर्य वाटलें. मधूनमधून जुन्या रोमन संस्कृतीचे भग्नावशेष—एखादा पडका किल्ला नाहींतर मोडलेला बुरूज अथवा उध्वस्त मिनार—दिसत, आणि इटलीच्या ग्रामीण भागांत रमलेले मन क्षणार्धांत भूतकाळांत जाई, वैभवाच्या रम्य विश्वांत मुग्ध होई, आणि उजव्या बाजूच्या रूळरस्त्यावरून विजेची गाडी खडखड करून गेली म्हणजे भानावर येई—आधुनिक जगांत उतरे.

रस्त्यानें लहानलहान फियाट गाड्या आम्हांला मागे टाकून सर्कन पुढें गेल्या म्हणजे आधुनिक जगाची जाणीव अधिकच दाटे. बऱ्याच गाड्यांत सुंदर सुंदर पोषाख करून हर्षनिर्भर वृत्तीनें जाणारीं स्त्री-पुरुष-मुलें दिसत. आज रविवार होता, लोक पिक्‌निक्‌ला ( वनविहाराला ) जात होते. समोरून एखादी शेतकऱ्याची गाडी आली म्हणजे इटलीच्या आधुनिकतेत जुन्या जगाचे जे रेंगाळणारे अवशेष आहेत त्यांची जाणीव होई.

★ ★ ★

' ट्वा 'च्या कचेरींत बराच वेळ अमेरिकन ' एक्स्प्रेस 'च्या माणसाची वाट पाहून थकल्यावर हॉटेलकडे जाण्यासाठीं टॅक्सी ठरवूं लागलों. पण माझ्यापाशीं इटॅलियन नाणे नव्हते. " तुमच्यापाशीं डॉलर्स असले तरी चालतील ", टॅक्सीवाला म्हणाला ; आणि अमेरिकन पैशाचें इटलींत केवढे माहात्म्य आहे ह्याची चुणूक मिळाली.

मी सामान घेऊन टॅक्सींत बसतो तोंच एक इसम पुढें झाला, त्यानें टॅक्सीचें दार लावण्यास हातभार लावला, आणि माझ्यापुढे एक ' पार्कर ५१ ' धरून त्याची सहा डॅालर अशी किंमत सांगितली. आपल्याकडे त्याच पेनला १५ – १६ डॉलर्स पडतात.

अमेरिकन माहात्म्याची आणखी एक बाजू समजली.

★ ★ ★

हॉटेलच्या खोलींत गेलो आणि दक्षिणेकडची खिडकी उघडली. सूर्यप्रकाशा-बरोबर हवेंतील सारी प्रसन्न कोवळिक आंत आली — आणि खोलींतल्या मंद सुगंधांत मिसळली. ह्या हॉटेलातला हा मंद सुगंध मन तरल बनवितो, आणि निळ्या आकाशांत वाऱ्यावर विहरणारा पक्षी जणुं आपल्या अन्तरंगांत शिरतो.

जरा वेळाने चर्चचा घंटानाद खिडकींतून, एखादें पोपटाचें पीस वाऱ्या-बरोबर आत यावें तसा आला. कोठून तरी दुरून आला होता तो. त्याच्या तरल कोमलतेनेच मी स्तिमित झालों. खिडकीपाशीं जाऊन बाहेर नजर टाकली. पांचव्या मजल्यावरून मला बाहेरच्या इमारतींचे घुमट आणि लाल कौलारू छपरेंच दिसलीं. तीं स्वच्छ स्वच्छ दिसत होतीं.

युरोपमध्यें धूळ नाहीं. त्यामुळें सारेंच कसें स्वच्छ स्वच्छ दिसतें !

मी उठलों आणि फेरफटक्यासाठीं बाहेर निघालों.

★ ★ ★

साडेदहाचा सुमार होता. सूर्य आकाशांत बराच वर आला होता. पण त्याचे किरण म्हणजे कोमल सुखाचें वरदान वाटत होतें. भर थंडींत सौम्यउष्ण पाण्याच्या कारंज्याखालीं बसल्यासारखें.

आज रविवार — सुट्टी ! पण रोमच्या रस्त्यांवर जीवनाला भर आला होता.

हें जीवन रोजचे ओढगस्तीचें नव्हतें. ते मनमोकळें खेळकर होतें. त्यांत विहार होता, विलास होता.

अनेक लोक आपल्या लहान लहान फियाट गाड्या घेऊन गतिमानतेचा मुक्त अनुभव घ्यावयास रस्त्यावर आले होते. रोमच्या रस्त्यावर मोठमोठ्या अजस्र गाड्या दिसतच नाहींत. पुष्कळ जण मोटरसायकलवरून जातात, आणि त्याहूनही अधिक पेट्रोलची सायकल पसंत करतात.

अनेक स्त्रीपुरुष – तरुण स्त्रीपुरुष – सुंदर सुंदर, ठेवणीतला पोषाख करून बाहेर पडलेले स्त्रीपुरुष – यौवनाचें साहजिक वातावरण निर्माण करीत जाणारे स्त्रीपुरुष – अनुरक्त नजरेनें परस्परांकडे पाहात, परस्परांचे व्यक्तित्व हातांच्या साहाय्यानें एकमेकांत गुंफून, प्रेमालाप करीत जाणारे स्त्रीपुरुष – रस्त्यावर आले होते, बागेंत हिंडत होते, सूर्यप्रकाशांत नहात होते, उपाहारगृहापुढें उघड्यावर पेयपान करीत होते – थोडक्यांत, जगाला एखाद्या उत्फुल्ल उद्यानाचें स्वरूप आणण्याचा प्रयत्न करीत होते. चैतन्याला जणुं जाग आणीत होते !

* * *

इटलींतल्या स्त्रिया इतक्या गोडस, सुंदर, बांधेसूद असतात ; त्यांचे प्रसाधन इतकें स्वाभाविक, नाजुक असतें ; त्यांच्या नजरेंतले भाव इतके बोलके असतात ; आणि त्यांचे हावभाव इतके नाट्यपूर्ण असतात, कीं जीवनशक्तिच त्यांच्या रूपानें साकार झाली आहे कीं काय वाटतें. इतक्या सुंदर, जीवंत सौंदर्याची उधळण करीत जाणाऱ्या स्त्रिया मीं युरोपांत इतरत्र कोठेंच पाहिल्या नाहींत. ' तुम्ही स्पॅनिश स्त्रिया पाहा आणि मग बोला ' असें एका अनुभवी मित्रानें सांगितलें. मी स्पेनला गेलों नाहीं, पण सौंदर्याचें इतकें एकत्र दर्शन मला पुरेसें वाटलें ! जिनोआच्या स्त्रियाही अशाच सुंदर वाटल्या. त्या मानानें नेपल्सच्या स्त्रिया मामुली ! नेपल्सच्या ट्रॅममध्यें एकदा एक सुंदर स्त्री भेटली – पण ती इंग्रज होती !

इटालियन पुरुष मात्र देखणे म्हणतां येणार नाहींत. पण त्याचें कारण त्यांची उंची माफक असते हेंच म्हणावें लागेल. त्यांची चेहेरेपट्टी रेखीव, प्रमाणशीरच असते. देहही भरदार असतो.

ग्रीक सौंदर्य म्हणतात तें मला रोममध्यें आढळलें. खुद्द ग्रीसमध्यें काय असेल ?

पण रोममध्यें मला 'सेमिटिक' भासणारे लोकही दिसले. 'ट्वा'च्या कचेरीपाशीं मला पारकर पेन विकूं पाहणारा इसम एखाद्या इराण्यासारखा दिसत होता. दोनचार स्त्रिया पारशी बायकांप्रमाणें दिसल्या. भूमध्यसमुद्रापलीकडचे लोक इकडे येऊन इटॅलिअनांत मिसळून गेले असावेत ह्याबद्दल त्यांच्याकडे पाहिल्यावर शंका उरली नाहीं.

* * *

इतक्या सौंदर्यावर कसले तरी नियंत्रण पाहिजेच. मला दोन तीन पाद्र्यांचे कळप दिसले. त्यांचे काळे, पांढरे झगे, आणि त्यांचे शुष्क, दुर्मुखलेले चेहरे ! एक पाद्रिणींचा कळप दिसला. इटलींत रोमन कॅथोलिक धर्माचें प्रस्थ आहे आणि पोपचें निवासस्थान जवळच आहे ह्याची जाणीव झाली. मला ते कळप सुंदर वृक्षावरच्या बांडगुळासारखे वाटले !

रोमच्या स्टेशनापलीकडच्या बागेत खेळणारीं लहान लहान गोंडस मुलें पाहिलीं कीं सुंदर स्त्रिया आणि कुरुप पाद्री ह्या दोघांचाही विसर पडे. दंवांत न्हालेलीं, टवटवीत टपोरीं फुलें असतात तशीं हीं मुलें दिसत.

बागेंतल्या वृक्षाचीं बरींचशीं पानें मात्र गळून गेलीं होती. जीं होतीं तीं निस्तेज, कळाहीन दिसत होतीं. बागेत फुलझाडांचे वाफे होते, पण तेही करपून गेल्यासारखे दिसत असत. फुलांचे रंग शिळे दिसत होते. झाडावरचीं फुलें बाशीं दिसूं शकतात हें मला प्रथमच समजलें !

त्या झाडाकडे पाहिलें कीं कुंद वाटे. त्या फुलझाडांकडे पाहिलें कीं शुष्क वाटे !

* * *

तरी त्या बागेंत चैतन्य पसरलें होतें. बागेच्या उघड्या जागेंत विश्रांतिगृहें होतीं. पेयगृहें होतीं, मद्यगृहें होतीं आणि लोक प्रसन्न वातावरणांत मद्य, कॉफी, खाद्यपदार्थ ह्यांचा संतुष्ट आस्वाद घेत होते, आणि बेफिकीर धूम्रपान करीत होते.

रोमचें रेल्वेस्टेशन अजस्त्र आहे, पण त्याचें सौंदर्य नाजुक आहे, कारण स्टेशन आधुनिक पद्धतीनें शक्य तितकें कांचसामान वापरून बांधलेलें आहे.

पलीकडे समोर असलेल्या रोमच्या उध्वस्त किल्ल्याच्या अफाट भिंती पाहिल्या कीं हा आधुनिक नाजुकपणा विशेषच जाणवतो.

भटकतां भटकतां मी एका वृत्तपत्रांच्या स्टॉलसमोर उभा राहिलों. मला इटॅलिअन भाषेचा शब्दही कळत नाहीं. पण बरींचशीं मासिकें चित्रपटांचीं आणि पुष्कळ 'रतिमस्ती 'सारखीं असावींत असें वाटले.

* * *

सूर्य मावळायला टेंकला होता. गल्ल्यांतला प्रकाश अगोदरच अदृश्य पावलांनीं निघून गेला होता. चारदोन पोरें रस्त्यावर खेळत होतीं. इतक्यांत माझें लक्ष गेलें —

पलीकडे फूटपाथवर एक तरुण पुरुष व स्त्री एकमेकांशीं तावातावानें, हावभावांची भरपूर उधळपट्टी करीत बोलत होतीं.

त्याच्या एकंदर आविर्भावावरून हें प्रेमप्रकरणांतलें भांडण असावे असें वाटत होते.

एकदोनदां, आतां हीं दोघें एकमेकांच्या झिंज्या धरून खेंचणार असेंच वाटले.

— पण रस्त्यावरून येणाऱ्याजाणाऱ्यांपैकीं कोणी त्यांची साधी दखलही घेत नव्हता. एक उत्कृष्ट नाटक सुरू होतें. प्रेक्षकगणही होता ; पण पाहात मात्र नव्हता !

तीं खेळणारीं पोरें ( टारगट कार्टीच ) तीं देखील त्यांच्याकडे दृष्टिक्षेप करायला तयार नव्हतीं.

* * *

कारण, मला वाटलें होते तसे ते प्रकरण नसावेंच. त्या तरुण स्त्रीपुरुषांच्या वागण्यांत त्या लोकांना कांहीं वेगळे आगळें वाटलेंच नसावे.

माझा गैरसमज झाला असावा – कारण इटॅलिअन लोकांच्या वागणुकींत नेहमींच भरपूर नाट्य असते. प्रत्येक इटॅलिअन हा जन्मजातच नट असतो.

मला येथे आठवतें. मी जिनोआला लॉइड त्रिएस्तिनोच्या कचेरींत एका अधिकाऱ्याशीं बोलत बसलों होतो. तितक्यांत तेथें एक कारकून आला. कांहींतरी कचेरींतलेंच नेहमींच्या चाकोरींतलें काम असावें.

पण त्यांचें जें बोलणें झालें त्यावरून शेक्स्पीयरच्या नाटकांतलें एखादें दृश्य तर आपण पाहात नाहीं ना असें वाटले.

इटॅलिअन लोक नुसत्या तोंडाने बोलत नाहींत – ते साऱ्या इंद्रियांनीं, साऱ्या अवयवांनीं बोलतात – आणि वागतात.

*    *    *

रोमच्या आंतरराष्ट्रीय विमानतळावरचीं झाडे मला खुजीं खुरटलेलीं वाटलीं होतीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं विमानतळाकडे जाणारी आमची बस एका बागेवरून गेली. बागेंतले प्रचंड वृक्ष पाहून माझा भ्रमनिरास झाला.

युरोपांतही प्रचंड वृक्ष आहेत. युरोपांतलें उन्ह प्रखर नसेल, पण उन्हाळ्यांत येथें पंधरा वीस तासांचा दिवस असतो. गुणांची उणीव संख्येने भरून काढली होती !

## : ४ :

विमानतळावर एक गृहस्थ भेटला. माझ्याकडे पाहिल्याबरोबर तो हसला आणि त्यानें माझी चौकशी केली.

तो ऑस्ट्रियन होता. व्हिएन्नाला चालला होता. मद्रासला त्याचे कांहीं कारखाने होते.

मी आदल्या दिवशीं ‘ ट्वा ’नें आलो होतो असं मीं सांगितल्याबरोबर तो उद्गारला,

“No ! No ! TWA is not for me. I always travel by Air India. That is the best air service in the world.” ( छे छे ! ट्वा मला मुळींच पसंत नाहीं. मी नेहमीं एअर इंडियानें प्रवास करतो. एअर इंडियासारखी वैमानिक प्रवासाची सोय नाहीं. )

एका अनुभवी परकीयानें टाटांच्या विमानकंपनीबद्दल असे उद्गार काढल्यामुळें माझा भारतीय आत्मा अभिमानानें भरून आला.

*    *    *

विमानतळावरच्या विमानांकडे नजर टाकल्याबरोबरच त्यांचा एकंदर मगदूर ध्यानांत आला आणि निराशा व थोडी भीतिही वाटली. विमान निर्धोक आहे कीं नाहीं हें अर्थात् कांहीं त्याच्या बाह्य दर्शनावरून ठरवायचें नसतें. आंतल्या खुर्च्यांच्या वगैरे वैभवावरूनही त्याचा अंदाज करायचा नसतो. पण तसें वाटतें खरें.

त्या इटॅलिअन विमानाचें आंतलें दर्शन अगदीं भिकार होतें. खुर्च्या गैरसोयीच्या होत्या. एकंदर बांधकामच माफक वाटले. त्यामुळें इंजिनही त्याच दर्जाचे असावें असा ग्रह झाला. तो तर्काला धरून नव्हता, पण विमानांत बसल्यावर तर्क कमकुवत होतो आणि भावनांचाच जोर वाढतो. तें विमान अगदीं बेतशीर उंचीवरून जात होतें, त्यामुळें पोटांत दबा धरून बसलेली धास्ती अधिकच खुपूं लागली.

* * *

पण विमान कमी उंचीवरून जात असल्याचा एक फायदा झाला. खालची भूमि आणि तिच्यावरचा मानवाचा आणि निसर्गाचा संसार अगदीं स्पष्ट दिसत होता. टेकड्यांच्या प्रदेशावरूनच आमचें विमान जात होतें. सपाट भाग असा दिसलाच नाहीं.

पण प्रत्येक भागावरून माणसाचा हात फिरल्यासारखें वाटत होते. शक्य तितकी जागा शेतीखालीं आणण्यांत आली होती. जंगलभागसुद्धां काळजीपूर्वक प्रमाणशीर राखण्यांत आला होता. टेकड्यावरचीं तीं छोटी छोटीं शेतें, वेडींवाकडींच, पण त्या सर्वांतून एक चित्रविचित्र संगति निर्माण होत होती. निरनिराळ्या शेतांमध्यें आकृतीच्या ह्या संगतींत हिरव्या छटांची रंगसंगतिही मिसळली होती. मधूनच गांवें दिसत. शेतें, जंगलें ह्यांच्या प्रमाणशीर संघटनेंत त्यांना अगदीं कलात्मक स्थान मिळाल्यासारखें वाटत होतें.

टेकड्यांमागून टेकड्या जात होत्या. शेतें, बागा, खेडीं आणि जंगलें ह्यांचें प्रसाधन केलेल्या त्या टेकड्या! मला आमच्याकडच्या गांवरान टेकड्यांची आठवण झाली. आणि छानछोकी कॉलेजकन्येची खेडवळ ग्रामकन्येशीं तुलना मनांत सुरू झाली.

* * *

विमानानें एड्रिॲटिक समुद्र ओलांडला आणि त्रिएस्तकडील किनाऱ्यावर उड्डाण केलें. खालीं समुद्राचा किनाऱ्याबरोबर चाललेला संसार दिसूं लागला. जरा वेळानें समुद्र मागें पडला आणि किनारपट्टीवरचीं शेतें दिसूं लागलीं. पुष्कळ ठिकाणीं कापणी सुरू होती, तर कांहीं ठिकाणीं नांगरणी दिसत होती. एकदोन ठिकाणीं ट्रॅक्टर दिसला. मधुनमधून खारी जमीन दिसे. खेडें आल्याची सूचना चर्चचा मनोरा देई. गांवांतल्या मोठ्यामोठ्या सार्वजनिक इमारती दृष्टीचा तडक वेध घेत. रस्त्यांतल्या, शेतावरच्या माणसांच्या हालचाली नजरेंत भरत. बंगले, घरें दिसत – पण विमानांतून खाजगी जीवनापेक्षा सार्वजनिक जीवनाचाच ठसा अधिक उमटतो.

* * *

त्रिएस्त विमानतळापासून त्रिएस्त शहर-स्टेशन-बंदर पंधरावीस मैल आहे. मी ॲव्हिओनीच्या टूरींग गाडींतून चाललों होतों. सारा प्रदेश खडकाळ. बाजूच्या खडकाळ टेकड्यांवर हिंवाळ्यांत सुवर्णमय व रक्तमय बनलेल्या झाडा-झुडपांचें आणि द्राक्षांच्या बागांचें रंगदार दर्शन होत जातें.

त्रिएस्तच्या रस्त्याचें एवढेंच सौंदर्य नाहीं. सिमेंट-कॉंक्रिटचा तो विशाल, विस्तृत रस्ता, एका बाजूला खडकाळ डोंगर आणि दुसऱ्या बाजूला दूरवर पसरलेला अफाट सागर ह्यांच्यामधून जातो. डाव्या बाजूला खडकाळ सौंदर्य पसरलेलें होतें, उजव्या बाजूला समुद्राचें जीवनसौंदर्य पसरलेलें होतें. त्या खड-काळ डोंगरावर हिंवाळ्यांत लाल-पिवळी बनलेल्या पानांचें सौंदर्य पसरलेलें असूनसुद्धां त्याचें दर्शन थोडें उग्रच वाटत होतें, तर त्या शांत समुद्राच्या दर्शनांत योग्याच्या समाधिसौंदर्याचा साक्षात्कार होत होता. समुद्राच्या पसाऱ्यापलीकडे पाण्यांत शिरलेल्या डोंगराचें काळसर दर्शन होत होते, पण त्यानें सुद्धां ह्या शांत गांभीर्यांत रौद्र छटा मिसळल्या नाहींत. आपलीं शुभ्र शिडें पसरून संथ तरंग-णाऱ्या होड्या म्हणजे त्या योग्याच्या समाधीची प्रतीकें भासत होत्या !

त्रिएस्तला जातांना डावीकडचें उग्र सौंदर्य आणि उजवीकडचें शांतगंभीर सौंदर्य ह्यांचा आलटून पालटून आस्वाद घेतांना मनाची त्रेधा उडून गेली.

* * *

त्रिएस्त शहर आणि सभोंवतालचा प्रदेश हा इटली आणि युगोस्लाव्हिआ ह्या उभयतांच्या भांडणांत वांध्यांत पडला आहे. युद्धकालीन दोस्तांनीं एक

भाग युगोस्लाव्हिआकडे आणि एक भाग इटलीकडे कारभारासाठीं दिला असून हें भांडण कधीं काळीं सुटेल म्हणून काळ व परिस्थिति ह्यांची अश्रांत आराधना चालविली आहे. खुद्द त्रिएस्त शहरांत मुलकी कारभार इटॅलियनांचा असून लष्करी संरक्षण पांच हजार अमेरिकन आणि पांच हजार ब्रिटिश सैनिकांकडे आहे.

खुद्द त्रिएस्त शहरांत ६५–७० टक्के इटॅलिअन आणि ३०–३५ टक्के युगोस्लाव्ह आहेत. पण शहराभोवतालचा प्रदेश मात्र बराचसा युगोस्लाव्ह आहे. मुंबई शहरांत महाराष्ट्रीयांची लोकसंख्या इतकी कमी नसली तरी मुंबईचें त्रिएस्तशीं असलेलें साम्य लगेच ध्यानांत येईल. आणखी एक गुंतागुंतीचा भाग आहे. त्रिएस्तशहराबाबत आज इटली–युगोस्लाव्हिआंत वाद माजला असला तरी तें महत्त्वाचे बंदर मूळ ऑस्ट्रिया-हंगेरी आणि मध्य युरोपचा इतर अन्तर्गत भाग ह्यांसाठीं बांधण्यांत आलें होतें. इटली अगर युगोस्लाव्हिआ ह्यांपैकीं कोणीही त्या बंदरावर पूर्णतः अवलंबून नाहीं, पण युगोस्लाव्हिआला याचा अधिक उपयोग होणार आहे. येथेंही मुंबईशीं असलेलें साम्य स्पष्ट होईल. पण कांडला आणि भटकळ हीं बंदरें वाढल्यावर हें साम्य कमी होणार.

* * *

त्रिएस्तमध्यें इटॅलिअन भाषेचें आणि इटॅलियन संस्कृतीचें वर्चस्व आहे हें लगेच ध्यानांत येतें. अर्थात् तेथें इटॅलिअन नाणेंच चालतें. माझ्यापाशीं तें पुरेसें नव्हतें आणि मला एकही हॉटेलवाला इंग्लिश नाणें घेऊन जेवण घालण्यास तयार नव्हता. अखेरीस स्टेशनवर तोटा पत्करून पैसे बदलून घ्यावे लागले. शहरांत इटॅलिअन भाषा सारखी कानावर पडते. स्त्रिया रोमप्रमाणें सुंदर होत्या, पण त्यांच्या सौंदर्यांत तो नाजुकपणा नव्हता. तेथील पुरुषही रोमच्या मानानें धिप्पाड वाटले. स्लाव्ह आणि लॅटिन वंशांचा बराच संकर झालेला असावा ह्यांत शंका नाहीं.

त्रिएस्त शहरांत गर्दी नाहीं, पण सुखसोयींची चंगळ आहे. नारळ-केळ्यां-सारखे पौर्वात्य पदार्थही दुकानांत भरपूर भरून ठेवलेले दिसले. (अर्थात् इटॅलिअन नाण्याच्या अभावीं मला ते दूरच वाटले!) खडकाळ डोंगर फोडून-पोखरून तें बंदर बांधलेलें असल्यामुळें त्यांत विरोध-सौंदर्याचें मुक्त दर्शन घडतें. सबंध शहर दणकट, ताकदवान वाटतें. स्टेशनही तसेंच. लष्करी ठाण्याचे संस्कार स्टेशनावर आंतही होते.

स्टेशनावरील अमेरिकन R. T. O. मध्ये एका युवकानें माझें मनमोकळें स्वागत केलें. त्याच्या अमेरिकन उच्चारावरून तो मला अमेरिकन वाटला, पण इटॅलिअन होता. त्याच्या स्वागतांत इतकें निर्भर आतिथ्य होतें कीं, मी ते चार तास त्या कचेरींतच गप्पा मारीत काढण्याचें ठरविलें. तेथला इलेक्ट्रिक स्टोव्ह (हीटर) थंडीचें निवारण करून आमच्या शरीरांत आणि संभाषणांत ऊब भरीत होता.

थोड्याच वेळांत त्या कचेरीचा अमेरिकन प्रमुख आला—आणि तो चांगलाच गोष्टीवेल्हाळ वाटला. एकदां एक व्यापारी बोटीचा खलाशी म्हणून तो कलकत्त्याला आलेला होता, पण भारतीय परिस्थितीबद्दल त्यानें आपल्या संभाषणांत जे ज्ञान दाखविले त्याचा तेवढ्यानें उलगडा होण्यासारखा नव्हता.

भारतीय लोक अतिशय बुद्धिमान आहेत, शूर आहेत, कर्तबगार आहेत, पण ते मागासलेले आहेत ह्याचें एक कारण अफाट लोकसंख्या, पण खरें कारण त्यांचा जातिभेद, असें आपलें मत त्यानें सांगितलें.

'हें आपण ओळखलं कसं ?' मी त्याला विचारलें.

'गेल्या युद्धांत इटलीमध्यें कांहीं हिंदी पलटणीशीं माझा परिचय घडून आला होता,' तो उत्तरला.

* * *

पण माझे मन खरे वेधून घेतले होतें त्या इटॅलिअन युवकानें. कॉलेजांतून सरळ त्यानें या कचेरींत प्रवेश केला होता. तो आपल्या अमेरिकन सहकाऱ्यांत इतका मिसळून गेलेला दिसला— 'यांकी' विनोदांत इतका पटाईत झालेला दिसला—कीं त्याचें सारें वागणें मी चकितमुग्ध वृत्तीनें पाहात बसलों. तो वाङ्मयाचा विद्यार्थी होता. कॉलेजांत वाचलेल्या दान्ते, बोकॅशिओ, दअन्युत्सिओ प्रभृतींच्या वाङ्मयाच्या सुरस गप्पा त्यानें माझ्याशीं मारल्या— आणि बरोबर चार वाजतां गाडी आली तेव्हां 'शिंची, आज अगदीं वेळेवर आली' असे उद्गार काढून त्या 'हमालहीन' स्टेशनांत माझें सामानाचें भरताड गाडींत चढविण्यास त्यानें जातीनें मदत केली.

मला त्याला पत्र लिहिण्याची सारखी इच्छा होते. पण त्यानें दिलेला पत्ता हरवला!—हा खरोखर माझा गुन्हा झाला, आणि त्याला मी पत्र पाठवूं शकत नाहीं ह्याची लागलेली चुटपूट त्या गुन्ह्याचें पुरें परिमार्जन करूं शकत नाहीं, एवढा तो गुन्हा मला मोठा वाटत आहे.

* * *

: ५ :

झाग्रेब स्टेशनवर आम्ही सारे प्रतिनिधि
रात्रीं बारा वाजतां उतरलो —

परिषदेच्या स्वयंसेवकांनीं आमचें स्वागत केलें, आणि आम्हांला एका सुसज्ज
ोलींत नेलें. त्या खोलींत प्रतिनिधींची गर्दी उसळली होती.

ती इवलीशी खोली धांदल, गडबड आणि बडबड ह्यांनीं भरून गेली
ोती. माझ्या श्रान्त मनावर फ्रेंच आणि इंग्लिश भाषेचें तें मिश्रण कसला तरी
ोंधळलेला परिणाम करीत होतें.

तेथें आम्हांला आमचे पासपोर्ट दाखवायचे होते, नांवें नोंदवायचीं होतीं,
ाणि आम्हांला कोणत्या हॉटेलमध्यें कोणत्या खोलींत उतरायचें आहे ह्याची
ाहिती मिळायची होती.

हें काम इतके किचकट होतें आणि प्रतिनिधींची गर्दी इतकी होती व
ल्वेच्या कंटाळवाण्या प्रवासानें जिकिरीस आलेले प्रतिनिधि ह्या प्राथमिक
करणांतून सुटण्यास इतके उत्सुक झाले होते — थोडक्यांत म्हणजे, ते इतके
ाईला आले होते, कीं एकेकांचे कागदपत्र हातावेगळे करण्यांत, ह्या कामासाठीं
ामलेल्या दोन चलाख आणि सुंदर स्त्रियांची अगदीं त्रेधा उडून गेली.

* * *

माझी पाळी आली तेव्हां माझा पासपोर्ट हातांत घेऊन त्या दोहोंपैकीं अधिक
चलाख वाटणारी बाई म्हणाली,

" So you are from India ? " ( आच्छा ! म्हणजे तुम्हीं हिंदुस्थानांतून
ालां ? " )

मी म्हटलें, " होय "

ती म्हणाली, " I know India. " ( मला हिंदुस्थान माहीत आहे. )

मी थोडा चकित झालों. ह्या युगोस्लाव्हिआंत हिंदुस्थानला जाऊन आलेलें
कोणी असेल हा विचार सुद्धां मला स्पर्श करून गेला नव्हता. मीं आनंदानें
विचारलें,

" म्हणजे तुम्ही हिंदुस्थानला गेलां होतां ? "

ती उत्तरली, "No-I know India from the map." ( नाहीं – हिंदुस्थानचा मला परिचय नकाशावरून आहे. )

तिच्या त्या विमल विनोदानें माझा कंटाळा कोठच्या कोठें उडाला – मी एकदम उत्साहानें हसलों.

युगोस्लाव्हिआसारख्या कट्टर कम्युनिस्ट राष्ट्रांतली ही विनोदाची सलामी अगदींच अनपेक्षित होती, पण माझा पासपोर्ट पाहिल्याबरोबर तिच्या तोंडून निघालेल्या उद्गारांत जी आपुलकी होती तिनेंच माझें चित्त अधिक खेचून घेतलें होतें.

इतक्यांत तिच्या विनोदाचा आणखी एक उद्रेक झाला.

कोणीतरी तिला विचारलें, "परिषदेची पहिली बैठक केव्हां आहे ?"

ती उत्तरली, "उद्यां दुपारीं."

तो म्हणाला, "म्हणजे उद्यां सकाळीं नाहीं. ह्याचा अर्थ आतां जाऊन भरपूर झोंपायला हरकत नाहीं."

"Yes", ती म्हणाली, "You can go and sleep and dream." ( होय, तुम्ही झोंपूं शकतां आणि स्वप्नेंही पाहूं शकतां. )

त्यावर तो मिस्किल स्वरांत म्हणाला, "Yes, dream of you." ( होय, तुझींच स्वप्नें पाहीन मीं. )

त्याबरोबर तडाक्यानें ती म्हणाली, "But take care that the dream does not turn into a nightmare." ( पण त्या स्वप्नाचें दुःस्वप्नांत रूपांतर होणार नाहीं एवढी काळजी मात्र घ्या. )

त्याबरोबर जो हंशा फुटला, त्यांत मी अभावितपणेंच सामील झालों. कंटाळलेल्या मनावर ही विनोदाची जोरदार झुळूक फार सुखद वाटली.

आणि सोव्हिएट रशियासारख्या जबरदस्त राष्ट्राला विरोध करण्यास युगोस्लाव्हिआ ज्या शक्तींच्या जोरावर उभा राहिला त्यांत विनोदबुद्धीला महत्त्वाचें स्थान असलें पाहिजे हें लगेच ध्यानांत आलें.

* * *

ह्या देशांत भारतीय म्हणून येणें ह्याचा अर्थ काय होतो हें सकाळीं माझ्या ताबडतोब ध्यानांत आलें. पार्लमेंट बिल्डिंगमध्यें मला एका युगोस्लाव्ह गृहस्थानें गांठलें आणि पार्लमेंटच्या ग्रंथालयांत नेलें. तेथें त्यानें भारतीय राजकारणावर गप्पा मारण्यास सुरवात केली. लौकरच माझ्या ध्यानांत आलें, कीं हा गृहस्थ

कुठल्या तरी वर्तमानपत्राचा बातमीदार आहे आणि तो माझी मुलाखत घेत आहे. तो झाग्रेबच्या 'विएस्निक' या प्रमुख दैनिकाचा वार्ताहर होता. मी कोणी तरी भारताचा अधिकारी प्रवक्ता आहें अशा थाटांत तो राष्ट्रीय–आन्तरराष्ट्रीय राजकारणावरचीं माझीं मतें टिपून घेत होता. त्यानें त्या मुलाखतीचा सारांश आपल्या दैनिकांत छापला आणि समग्र मुलाखत साप्ताहिक आवृत्तींत प्रसिद्ध केली.

ह्या मुलाखतींबरोबर माझीं रेखाचित्रेंही प्रसिद्ध झालीं.

* * *

झाग्रेबच्या परिषदेंत रेखाचित्रकारांचें, अगर व्यंगचित्रकारांचे प्रतिनिधींवर सारखें लक्ष असे. कोणाशीं सहज बोलत उभे राहिले तरी जवळच कोठें तरी एखादा चित्रकार तुमचें चित्र रेखाटतो आहे–त्याची नजर तुमचे अवयव टिपून घेते आहे आणि हात झरझर वहीवर चालतो आहे असें दिसून येई.

भारतीयांवर त्यांची विशेषच मेहेरबानी दिसली. परिषदेच्या सभागृहांत मी आणि दुसरे एक भारतीय प्रतिनिधि डॉ. शंभू एकत्र बसत असूं. कॅमेऱ्याची नजर आमच्याकडे जरा अधिक वळत आहे हें आमच्या ताबडतोब ध्यानांत आले.

* * *

भारताबद्दल त्यांना भारी उत्सुकता. युगोस्लाव्हिआला येऊन गेलेला प्रत्येक भारतीय माझ्या परिचयाचा असेल अशी अनेकांची अपेक्षा! 'कमलेश बानर्जी तुम्हाला भेटले का?' 'उपाध्याय ह्याना तुम्ही ओळखतां का?' 'आमच्या देशाबद्दल लोहिआंना काय वाटलं?' असले प्रश्न मला अनेकांनीं अनेकवार विचारले. १९२६ सालीं रवींद्रनाथ ठाकूर झाग्रेबला येऊन गेले होते. त्यांचा उल्लेख किती तरी जणांनीं केला.

मी एका विद्यार्थिनींच्या घोळक्यांत उभा होतों. इतक्यांत कोणी तरी बातमी आणली, कीं एक भारतीय स्त्री आली असून ती उपहारगृहांत आहे. भुर्रदिशीं चिमण्या उडाव्या तशा त्या तिला पाह्यला पळाल्या.

ती मनु बानर्जी होती. तिच्या साड्या मोठ्या वेधक रंगदार असत. पण तें वस्त्र रंगदार आहे ह्यापेक्षां ते भारतीय आहे ह्याचे आकर्षण त्या मुलींना वाटत असल्याचें एका मुलीच्या नंतरच्या बोलण्यावरून आढळून आलें.

पण भारतीयांबद्दलचें हें आकर्षण, हें कौतुक, हा आदर मला परिषदेंतच आढळला असें नव्हे.

एक दिवस मी ट्रॅममध्ये चढलों. माझ्याबरोबर कांहीं ब्रिटिश-अमेरिकन-फ्रेंच प्रतिनिधिही चढले. ट्रॅममध्यें अर्थात् गर्दी होती. आम्ही उभे राहिलों. जरा वेळानें पलीकडच्या बाकावरचा एक २०–२५ वर्षांचा तरुण उठला, माझ्याकडे आला आणि आपल्या जागेवर बसा अशी मला विनंती करूं लागला. ही विनंती त्यानें आणखी कोणाला केली नाहीं. मी आभारपूर्वक नकार दिल्यावर तो मुकाट्यानें जाऊन आपल्या जागेवर बसला.

★ ★ ★

भारताबद्दलची ही उत्सुकता, हा आदर कां आहे? हा आदर मला युगोस्लाव्हिआतच आढळला असें नाहीं. युरोपांत सर्वत्र आढळला. अर्थात तितक्या प्रमाणांत नाहीं, पण मनावर ठसेल इतका आढळला. हा आदर कां? आम्ही परतंत्र असताना युरोपीयनांनीं आमच्याबद्दल जी तुच्छता दर्शविली तिच्याबद्दल ते आतां प्रायश्चित्त तर घेत नाहींत?

अर्थात् भारताबद्दलचे हे मतांतर कांहीं केवळ स्वातंत्र्यामुळें झालेलें नाहीं. त्याला गांधी–नेहरूंचीं उदात्त व्यक्तित्वें कारण आहेत.

विल्फानच्या घरीं मी श्रीमती विल्फानना विचारलें, "तुम्ही गांधीजी आणि नेहरू ह्यांचीं आत्मचरित्रें वाचलीं आहेत का?"

त्या उत्तरल्या, "नाहीं, पण आता वाचणार आहें. बाकी मी पूर्वीं, १९४८ पूर्वी, वाचलीं नव्हतीं तेच बरं. तेव्हा तीं मला समजलीं नसतीं."

हे उत्तर अतिशय अर्थपूर्ण होते. भारताबद्दल जो पश्चात्तापदग्ध आदर पूर्वीच्या साम्राज्यधारी युरोपियनना वाटत असेल [कदाचित्], तसा तो युगोस्लाव्हिअन लोकाना वाटण्याचें कारण नाहीं. ह्या आदराचा, त्यांचा १९४८ मध्यें रशियाशीं जो बेबनाव झाला त्याच्याशीं संबंध आहे.

रशियाशीं भांडल्यामुळें युगोस्लाव्हिआचें परराष्ट्रीय धोरण बरेचसें भारताच्या धोरणासारखे झाले आहे. युनोमध्यें युगोस्लाव्ह आणि भारतीय प्रतिनिधि बहुधा सारखे मतदान करतात.

ह्यांतून अर्थात् दोन राष्ट्रांमधले साम्य हुडकण्याची प्रवृत्ति निर्माण झाली. दोनही राष्ट्रें मागासलेलीं आहेत, आणि दोघांचीही, कोणत्याही प्रबल राष्ट्राच्या आहारीं न जातां स्वतःचा आर्थिक उद्धार करण्यासाठीं धडपड चालली आहे ह्या गोष्टीचा उल्लेख वारंवार आढळला.

: ६ :

माझे पहिले पांच दिवस परिषदेंतच गेले. त्या पांच दिवसांत माझी प्रकृति सपाटून बिघडली. सर्दी झाली, भूक पळाली—अंथरुण तर धरणार नाहीं ना, अशी भीतिही वाटली.

ऑक्टोबरच्या अखेरचे दिवस. पाऊस आणि थंडी ह्या दोघाचा संयुक्त मारा सुरू होता. मला वाटलें, माझी प्रकृति ह्यामुळें बिघडली—

पण कॉनी झिलियाकुस मला म्हणाले, "येथल्या पाण्यांत कसले तरी जन्तु असावेत.—येथल्या लोकांना त्यांची संवय असल्यामुळें त्यांना ते बाधत नाहींत, पण आमच्यासारख्या बाहेरच्या लोकांना त्याचा त्रास होतो."

एवढें खरें, कीं प्रकृति बिघडल्यामुळें परिषदेंत जितका रस घ्यावा असे मला वाटत होतें तितका कांहीं मला घेतां आला नाहीं. परिषदेच्या प्रिसिडिअमवर मला पहिल्याच दिवशीं निवडण्यांत आलें होतें, पण तिच्याही कामांत मला पुरेसा भाग घेतां आला नाहीं.

* * *

प्रकृति बरी नसल्यामुळेंच परिषदेंत शक्य तर बोलायचे नाहीं असे मी ठरविलें होतें. पण पहिल्याच दिवशीं बोलणें अपरिहार्य झालें.

त्याचें असें झालें : परिषदेचें प्राथमिक कामकाज सुरू असतांना 'मादागास्कर'चे प्रतिनिधि उपस्थित राहाण्यास एका फ्रेंच प्रतिनिधीनें हरकत घेतली. त्याचें म्हणणें असें, कीं मादागास्कर हें कांहीं राष्ट्र नाहीं, तेव्हां ह्या आंतरराष्ट्रीय परिषदेंत मादागास्कर अगर तत्सम वासाहतिक देशांच्या प्रतिनिधींना भाग कसा घेतां येईल!

ह्या फ्रेंच प्रतिनिधीचा हा आक्षेप ऐकून मी तर चकित होऊन गेलों. शांतता आणि आंतरराष्ट्रीय सहकार्य ह्यांसाठीं भरविलेल्या परिषदेंत असे साम्राज्यवादी आक्षेप कोणी घेईल अशी कल्पना, कविकल्पना म्हणूनही, निर्माण होणें असंभवनीय होतें. हा तर वासाहतिक देशांचा अपमान होताच, पण ह्या परिषदेचाही अपमान होता.

मला गप्प बसणें अशक्य झालें. मी बोलण्याची परवानगी मागितली. ज्या ज्या देशांना कांहीं एक व्यक्तित्व आहे, संस्कृति आहे आणि राजकीय जागृति आहे त्या देशांना प्रचलित राजकीय परिभाषेंत राष्ट्र म्हटलें जात नाहीं म्हणून ह्या परिषदेंत प्रवेश नसावा ही लाजिरवाणी गोष्ट ठरेल, असे तीव्र उद्गार मीं काढले.

विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे त्या फ्रेंच आक्षेपकाचा त्याच्याच भाषेंत खरपूस समाचार घेणारा एक फ्रेंचमनच निघाला. त्यांचें नांव जॉं रूस. हे ' कॉंग्रेस ऑफ पीपल्स अगेन्स्ट इम्पिरिअलिझम् 'तर्फे आलेले होते.

माझ्या ह्या भाषणामुळें ' वासाहतिक ' प्रतिनिधींत मी एकदम लोकप्रिय होऊन गेलों. त्यांना इंग्रजी येत नव्हतें, आणि मला फ्रेंच येत नव्हतें. पण मुद्रा आणि अभिनय ह्यांच्या द्वारें त्यांनीं मला आपले धन्यवाद कळविले.

* * *

पण ज्या अभिनंदनामुळे मला निरतिशय आनंद झाला तें निराळेंच होतें. माझें भाषण आटपल्यावर थोड्याच वेळांत बैठक समाप्त झाली, आणि मी पार्लमेंटगृहाच्या सज्जांत आलों. मी कोणाशीं तरी बोलत उभा होतों, तों युगोस्लाव्हिआचे वृद्ध पण प्रभावी नेते मोशा पियादे आले, त्यांनीं माझा हात हातांत घेतला, आणि जोरजोरानें हस्तान्दोलन केलें. ते कांहीं बोलले नाहींत; मुक्त हसले आणि निघून गेले.

त्यांनीं परिषदेंत फ्रेंचमधून भाषण केलेलें होतें. मजपाशीं ते कांहीं बोलले नाहींत. मला वाटलें, ह्यांना इंग्रजी येत नाहीं. म्हणून मी त्यांची भेट घेण्याचा प्रयत्नच केला नाहीं. पण परत आल्यावर मला समजलें कीं त्यांना इंग्रजी उत्तम येतें.

खरोखर अधिक चवकशी न करण्यांत मी माझें केवढें नुकसान करून घेतलें ह्याची मला आतां कल्पना येते आणि मन गोरेंमोरें होतें. मोशा पियादे हे युगोस्लाव्ह नेत्यांतले एक अत्यंत विनोदी आणि बुद्धिवान पुढारी म्हणून ओळखले जातात. जिव्हेचा पट्टा तलवारीप्रमाणें काय अगर गिरमिटाप्रमाणें काय फिरविण्यांत त्यांचा हातखंडा आहे. ह्यामुळेंच सोव्हिएट पुढारी त्यांचा सर्वांत अधिक द्वेष करतात. विनोदाच्या जोरावर दोनदोन तास श्रोत्यांना हसत-खिदळत ठेवणें हा त्यांच्या हातचा मळ आहे. त्यांचें संभाषणचातुर्य हा एक आश्चर्यमिश्रित कौतुकाचा विषय झालेला आहे.

अनेक वर्षें तुरुंगांत घालविल्यामुळें आणि तेथें जबरदस्त मार खाल्ल्यामुळें पियादेंना शारीरिक विकृति झालेली आहे. पण त्यांच्या विनोदबुद्धीला इजा मात्र कोणींच करूं शकलेला नाहीं. तुरुंगांत त्यांनीं मार्क्सच्या त्रिखंडकीर्ति त्रिखंड ग्रंथाचें सर्बो-क्रोटमध्ये भाषांतर केलें, आणि तें अधिकृत गणलें जातें. टिटोचे ते राजकीय गुरु समजले जातात. ह्या गृहस्थानें आयुष्याचा प्रारंभ चित्रकलेनें केला, राजकारणासाठीं चित्रकला हेळसांडली, आणि आतां आयुष्याच्या सायंकाळीं ते एक स्वतंत्र स्टुडिओ थाटून चित्रकलेची पुनः उपासना करूं लागले आहेत.

अशा व्यक्तीशीं गप्पा मारण्याची संधि मी केवळ गैरसमजामुळें घालविली ही केवढी वंचना !

★ ★ ★

ह्याच फ्रेच प्रतिनिधीशीं माझी आणखी एक चकमक उडाली. माझें सकाळच्या बैठकींत भाषण झालें होतें. त्यांत मी गांधीप्रणीत नैतिक शक्तीचा उल्लेख केला होता. आदल्या दिवशीं डॉ. शंभू ह्यांनीं गांधींच्या अहिंसावादाचा उल्लेख केला होता. दुपारच्या बैठकींत बोलतांना ह्या प्रतिनिधीनें म्हटलें, " सकाळीं बोलतांना आपल्या भारतीय मित्रानें अहिंसेचा उल्लेख केला, पण मी विचारतों, काश्मीरचें काय ? " काश्मीरचा हा उल्लेख थोडासा दुष्टपणाचा होता. एकदोघांनीं माझ्याकडे साभिप्राय पाहिलें. दिवसभराच्या भाषणांतील वादग्रस्त मुद्द्यांना उत्तर देण्यासाठीं सायंकाळीं अर्धा तास राखून ठेवलेला असे. मीं त्याचा फायदा घ्यावयाचें ठरविलें.

त्याला उत्तर देतांना मी म्हटलें, " माझ्या फ्रेंच दोस्तानें ' काश्मीरचें काय ?' असें मला विचारलें आहे. काश्मीरच्या प्रश्नांत मी येथे शिरूं इच्छित नाहीं. कारण, पाकिस्तानचा प्रतिनिधि येथे हजर नाहीं. त्याच्या गैरहजेरींत काश्मीरच्या प्रश्नाची चर्चा करणे हें पाकिस्तानला अन्याय केल्यासारखें होईल. मी माझ्या आक्षेपकाला फक्त एकाच गोष्टीचे स्मरण देतों. आमच्या पंतप्रधानांनीं असें स्पष्ट जाहीर केलें आहे, कीं पाकिस्ताननें आमची कितीही आगळीक केली तरी जोंपर्यंत त्यानें प्रत्यक्ष आक्रमण केलें नाहीं तोंपर्यंत आम्ही शस्त्रास हात घालणार नाहीं. कांहीं झालें तरी आक्रमणाचें पहिलें पाऊल भारत टाकणार नाहीं. "

★ ★ ★

वस्तुतः, मी ह्या परिषदेंत भाषण करणारच नव्हतों. पण पहिल्या दोन दिवस झालेल्या भाषणांनीं नाराज झालेला एक अमेरिकन क्वेकर प्रतिनिधी मला म्हणाला, " ही म्हणे शांततापरिषद, आणि गांधींचें नांव घ्यायचें एकाला सुचत नाहीं ! तुम्ही बोला. "

मी म्हटले, " मी बोललों तर गांधींचें नांव घेईनच, पण तुम्ही कां बोलत नाहीं ? "

" गांधींचा संदेश सांगण्याचा अधिकार आम्हा अभारतीयांचा नाहीं. ते तुम्हींच केलें पाहिजे. तुम्ही बोला. "

मी बोलण्यासाठीं नाव दिलें. भारतांतून निघतांना ज्या भाषणाची कल्पना माझ्या डोक्यांत घोळत होती ती एव्हांपर्यंत पार बदलून गेली होती. मी समाजवादी पक्षाचा प्रतिनिधि म्हणून आलो होतों, पण युगोस्लाव्हिआंत माझें स्वागत भारतीय म्हणूनच झालें होतें. तेव्हां मी बोललों तर केवळ समाजवादी नव्हे तर भारतीय भूमिकेवरून बोलायचें असें अगोदरच ठरविलें होते. त्याला ही चेतना मिळाली.

★ ★ ★

परिषदेंत अशा चकमकी अधूनमधून उडत असत. फ्रेंचांच्या साम्राज्यवादी धोरणाप्रमाणेच अमेरिकेचें धोरण हा चर्चेचा विषय झाला होता. अनेकानीं अमेरिकेच्या धोरणावर कडक टीका केली. उदाहरणार्थ, फ्रान्सच्या लेखिका ॲग्नेस हम्बर्ट ह्यांनीं आपल्या भाषणात होलीवूडचे चित्रपट आणि कोका कोला ह्यांच्यामुळें फ्रेंच संस्कृति धोक्यात आली आहे, असें विधान केलें !

असल्या विधानानीं अमेरिकन प्रतिनिधींना राग यावा हें साहजिक होतें. त्यांनीं अमेरिकेची बाजू तडफेनें मांडली. पण अमेरिकन प्रतिनिधींचीं भाषणें ऐकतांना, त्यांत अमेरिकन सामर्थ्याची विशेष जाणीव व्यक्त होत होती, हें मात्र खटकल्याखेरीज राहिलें नाहीं. अमेरिकनांच्या बाजूला न्याय आणि सदिच्छा असूनही त्याच्याबद्दल जगभर गैरसमज का माजतात ते हीं भाषणें ऐकल्यावर विशेष ध्यानात आले.

अमेरिकेबद्दलचा गैरसमज मला जगभरच आढळला. ह्याचें एक मजेदार उदाहरण सांगतों. जिनीवाच्या विमानतळावर मला एक गृहस्थ भेटले. त्यांच्या बॅगवरील पत्त्यावरून ते युनोचे बडे अधिकारी असावेत असें वाटलें. त्यांचें

माझें संभाषण सुरू झाल्यावर मी त्यांना विचारलें, "Are you an American? ( आपण अमेरिकन आहांत काय ? )

ते उत्तरले, "Why do you insult me? I am a Canadian." ( माझा असा अपमान कां करतां ? मी कॅनेडिअन आहें. " )

मी म्हटलें, "I always thought that Canadians were like brothers to Americans." ( कॅनेडिअन लोक अमेरिकनांना भावासारखे मानतात असे मला वाटलें होतें. )

"No." तो उत्तरला, "You Indians are much nearer to us. You are in the Commonwealth." ( छट् ! तुम्ही हिन्दुस्थानी लोक आम्हाला अधिक जवळचे वाटतां, तुम्ही राष्ट्रकुलांत आहांत. )

* * *

ही परिषद कम्युनिस्ट राष्ट्रांत भरत होती, पण परिषदेंतलें वातावरण पूर्णपणें लोकशाहीवादी, स्वतंत्र होतें. प्रत्येक जण आपल्याला हवें तें मुक्त मनानें बोलत होता.

परिषदेंतलें लोकसत्ताक गुऱ्हाळ कांहीं युगोस्लाव्ह प्रतिनिधींना असह्य झालें. ' असल्या आंतरराष्ट्रीय परिषदांत हें ठीक आहे, पण ज्या प्रश्नांचा झटकाफटकीं निकाल सांगायला हवा ते जर अशा लोकशाहीच्या तावडींत सांपडले तर निकालच लागला ! " – एक युगोस्लाव्ह प्रतिनिधि मला म्हणाला. पण कांहीं युगोस्लाव्ह प्रतिनिधींना ही लोकसत्ताक शिस्त मनपसंत वाटत होती असें दिसले. युगोस्लाव्ह प्रतिनिधि साधारणपणें एकमुखानें बोलत आणि एकहातानें मतदान करीत, पण देदियर ह्यांच्या एका सूचनेनें युगोस्लाव्ह प्रतिनिधिमंडळांत फूट पडली, त्याची एका युगोस्लाव्ह प्रतिनिधीला कोण गंमत वाटली !

कम्युनिस्ट परिषदांचें वातावरण ह्या परिषदेंत नव्हतेंच. पूर्वरचित निदर्शनें नव्हतीं, टाळ्यांचें फेफरें नव्हतें, बांधून आणलेली गर्दी नव्हती, अगर घोषणांचे हुकमी आवाजही नव्हते. प्रेक्षकांच्या गॅलरींत रेटारेटी नसली तरी गॅलऱ्या भरलेल्या दिसत. स्वयंसेवकांची व्यवस्था नमुनेदार होती. इंग्रजी जाणणारी जी एक विद्यार्थिनी-स्वयंसेविका आमच्या दिमतीला होती तिच्या वर्तनांत विनम्रता आणि स्नेहशीलता ह्यांचा नमुनेदार संगम होता. तिची विनम्रता कधीं गोंधळली नाहीं, आणि स्नेहानें संयम सोडला नाहीं. तिची शिस्त एकदांच सुटली ! मनु

बानर्जीला पाहायला ती हरिणीच्या पावलानें पळाली तेव्हां ! मनु बानर्जी जिनीवाहून दुभाषीमंडळाची सदस्य म्हणून आली होती. फ्रेंचचें इंग्रजी करून सांगतांना ती जरा अडखळे. तिच्या बोलण्यांत तेजही नव्हतें. पण तिचें सौंदर्य पुरुषांना आणि तिच्या साड्या स्त्रियांना इतक्या आवडल्या होत्या, कीं तिच्या कामगिरीवर सारे जण खूष दिसले.

* * *

ह्या परिषदेंत फ्रेंच भाषेचें सामर्थ्य मला समजलें. उर्दू व्याख्यानें ऐकतांना जोश आणि जोम ह्यांचा जसा प्रत्यय येतो, तसा फ्रेंच भाषणें ऐकतांना येतो. पण फ्रेंच तितकीच मृदु आणि सौम्यही आहे. खरें म्हणजे, फ्रेंच ही मानवी मनाप्रमाणें हवी ती वृत्ति धारण करूं शकते. फक्त तिला मौन साधत नाहीं. ती स्वभावतः बोलकी, किंबाहुना बडबडी आहे. तिल सुरवात करता येते ; अखेर करण्याचें भानच उरत नाहीं. आम्ही कांहीं प्रतिनिधी झाग्रेबच्या लेखक-क्लबांत गेलों होतों. तेथें प्रोफेसर शिंको ह्यांनी आमचें स्वागत दहा मिनिटांत केलें. त्या स्वागताला उत्तर देण्यासाठीं एक फ्रेंच गृहस्थ उठला, तो तासभर बोलला. हा वाग्वेल्हाळपणा केवळ फ्रेंचांपुरताच मर्यादित नाहीं. फ्रेंच भाषेंत कोणीही बोलायला लागला तरी तो येतोच. त्या फ्रेंच गृहस्थाच्या आभारप्रदर्शनानंतर मादागास्करचा मुसलमान प्रतिनिधि आभार मानण्यास उभा राहिला. तो सव्वा तास बोलला ! न्यूटनचा अखंड गतीचा नियम इतर कशाहीपेक्षां फ्रेंच भाषेला अधिक लागू आहे !

कम्युनिस्ट राष्ट्रांतील प्रतिनिधींना निमंत्रणें गेलीं होतीं, त्यांना साधीं उत्तरेंही आलीं नव्हतीं ; इतकेंच काय, पण तेथें ह्या परिषदेची भरपूर नाचक्की करण्यांत येत होती. परिषदेच्या सरचिटणीस मारिआ विल्फान ह्यांना नांवनिशीवर शिवीगाळ मॉस्को रेडिओनें केली होती. “मारिआ ह्या युद्धापूर्वी नात्सीच्या हस्तक होत्या, युद्धकालांत ब्रिटिशांच्या होत्या आणि आतां अमेरिकेच्या आहेत” असा अहेर मॉस्कोनें केला होता. ह्या उल्लेखामुळें श्रीमती विल्फान थरारून गेल्या होत्या. शिव्या देण्यासाठीं कां होईना, पण मॉस्कोनें आपली दखल घेतली ही जाणीव त्यांना थोडीशी सुखदच वाटत असावी ! त्यांनीं मला हा उल्लेख सांगितला तेव्हां मी म्हटलें, “आणि मधल्या १९४५–४८ ह्या काळांत कोणाची हस्तक होत्यें हें सांगाल तर बरं होईल असं तुम्ही त्यांना

विचारा." पण त्या ह्या उल्लेखानें इतक्या शहारून गेल्या होत्या कीं माझा हा विनोद ग्रहण करण्याच्या त्या मनःस्थितींतच नव्हत्या.

*　　　*　　　*

अशा जागतिक परिषदा जितपत यशस्वी होतात तितपत हीही झाली. परिषदेनें संमत केलेल्या ठरावांत स्वयंनिर्णय, लहानथोर राष्ट्रांची समता, मागासलेल्या राष्ट्राचा विकास आणि संस्कृतीचा मुक्त संचार इत्यादि तत्त्वांवर भर देण्यांत आला. कोणत्याही गटांत सामील न होण्याच्या धोरणाचें खास मंडन करण्यांत आलें. परिषदेंत नेहरूंचा गौरवपूर्ण उल्लेख वारंवार झाला.

## : ७ :

मनु बानर्जींचा उल्लेख मी केलेलाच आहे. ह्या मुलीच्या सौंदर्यावर युरोपीयन आणि अमेरिकन प्रतिनिधि खूष होते. A. F. P. चे वार्ताहर एडमण्ड मार्को (मी त्यांना मार्को पोलो म्हणत असे) मला म्हणाले, "She is one of the most beautiful women I have seen." आणि असें कोणी तिच्याबद्दल म्हणाला कीं मी अर्थात् मान डोलवीत असें. पण ह्या पाश्चात्य सौंदर्यभक्ताचा हा अभिप्राय मला कधींच बरोबर वाटला नाहीं. त्या मुलीच्या टवटवीत कांतीखेरीज मला तिच्यांत अधिक सौंदर्य कांहीं दिसलें नाहीं. तिच्या चेहऱ्यांत भारतीयत्व मात्र भरपूर दिसलें, आणि त्याचेंच आकर्षण ह्या लोकांना असावें असें वाटतें.

*　　　*　　　*

भारतीय स्त्रियांबद्दल युरोपीयन पुरुषांना हें जें आकर्षण वाटतें तसेंच भारतीय पुरुषांबद्दल युगोस्लाव्ह स्त्रियांना वाटतें असें झाग्रेबला भेटलेल्या विश्वनाथन् नांवाच्या सिलोनी-तामीळ विद्यार्थ्यानें मला सांगितलें.

त्यानें सांगितलें कीं, युगोस्लाव्ह मुलींना काळ्या-सावळ्या रंगाच्या भारतीयांबद्दल फार आकर्षण वाटतें. आपण स्वानुभवानें बोलत आहोंत अशीही ग्वाही त्यानें दिली.

मी विचारलें, "कां आकर्षण वाटतें?"

तो म्हणाला, " The girls here say, you charm us because ou have more sun in your skin. " ( तुमच्या त्वचेंत अधिक सूर्यप्रकाश ाहे म्हणून तुम्ही आम्हाला आवडतां असें येथल्या मुली म्हणतात. )

* * *

ह्या परिषदेला मार्गारेट कार्टराईट नांवाची एक निग्रो बाई आली होती.

ती निग्रो असली तरी तिचा चेहरा गोड आकर्षक होता. पण तिचें वागणें ाणि नटणें खात्रीनें ओढ लावणारें नव्हतें. तिचा रंग शिसवी काळा होता, ाणि तिच्या ओठावरचें लालछुटुक प्रसाधन त्या रंगाशीं विसंगत स्पर्धा करीत ोतें. तिच्या लांब नखांवर तसाच गडद लाल रंग होता, आणि तिच्या झुपकेदार ;सांवरची गोंड्याची टाळूटोपी ( स्कलकॅप ) आणि अंगांतला लोकरी ब्लाऊज ा लाल रंगास मागें टाकण्याचा कमाल प्रयत्न करीत होता. थोडक्यांत ;णजे तिचा छोटासा, ठेंगणा ठुसका, किंचित् स्थूल देह काळ्या आणि लाल गांची समरभूमि बनला होता, आणि तिच्या हातांतलीं कनकवलयें आणि ानांतले इअरिंग्ज हीं त्या समरभूमीवरचीं ( स्मरभूमीवरचीं असेंच जवळ ावळ मी म्हणत होतों ) नाजुक शस्त्रास्त्रें बनलीं होतीं.

ही बाई चाळीस वर्षांहून अधिक वयाची आहे असें मला नंतर समजलें. ण ती नटवी, नखरेल पोरगीच दिसे.

गौरवर्णीयांत ती कधीं मिसळतांना दिसलीच नाहीं. बहुतेक सारा वेळ ेटनच्या, एकाद्या मुष्टियोद्ध्यासारख्या दिसणाऱ्या जोसेफ मिचेल ह्या निग्रो ाध्यापकाबरोबरच असे, आणि तिला ' डार्लिंग ' म्हणण्याइतका त्यांचा स्नेह ाढलेलाही दिसला.

मला प्रथम वाटलें, ही कोणी तरी आफ्रिकेंतली किंवा वेस्ट-इण्डिजमधली, ;कतीच सुसंस्कृत जगाचीं क्षितिजें न्याहाळूं लागलेली ग्रामीण कन्या असावी.

पण परिषदेंत तिचें भाषण ऐकलें आणि मी चकित झालों. अमेरिकेंतील ेग्रोंच्या परिस्थितीवर तें एक अतिशय विचारप्रवर्तक असें भाष्य होतें. त्यांत ्यूनगण्ड अजिबात नव्हता. आणि अमेरिकन देशभक्तीचें सात्त्विक दर्शन होतें.

मग मात्र मी तिच्या चवकशीस लागलों. प्रो. मिचेलची माझी अगोदरच ोळख झाली होती. त्यांनीं सांगितलें कीं, ती न्यू यॉर्कच्या एका कॉलेजांतील ामाजशास्त्राची प्राध्यापक आहे. तिचें एका गौरवर्णीयाशीं लग्न झालेलें आहे.

आणि ती पोरगेली ( पोरकट ? ) दिसत असली तरी तिनें चाळिशी ओलांडलेली आहे. पण तिच्याशीं बोलूं लागलें कीं, तिच्या वयाचा विसर पडे. इतकी तिच्या बोलण्यांत यौवनाची आतुरता आणि झळाळी होती, आणि तिच्या अमेरिकन उच्चारांत सतेज झार हाती.

* * *

परिषदेला जॅन नटले नांवाचा एक इंग्लिश क्वेकर आला होता. हा गृहस्थ इंग्लंडमध्यें एका बंगल्यांत जमीन वगैरे पुसण्याचें काम करीत असे. आपल्या तुटपुंज्या उत्पन्नांतून पैसे सांठवून तो परिषदेसाठीं आला होता.

त्याची मूर्ति म्हणजे साधेपणाचा नमुना होता, पण त्याच्या ठिकाणीं शांततेबद्दल अगदीं युयुत्सु उत्साह दिसला.

परिषदेंतलें माझे भाषण संपल्याबरोबर हा आपल्या जागेवरून उठला आणि आपल्या भरदार हातांनीं त्यानें मोठमोठ्यानें टाळ्या वाजविल्या. एकादें चामड्याचें वाद्यच वाजतें आहे असें तेव्हां वाटलें. अनेकजण उठून त्याच्याकडे चकित चेहेऱ्याने पाहूं लागले.

मी गांधीजींच्या देशांतला म्हणून मजविषयीं त्याला फार आत्मीयता वाटत असावी.

शेवटच्या दिवशीं, युद्धांत भरती होण्यास नकार देण्याचा प्रत्येकास हक्क असावा ह्या ठरावास मीं विरोध केला.

ती बैठक संपल्याबरोबर नटले माझ्याकडे आला आणि म्हणाला, " Young man, you are in disgrace. "

तो असे कां म्हणत होता हें माझ्या लगेच ध्यानांत आलें. मीं म्हटलें,

" मीं तुमच्या ठरावाच्या विरुद्ध मत दिलें म्हणूनच ना ? पण माझा मुद्दा जरा ऐकून घ्याल ? "

" हो हो, ऐकतों कीं — "

" सैन्यांत भरती होण्यास नकार देण्याचा हक्क देणें म्हणजे भित्र्या लोकांना संरक्षण देणें होय. हें मला मान्य नाहीं. दुसरें असें कीं, जे सैन्यांत शिरतात ते चैनींत असतात असें नाहीं. त्यांनाही कष्ट, हालअपेष्टा सहन कराव्या लागतात. ते देशभक्तीसारख्या उच्च भावनेनेंही प्रेरित झालेले असतात. सैन्यभरतीला विरोध करणारानेंही तशा हालअपेष्टा सोसण्यास तयार झालें पाहिजे. निदान

त्यानें तुरुंगवास सहन करण्यासाठीं राजी असलें पाहिजे. तरच त्याच्या प्रामाणिकपणावर लोकांचा विश्वास बसेल. लोकांचें मतपरिवर्तन करण्यासाठीं आत्मक्लेश सहन करण्यास तयार असलें पाहिजे, असें गांधींनीं आम्हांला शिकविलें आहे.”

माझा मुद्दा त्याला पटला असावा असें दिसलें नाहीं. पण त्यानें माझा हात प्रेमानें हातांत घेतला, आणि स्नेहानें दाबला !

दुसऱ्या दिवशीं आम्ही एकमेकांचा निरोप घेत होतों. जेवणाच्या टेबलाभोंवतीं नवेजुने मित्र जमा झाले होते. ओळखीला स्नेहाचा उजाळा देत होते. अखेरचें सहभोजन म्हणून त्याचा विशेष आस्वाद घेत होते.

इतक्यांत नटलेनें आम्हाला एका कर्तव्याची जाणीव दिली. भोजनगृहांतल्या ‘ वेटर्स ’ ना ‘ टिप ’ दिली पाहिजे असें त्यानें सुचविलें. ही एका कामगाराची सूचना होती !

‘ टिप ’ देणें योग्य नाहीं असें एका स्वयंसेवकानें पूर्वींच मला सुचविलेलें होतें. पण नटलेच्या सूचनेबरोबर आम्ही सर्वांनीं आपापलीं पाकिटं उघडलीं —

आणि वेटरनेंसुद्धां ती बक्षिसी अगदीं खुशीनें स्वीकारली.

* * *

परिषदेच्या वेळीं व्लॅदिमिर देदियेरशीं माझी दोनतीनदां भेट झाली ती अविस्मरणीयच म्हटली पाहिजे. तेव्हां ते परराष्ट्रीय खात्याचे चिटणीस होते.

देदियेर हे एखाद्या मुष्टियोद्धयासारखे दिसतात. ते चांगले तालीमबाज आहेतही. पण एक अतिशय बुद्धिमान् तरुण नेते म्हणूनच युगोस्लाव्ह लोक त्यांच्याकडे आशेनें पाहातात. ते मोठ्या गोलगोल भरीव आवाजांत बोलतात, पण त्यांतला स्नेहाळपणा लोहचुंबकासारखा वाटतो. मनमोकळ्या स्नेहानें वागणें हा त्यांचा स्वभावच दिसतो. ‘ लुई डाल्माज ’ ह्या फ्रेंच पत्रकाराची ओळख करून देतांना ते मला म्हणाले, “ You see, ( त्यांना You see म्हणण्याची फार संवय आहे ) many people think he is my brother, but he is a friend.” मोठमोठ्या तात्त्विक गप्पा करतांना मध्येंच घरगुती गोष्टी सांगण्याची त्यांची लकब आहे. एकदां लुई डाल्माज, ते आणि मी जेवत असतांना, नेहरूंबद्दल गप्पा मारतां मारतांच ते मध्येंच म्हणाले, “ एकदां

ऽंडनमध्यें तुमचें हिंदी जेवण घेतलें, आणि तेव्हां तिखटानें माझें जें तोंड पोळलें त्याची कायमची आठवण राहिली आहे मला!"

देदियेर मुष्टीयोद्धयासारखे दिसतात, पण त्यांच्या बुद्धीची प्रभा ते बोलूं लागल्याबरोबर झळकते. ते लेखक आणि पत्रकार म्हणून युद्धापूर्वीपासून प्रसिद्ध आहेत. त्यांनीं कांहीं इंग्रजी कादंबऱ्यांची (विशेषतः वेल्स, गाल्सवर्दी आणि पर्ल बक ह्यांच्या कादंबऱ्यांचीं) सर्बो-क्रोटमध्यें भाषांतरें केलेलीं आहेत. युद्धकाळीं ते स्वातंत्र्ययुद्धांत सामील होते, आणि तेव्हां त्यांनीं लिहिलेली दैनंदिनी दैनंदिनीवाङ्मयांत मानाचे स्थान मिळवून बसली आहे. ( With Tito through the War नांवानें तिची संक्षिप्त इंग्रजी आवृत्ति प्रसिद्ध आहे. ) त्यांनीं नुकतेंच Tito Speaks ह्या नांवानें प्रसिद्ध केलेलें चरित्र फार लोकप्रिय झालें आहे. अमेरिकन प्रकाशकानें त्यांना त्याबद्दल दिलेले एक कोट डॉलर्स त्यांनीं राष्ट्राला अर्पण केले! त्यांनीं परीक्षा कायद्याची दिली, भाषांतरें इंग्रजी ग्रंथांचीं केलीं, पत्रव्यवसायास वाहून घेतलें--आणि युद्धकाळांत स्वातंत्र्ययोद्धा म्हणून कीर्ति मिळविली. युद्धांत ते दोनदां जखमी झाले होते.

१९४८ च्या फेब्रुवारींत भारतीय कम्युनिस्ट पक्षाच्या कलकत्ता येथें भरलेल्या कॉंग्रेसला ते हजर होते. ह्याच कॉंग्रेसमध्यें कम्युनिस्ट चळवळीचीं सूत्रें रणदिव्यांच्या हातांत गेलीं.

आतां, मार्शल टिटो हा ॲंग्लोअमेरिकनांचा हस्तक आहे, असा लाल प्रचार सुरू झाल्यानंतर, देदियेर ह्यांनीं भारतीय कम्युनिस्टांचा मुद्दाम बुद्धिभेद केला, आणि साहसी धोरण भारतीय कम्युनिस्टांच्या गळ्यांत बांधलें असा त्यांच्यावर लाल आरोप करण्यांत येत असतो. ( ह्या आरोपामुळें भारतीय कम्युनिस्ट नेते निर्बुद्ध आहेत असें ठरविण्यांत येतें ह्याची लाल प्रचारकांना पर्वा दिसत नाहीं. )

देदियेर ह्यांची माझ्याशीं मार्क्सवादासंबंधीं थोडीबहुत चर्चा झाली. आपण 'युगोस्लाव्हिआचा तात्त्विक विचार' नांवाचा ग्रंथ लिहीत असून तो प्रसिद्ध झाला म्हणजे जुनाट मार्क्सवादी पंडितांत खूप गडबड उडेल, असें ते एकदां म्हणाले.

* * *

: ८ :

काहीं म्हटलें तरी युगोस्लाव्हिआ हें कम्युनिस्ट एकपक्षीय राज्य, तेव्हां आपल्याला एक पोलिस-राज्यच पाहायला मिळणार अशा ठाम समजुतीनेंच मी गेलों होतों.

इतकें कशाला, पहिल्या दिवशीं हॉटेलांतून बाहेर जातांना मी बॅगेला कुलूप न लावतांच बाहेर गेलों. विचार केला, एवीतेवीं पोलिस बॅग उघडणारच, मग उगीच त्यांना त्रास कशाला !

पण परत येऊन माझ्या बॅगमधील वस्तूंची उलथापलथ कितीशी झाली आहे हें नीटसें पाहण्यापूर्वीच माझ्या ध्यानांत आलें कीं, हें कम्युनिस्ट राज्य असलें तरी पोलिसी राज्याच्या व्याख्येंत तें चपखल बसेल असें वाटत नाहीं.

*    *    *

माझ्या लवकरच ध्यानांत आलें कीं येथले लोक परकीय लोकांशीं बोलतांना कचरत नाहींत किंबहुना ते परराष्ट्रीय व्यक्तीशीं बोलण्यास उत्सुक आहेत; आणि त्यांच्या बोलण्यांत नुसताच जिव्हाळा नाहीं तर अनपेक्षित मनमोकळेपणाही आहे. त्यांनीं वादविवाद टाळला नाहीं; उलट अनेकदां तो ओढवून आणला. युगोस्लाव्हिआच्या प्रश्नाबद्दल एक प्रकारची स्वच्छ वृत्ति मला आढळली.

एक दोन उदाहरणेंच सांगतों.

बेल्ग्रेडचा 'लोला रिबार' कारखाना पाहावयास मी गेलों होतों. कम्युनिस्ट पार्टीच्या 'सेंट्रल कमिटी'नें अर्थात् माझ्या दिमतीला एक दुभाष्या दिलेला होताच. हुकूमशाही राष्ट्रांत हा दुभाष्या केवळ भाषांतरें करण्याचें काम करीत नाहीं. तो आपल्या राष्ट्राची चांगली बाजू पाहुण्यांच्या जितकी ध्यानांत येईल तितकी आणून देण्याचा प्रयत्न करीत असतो.

'लोला रिबार' कारखाना पाहून परत येत असतांना त्यानें मला सहजच सांगितलें, पंधरा दिवसांपूर्वी ह्या कारखान्यांत पद्धतशीर चोऱ्या करणाऱ्या कामगारांची टोळी पकडण्यांत आली.

आतां, वस्तुतः हें मला आपण होऊन सांगण्याचें कांहींच कारण नव्हते. उलट, कम्युनिस्टांच्या राजवटींत कामगारवर्ग हरिश्चंद्राचा अवतार बनतो असे भासवण्याच्या वृत्तीची अपेक्षाच त्याच्या ठिकाणीं स्वाभाविक ठरली असती.

एकदां मीं त्याला म्हटलें, " झाग्रेबच्या मानानें बेलग्रेड किती घाईगर्दीचें वाटतें. It's a busy city. " त्यावर तो तत्काळ म्हणाला, " Yes, busy with many blackmarketeers, also ". ( होय, काळ्याबाजारवाल्यांची सुद्धां येथें खूप गडबड चालते. )

हेंही त्याला सांगण्याचें कांहींच कारण नव्हतें. पण युगोस्लाव्ह लोक वृत्तीनें प्रांजळच आहेत. ह्याचा अनुभव परिषदेच्या पहिल्याच दिवशीं आला, आणि ह्यांचा रशियाशीं बेबनाव कां झाला ह्याचें आणखी एक कारण ध्यानांत आलें. विनोदवृत्तीप्रमाणेंच प्रांजळपणा हा हुकूमशाहीला पोषक नसतो.

* * *

युगोस्लाव्ह लोक परकीयांशीं बोलण्यास, त्यांच्याशीं मिसळण्यास उत्सुक तर दिसलेच, पण परकीयांना पाचारण करणें हें टिटोच्या सरकारचें धोरणच बनलें आहे. प्रवेश-परवाना विनायास मिळतो. परकीय प्रवासी यावेत म्हणून प्रचार करण्यांत येतो. परकीयांना देशांत कोठेंही जाण्यास आणि कांहींही पाहाण्यास मुक्त मुभा असते. मीं तेथें असतांना टिटोंनीं १२० जागतिक पत्रकारांना मुलाखत दिली. मुलाखतींत एका पत्रकारानें जरा खवचटपणे विचारलें, " तुम्हांला खरोखर जनतेचा पाठिंबा नाहीं, तुम्ही पोलिसांच्या जबरदस्तीने हा पाठिंबा मिळवितां हें खरें काय ? " टिटो उत्तरले, " हें खरें कीं खोटें हें स्वतः पाहाण्यास तुम्हांला कोणी बंदी केली आहे काय ? "

मला भेटलेले स्वीडिश पत्रकार मि. एरिक जॉन्सन ह्यांना जर्मन येत होतें. उत्तर युगोस्लाव्हिआंत ( क्रोएशिआ-स्लोवेनिआंत ) पुष्कळ लोक जर्मन बोलतात. जॉन्सन तेथें महिनाभर राहिलेले होते. माझे बहुतेक अनुभव अगर निष्कर्ष बरोबर आहेत असा त्यांचा अभिप्राय पडला.

मला युगोस्लाव्ह भाषांपैकीं एकही येत नव्हती. तरीपण युगोस्लाव्हिआ-संबंधीचें सत्य जाणून घेण्याच्या दृष्टीनें कांहीं उपकारक योगायोग घडले आणि त्यामुळें मी थोडा विश्वासानें बोलूं शकतों.

टिटोच्या एकपक्षीय राजवटींत ज्यांना आपण लोकपक्षीय स्वातंत्र्यें म्हणतों त्यांचा बराच आढळ मला झाला. युगोस्लाव्हिआंत परराष्ट्रीय, किंबहुना रशियन

( कॉमिन्फॉर्मिस्ट ) रेडिओ ऐकण्यावर बंदी नाहीं. युगोस्लाव्हिआंत परराष्ट्रीय वृत्तपत्रांवर बंदी दिसली नाहीं. झाग्रेबच्या इंग्रजी लायब्ररींत हुजूरपक्षीय ' डेली टेलिग्राफ 'बरोबर कम्युनिस्ट ' डेली वर्कर 'ही कानगोष्टी करतांना आढळला.

बेल्ग्रेडला मी एका कामगाराच्या घरांत गेलों होतों. तेथें मला स्टॅलीनचें ' लेनिनवादाचे प्रश्न ' हें पुस्तक आढळलें. दोनचार सोव्हिएट कादंबऱ्याही दिसल्या.

झाग्रेब आणि बेल्ग्रेड येथें मीं पुस्तकांच्या दुकानांच्या अनेक शो-केसेस पाहिल्या होत्या. त्यांत मार्क्स, एंगल्स, लेनिन आणि प्लेखानॉव्ह ह्यांचे अनेक ग्रंथ दिसले होते. पण स्टॅलीन ( त्याचप्रमाणें ट्रॉट्स्की अगर बुखारिन ) ह्यांचें एकही पुस्तक नजरेस आलें नव्हतें. आणि येथें कामगाराच्या घरात तर स्टॅलीनचें पुस्तक !

मी माझ्या दुभाष्याला विचारलें,

" तुम्ही स्टॅलीनच्या पुस्तकांना बंदी केलेली नाहीं ? "

तो उत्तरला, " नाहीं. आमच्या सार्वजनिक ग्रंथालयांतहि तुम्हाला त्याचीं पुस्तकें दिसतील. "

" मग तीं पुस्तकांच्या दुकानांत कां दिसत नाहींत ? " मीं विचारलें.

ह्या प्रश्नाला त्यानें अगदीं नमुनेदार ' स्टॅलिनवादी ' उत्तर दिलें. तो म्हणाला, " पण स्टॅलीनचें पुस्तक कोणी विकत घेणारच नाहीं. "

पण स्टॅलीनचे ग्रंथ वाचण्याची इच्छा लोकांना होते हें त्या कामगाराच्या घरांतील पुस्तकावरून स्पष्ट होत होतेंच.

स्टॅलीनच्या ग्रंथावर खर्च करण्यास आमच्यापाशीं पैसा नाहीं असें एका जबाबदार अधिकाऱ्यानें सांगितलें तें अधिक पटणारें होतें.

* * *

खरें म्हणजे रशियाशीं बेबनाव झाल्यापासून युगोस्लाव्ह नेत्यांना थोडीबहुत नवदृष्टिच प्राप्त झाल्यासारखी झाली आहे. मला आढळलेलें लोकसत्ताक स्वातंत्र्य हा ह्या नवदृष्टीचा परिणाम दिसतो.

उदाहरणार्थ, क्रोएशियाचे अध्यक्ष मि. बॅकारिच मला म्हणाले, " पाश्चात्य राष्ट्रांतल्या अर्थशास्त्राचा अभ्यास म्हणजे कालापव्यय आहे अशी जी अनेक

मार्क्सवाद्यांची समजूत आहे ती साफ चूक आहे. पाश्चात्य अर्थशास्त्रीय विचारांचा सूक्ष्म अभ्यास केला पाहिजे." आपण स्वतः केन्सचे ग्रंथ आवडीनें वाचीत आहोंत, असें त्यांनीं मला समाधानवृत्तीनें सांगितलें — आणि अमेरिकन अर्थशास्त्रज्ञांचे ग्रंथ वाचण्यास फुरसत मिळत नाहीं म्हणून निराशा व्यक्त केली.

वर्तमानपत्राचे संपादकही नव्या दृष्टीनें संपादन करतात. शांतता-परिषदेंतलें पास्टर निमॉलर ह्यांचें सोव्हिएटवादी भाषण वृत्तपत्रांनीं छापलें. 'विएस्निक'ला त्यांनीं दिलेली मुलाखत अधिक सोव्हिएटवादी होती. पण ती छापतांना संपादकाला ती अगोदर नजरेखालून घालण्याचीही आवश्यकता वाटली नाहीं, आपण ती दिली तशी छापण्यांत आली, असें मला ती मुलाखत घेणाऱ्या वार्ताहरानें सांगितलें.

* * *

विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे युगोस्लाव्हिआंत कम्युनिस्टेतरांना कमी लेखण्याची वृत्ति दिसली नाहीं, अगर कम्युनिस्टेतरांत न्यूनगंडही आढळला नाहीं. उलट आपण कम्युनिस्ट नाहीं असें अभिमानानें सांगणारा एक तरुण मला परिषदेच्या वेळीं भेटला.

भोजनगृहांत मी आणि मारिआ विल्फान गप्पा मारीत जेवत होतों. त्याच टेबलावर जेवणाऱ्या एका तरुणाचें आमच्या बोलण्याकडे लक्ष दिसलें. श्रीमती विल्फान, त्यांना काम असल्यामुळें घाईघाईनें निघून गेल्यावर, मी त्या तरुणाला, कां नकळे पण एकदम, विचारलें.

"आपण कम्युनिस्ट आहांत का ?"

त्यानें प्रांजळ स्वरांत उत्तर दिलें, "नाहीं."

मीं विचारलें "कां नाहीं ?"

त्यानें उलट विचारलें, "मी कम्युनिस्ट कां असावें ? आपण कम्युनिस्ट आहांत असें मी विचारूं का ?"

मी उत्तरलों — "नाहीं, मी कम्युनिस्ट नाहीं."

"कां नाहीं ?" तडक प्रश्न आला.

"कारण मी कम्युनिस्टविरोधी आहें."

"आणि मी कम्युनिस्ट नाहीं," तो म्हणाला, "कारण मला राजकारणांत रस वाटत नाहीं. I am just non-political."

“ पण कम्युनिस्ट राष्ट्रांत कोणालाही राजकारणातीत कसें राहतां येईल ? ”

“ कां राहतां येऊं नये ? ” तो उद्गारला, “ मी येथें सरकारी भाषान्तरकार म्हणून हजर आहें. मी माझें काम प्रामाणिकपणें मन लावून करतों. And that's the end of the matter. ”

तो सुरेख इंग्रजींत बोलत होता. त्याच्या देखण्या व्यक्तित्वानें आणि सुंदर इंग्रजीनें माझें चित्त वेधून घेतलें. त्याच्या निर्भय प्रांजलपणामुळें माझी स्नेह-बुद्धि जागृत झाली. तो सरकारी नोकर असूनही त्याच्या बोलण्यांत मिंधेपणाचा स्पर्श दिसला नाहीं.

“ दोन तीन वर्षांपूर्वी असें बोलणें अगर वागणें शक्य नव्हतें ” असें मात्र त्यानें सांगितलें. हे उद्गार जवळपास सार्वत्रिकच दिसले.

* * *

: ९ :

सकाळीं एस्प्लेनाड हॉटलच्या कॉफी-रूम-मध्यें मी कॉफी पीत बसलों होतों. इन्फॉर्मेशन ब्यूरोचे राईच आले आणि त्यांनीं मला विचारलें,

“ तिकडे पलीकडे एक स्वीडिश पत्रकार बसले आहेत, ते विचारतात, मी तुमच्या हिंदी पाहुण्याशीं बोललों तर चालेल कां ? ”

मला त्या प्रश्नाचें आश्चर्य वाटलें. मीं म्हटलें,

“ चालेल का कां ! आनंद वाटेल. ”

ज्याचा उल्लेख मीं अद्यापपर्यंत दोनतीनदां केला आहे तोच हा एरिक जॉन्सन.

प्रथमदर्शनींच त्याच्याविषयीं माझा फार अनुकूल ग्रह झाला. मध्यम बांध्याची, गोल चेहऱ्याची आणि पिंगट केसांची ती मूर्ति मला फार आवडली. त्याचा चेहरा विलक्षण संवेदनाक्षम वाटला — आणि त्याच्या व्यक्तित्वाचे धागे कसल्यातरी कारणानें उस्कटलेले असावेत हें ताबडतोब ध्यानांत आलें. त्याचा चेहरा प्रसन्न, कोमल वाटला, पण डोळे संत्रस्त दिसले. त्यांचें बांधेसूद, थोडें-बहुत देखणें शरीर, कापडाच्या एकाद्या विशविशित पुतळ्यासारखें वाटलें !

पण ह्या सर्वांतून माझ्या मनावर विशेष खोल ठसा उमटला तो निरागस बालसुलभ वृत्तीचा. नंतर बेल्ग्रेड येथें त्याच्यासंबंधीं बोलतांना कॉन्‌ *झिलियाकुस ह्यांनीं that boy ( तो पोरगा ) असा त्यांचा उल्लेख केला तेव्ह माझ्या मनांत दडलेल्या कसल्या तरी खोल जाणिवेवर त्यांनीं अचूक बोट* ठेवलें असें वाटलें.

आमची भेट झाल्याबरोबर एरिक जॉन्सन म्हणाला, "I wanted to meet you because you are an Indian." ( तुम्ही भारतीय आहांत म्हणून तुम्हांला भेटावेसें वाटलें. )

त्यानें मला, आपण मार्शल टिटोंना भेटून आल्याचें सांगितलें. "Marshal Tito is an honest and truthful man. ( मार्शल टिटो हे प्रामाणिक आणि सत्यनिष्ठ गृहस्थ आहेत. ) Meeting him is fantastic."

कोणताहि अभिप्राय जोरदार रीतीनें व्यक्त करण्यासाठीं 'Fantastic' हें विशेषण वापरणें ही त्याची खास लबक होती. गांधी Fantastic आहेत! आमच्या देशाचें भाग्य केवढें Fantastic! आज हवा काय Fantastic पडली आहे!

मी त्याला पुढें पुढें Mr. Fantastic म्हणूं लागलों. त्याची विनोदबुद्धि फारशी तीव्र अगर जागृत दिसली नाहीं, पण स्वभाव इतका सत्प्रवृत्त आणि सुशील होता कीं मीं त्याला 'हॅलो! मि. फॅण्टॅस्टिक' म्हटलें म्हणजे त्याच्या चेहऱ्यावर विमल हास्य पसरे!

थोड्याशा परिचयानंतर माझ्या ध्यानांत आलें कीं त्याचें हें Fantastic त्याच्या इंग्रजीच्या अल्पज्ञानांतून आलें होतें. तो इंग्रजी बरें बोले, पण त्याची मर्यादा आणि व्याप्ति अगदीं बेताची होती. माझ्यापाशीं एकदां त्यानें पैसे मागण्यासाठीं अशी चिठी लिहिली : "Will you borrow me some money?"

एकादा अभिप्राय अचूक व्यक्त करण्यास त्याला योग्य शब्द सांपडला नाहीं कीं तो "Fantastic." हा शब्द ठेवून देई.

* * *

पण त्या '*Will you borrow me some money?*' बद्दल अधिक लिहिलें पाहिजे. त्याचे पैसे संपले होते, पैसे पाठव म्हणून त्यानें बायकोला तारही

केली होती, त्यांची तो अस्वस्थ अधीरतेनें वाटही पाहात होता, पण मनीऑर्डर कांहीं येत नव्हती.

त्याच्या संत्रस्त नजरेंत अगतिकता शिरलेली दिसत होती. पण मजकडे *अगर कोणाकडे येऊन उसने पैसे मागण्याचें धैर्य कांहीं त्याला होत नव्हतें.*

अखेरीस त्या रात्रीं जेवतां जेवतां आणि नाना विषयांवर गप्पा मारतां मारतां, आपण मध्येंच कांहीं तरी खरडतों आणि फाडून टाकतों अशा पद्धतीनें त्यानें सिगारेटच्या पाकिटावर तें वाक्य त्यानें लिहिलें आणि माझ्याकडे दिलें.

त्या वेळीं त्याच्या चेहऱ्यावर सशाची भीति पसरलेली स्पष्ट दिसत होती.

नॉर्वे-स्वीडनमधले लोक सुस्वभावी असतात ह्याचा अनुभव मीं परिषदेच्या कालांत घेतलाच होता. नॉर्वे-स्वीडनमधील प्रतिनिधींचें सुसंस्कृत वर्तन लगेच ध्यानात येई. पण एरिकच्या वागण्यांत जी आंतरिक शालीनता होती ती अगदीं वेड लावणारी होती.

* * *

मी त्याला पैसे दिल्यानंतर पहिली गोष्ट त्यानें केली ती मद्य मागविण्याची. मद्याचा पहिला पेला त्यानें अशा कांहीं आतुर अधीरतेनें झोकला कीं त्याच्यांत तो आपलें कसलें तरी दुःख बुडविण्याचा प्रयत्न करीत आहे असें मला वाटलें.

मद्याचे दोन पेले घेतल्यावर त्याचा चेहरा जरा शान्त झालासा दिसला. त्याच्या शब्दांतही मोकळेपणा शिरला आणि जरा वेळानें त्यानें आपली जीवनकहाणी मला सांगितली:

बाविसाव्या वर्षीच त्याचें लग्न झालें होतें. त्याला एक मुलगाही होता. पण नंतर त्याला एक नर्तिका भेटली, आणि तिनें त्याला वेड लावलें. दक्षिण आफ्रिकेंतील एक फिनिश मिशनरी आणि त्याची मंगोलिअन बायको या जोडप्याची ही मुलगी. तिच्या नेत्रसौंदर्यानें त्याचें भान हरपलें. तिच्या नजरेनें त्याला अगदीं बांधून टाकलें. अर्थात् त्याचें वैवाहिक जीवन विस्कटलें. बायकोनें घटस्फोट घेतला —

इतक्यांत १९३९–४० च्या रुसोफिनिश युद्धांत तो फिनलंडच्या वतीनें स्वयंसैनिक म्हणून सामील झाला. लढाईत जखमी झाला. फुप्फुसांत गोळी शिरली. हॉस्पिटलांत त्याला वर्षभर पडून राहावें लागलें.

त्याची प्रेयसी त्याला भेटण्यासाठीं रोज हॉस्पिटलांत येत असे. त्याच्या हृदयांतलें प्रेम आणि जखम ह्यांचा हा अविस्मरणीय संगम होता !

ती रोज येत असे—पण एक दिवस आली नाहीं ! दुसऱ्या दिवशींही आली नाहीं.

पण ह्याचा अधिक विचार तो करूं शकला नाहीं. कारण आठवडाभर तो फारसा शुद्धींत नव्हताच. दिवसरात्र ग्लानींतच असे. अखेरीस शुद्धीवर आल्यानंतर त्यानें तिची चवकशी केली.

"ती आजारी आहे," तेथल्या लोकांनीं त्याला सांगितलें.

तो रोज तिची वाट पाहात राहिला.

अखेरीस त्याची प्रकृति थोडीशी सुधारल्यानंतर त्याला सत्य सांगण्यांत आलें. हेलसिंकीवर झालेल्या एका विमानहल्लयांत त्याची प्रेयसी प्राणांस मुकली होती.

हें सांगतांना त्याचा चेहरा विलक्षण विकल झाला. तो थोडा वेळ थांबला. अगदीं गप्प बसला. जरा वेळानें अशक्त अगतिक हातानें त्यानें बाटलींतलें सारें मद्य पेल्यांत रिकामें केलें आणि घटाघटां पिऊन टाकलें. मग थंड आवाजांत म्हणाला,

"त्यानंतर मीं दुसरें लग्न केलें—आणि मला एक सात वर्षांचा मुलगा आहे."

आतां दुसऱ्या विषयाकडे वळलेलें बरें असें वाटून मी त्याला कांहीं तरी विचारणार इतक्यांत त्यानें खिशांतून एक मळकटसा कागद काढला आणि खोल आवाजांत एक कविता वाचून दाखविली.

ती अर्थात् स्वीडिश भाषेंत होती. मला समजली नाहीं. ती त्या नर्तिकेवरची कविता होती. आपला एक कवितासंग्रह प्रसिद्ध झालेला आहे असें त्यानें मला सांगितलें.

* * *

स्वीडनबद्दल एरिकला अतिशय अभिमान दिसला. आपण स्वीडनमध्यें जन्माला आलों हें आपलें महद्भाग्य होय असें त्यानें मला समाधानाच्या स्वरांत सांगितलें. 'स्वीडनला आजवर कोणी जिंकूं शकलेला नाहीं,' तो अभिमानानें म्हणाला.

" आम्हांला आजवर कोणी जिंकलेले नाहीं; उलट, आम्हीच बाहेर जाऊन इतर देशांना जिंकलें होतें. उदाहरणार्थ, आमच्या पूर्वजांनीं, व्हायकिंग्जनीं, रशियांत जाऊन रशियन राज्याची प्रस्थापना केली. "

" ह्याचा मला अभिमान नाहीं. " तो म्हणाला, " पण माझ्या देशांत प्रगति आहे, सामाजिक न्याय आहे, उदार भावना आहे, लोकशाही आहे ह्याचा मला अभिमान वाटतो. "

त्याच्या देशभक्तींत दुरभिमान नव्हता हें लगेच ध्यानांत येत होतें. स्वीडिश लोकांत कांहीं विशेष दैवी गुण असल्यामुळें नव्हे, तर ऐतिहासिक योगामुळे आपली इतकी प्रगति झाली असे तो म्हणाला. " Sweden has had no war since 1812; that is why we could make so much progress" ( १८१२ पासून स्वीडन युद्धांत ओढले गेलेलें नाहीं—म्हणून आम्ही इतकी प्रगति करूं शकलों ), त्यानें सांगितलें.

* * *

पण कारण कांहींही असलें तरी आपला देश इतका प्रगत आहे, इतका सुसंस्कृत आहे, ह्याचा कोणाही सुपुत्राला अभिमान वाटलाच पाहिजे. तसाच तो एरिकल वाटत होता. आपला देश शांततावादी आहे आणि आपल्या राष्ट्रांत वंशश्रेष्ठत्वाची भावना नाहीं हें त्यानें मला पुनःपुन्हा सांगितलें. स्वीडिश लोक वंशश्रेष्ठत्वाच्या विकारानें ग्रासलेले नाहींत, हे सांगतांना त्याने मला दोन अनुभव सांगितले :

" आमच्या गांवात एक निग्रो गायक आला होता. त्याचा जलसा संपला तेव्हा मध्यरात्र उलटून गेली होती. सारीं हॉटेलें बंद झालीं होतीं. आणि त्या गायकाला तर सपाटून भूक लागली होती. आतां कोठं कांहीं खायला मिळेल का अशी तो भुकेल्या चेहऱ्यानें चवकशी करीत होता. अखेरीस मीं त्याला आणि त्याच्या बायकोला माझ्या घरीं निमंत्रण दिलें. त्याच्यापाशीं दोन जड बॅगा होत्या. आम्ही घरीं जायला निघालों तेव्हां मीं त्यांतील एक उचलून खांद्यावर घेतली. तें पाहिल्याबरोबर हातांत उचललेली बॅग जमिनीवर ठेवून तो निग्रो गायक माझ्याकडे आश्चर्यानें पाहूं लागला. जरा वेळानें म्हणाला, 'This is the first time I find a white man carrying my luggage.' ( माझें सामान एक श्वेतवर्णीय व्यक्ति नेत असल्याचें हें दृश्य मी जन्मांत प्रथमच पाहात आहें ). पण

ह्यांत असामान्य असें कांहींच नव्हतें. आपल्याला असाच अनुभव स्वीडनभर आला असें त्या गायकानें मला अमेरिकेंतून कळविलें."

दुसरा अनुभव : "एका हॉटेलमल्यें दोन अमेरिकन इसम जेवण घेत होते. ते जेवत असतांनाच दोन निग्रो गृहस्थ त्या हॉटेलमध्यें शिरले. त्या 'काळ्या आदमीं'ना तेथें पाहून त्या अमेरिकन श्वेतवर्णीयांचें पित्त भडकलें. वेटरला बोलावून ते म्हणाले, 'तुम्ही जर त्या काळुंद्र्यांना येथें जेऊं घालणार असाल तर आम्हाला हें हॉटेल सोडून जावें लागेल.'

त्यावर तो वेटर ताडकन म्हणाला, 'You pay and go!' (बिल चुकतें करा आणि जा.)" 'You pay and go.' एरिकनें तें वाक्य स्वतःशींच भावनाभरानें उच्चारलें.

* * *

एरिक जॉन्सन भारत, गांधी आणि शांतता ह्यांबद्दल वारंवार बोले.

तो रुसोफिनिश युद्धांत रशियाविरुद्ध लढला होता. गेल्या महायुद्धांत हिटलर-विरुद्ध लढला होता. स्वीडन तटस्थ होतें, पण सुमारें दहा हजार स्वीडिश नागरिक स्वयंसैनिक म्हणून भरती झाले होते. एरिक म्हणाला, "I don't like to fight, but one has to defend oneself." (मला युद्ध आवडत नाहीं; पण स्वसंरक्षण तर केलें पाहिजे.)

गांधीबद्दल तो अगदीं भावनाभरानें बोलत असे. Gandhi is fantastic! हें त्याचें वाक्य वारंवार येइ.

तो मला एकदां म्हणाला, "गांधी हा ह्या युगाचा सर्वश्रेष्ठ पुरुष होऊन गेला असेंच मला केव्हां केव्हां वाटतें." "I am not ashamed to say that I cried when I heard of Gandhi's death." (गांधींच्या मृत्यूचें वर्तमान ऐकलें तेव्हां मी रडलों हें सांगायला मला मुळींच लाज वाटत नाहीं.)

## : १० :

सकाळीं मि. राईच आले आणि म्हणाले, " तुम्हांला मार्शल टिटोंच्या जन्मग्रामीं जावयास आवडेल का ? आवडत असेल तर जाऊं या. "

मी ह्या प्रश्नानें थोडासा चमकलोंच, कारण टिटोचें जन्मस्थान जवळपास आहे ह्याची मला कल्पनाच नव्हती. म्हणून मीं अर्धवट विस्मयानें आणि अर्धवट अविश्वासानें राईचच्या तोंडाकडे पाहिलें.

" मीं विचारलें, " राईच म्हणाले, " तुम्हांला टिटोंच्या जन्मग्रामीं जायला आवडेल काय ? "

" वा, वा ! हा काय प्रश्न ! कोणाला आवडणार नाहीं ! "

पण राईचच्या प्रश्नांत अर्थ होता. उजाडल्यापासून बाहेर पावसानें संततधार धरलेली होती. हवेंत थंडी होती, गारठाही होता. रस्त्यावरचे लोक पावसापासून संरक्षण घेण्यासाठीं हॉटेलमध्यें शिरून गरम कॉफीने शरीराला आराम देण्याचा यत्न करीत होते.

पण झाग्रेबच्या बाहेरचा ग्रामीण विभाग पाहाण्यास, क्रोएशिआचे ग्रामीण सौंदर्य अनुभवण्यास, आणि जमलें तर खेडेगावांतील शेतकऱ्याचे जीवन जवळून पाहाण्यास मी इतका उत्सुक झालों होतों कीं, पावसाची पर्वा न करतां मीं एकदम होकार दिला. एरिक जॉन्सनही येतों म्हणाले.

दुपारचें भोजन आटपून जायचें ठरलें. तोंपर्यंत पाऊस जरा आटोपतें घेईल अशी आशा करीत आम्ही राहिलों. पण त्या आशेला पंचमहाभुतांची फारशी सहानुभूति दिसली नाहीं. पावसानें आपले आणखी कांहीं नेत्र उघडले ! टिटोंच्या गांवीं जाऊन भिजण्याची तयारी आम्ही ठेवली.

पण काय झालें नकळे, जायच्या सुमारास आकाश एकदम निवळलें, आणि हिंवाळ्यांतील सूर्याचे कोवळे किरण वातावरणांत थोडी उष्णता आणि बरीचशी प्रसन्नता पसरूं लागले.

* * *

दुपारीं दोनच्या सुमारास आम्ही निघालों. रेल्वेचा रस्ता ओलांडून आमची गाडी खरीखुरी ग्रामीण भागांत शिरणार इतक्यांत डाव्या बाजूला एक मोठा

रेल्वे यार्ड दिसला, आणि त्यांत आगगाडीचे शेंकडों डबे आडवे उभे करून ठेवलेले आढळले. सारेच जुने बेकाम होते, पण त्यांतले कांहीं अगदीं मोडकेच दिसले.

मी त्या डब्यांकडे पाहात राहिलो आहें हें ध्यानांत आल्याबरोबर राईच म्हणाले, " हे सारे जर्मनांचे, आम्ही युद्धांत पकडलेले डबे आहेत. "

शत्रूच्या काबीज केलेल्या वस्तूंचें तें जणुं एक विजयी प्रदर्शनच होतें.

लवकरच आमची गाडी ग्रामीण भागांत शिरली. मधूनच झाग्रेबकडे जाणारी एखादी बस दिसे, तेवढाच आमचा शहराशीं संबंध उरला.

क्रोएशिआचा तो सारा भाग डोंगराळ आहे. आमची मोटार लहान मोठ्या टेंकड्यांना, कधीं वळसा घालून तर कधीं त्यांच्या डोक्यावर चढून जात होती. वाटेंत अनेक ओढे-वहाळ लागले. कोंकणचा प्रवास करतांना जसें वाटतें तसेंच थोडेंसे वाटत होतें. युगोस्लाव्हिआंतले रस्तेही तितपतच दिसले.

पण एक फरक होता. हा भाग फारसा सुपीक नसला तरी शेतकऱ्यांचीं घरे व्यवस्थित दिसलीं. केवळ झोपड्या अशा फारशा नव्हत्याच. प्रत्येक घराच्या भिंती आणि दारेंखिडक्या थोड्याबहुत तरी मजबूत दिसत. तशा त्या असणें भागच होतें, कारण युरोपांत थंडी इतकी पडते कीं, दारेखिडक्या पक्क्या बंद करून राहिलें नाहीं तर थंडीच्या रूपानें मृत्यूच घरांत प्रवेश करतो.

मधूनमधून मात्र थेट आपल्याकडील झोपड्यासारख्या झोंपड्या दिसत. मी चवकशी केली. ते गुराचे किंवा डुकरांचे गोठे होते.

अशीं हीं छोटीं छोटीं, रंगवलेल्या भिंतींचीं, बंद दारेंखिडक्यांचीं, उतरत्या छपरांचीं, धुराड्यांचाच तेवढा दिमाख दाखविणारीं विनम्र घरें मधूनमधून दिसत. रस्त्याच्या कडेनें दिसत त्याहून अधिक आजुबाजूच्या टेंकड्यांच्या उतरत्या बाजूवर दिसत.

आजुबाजूला शेतापलिकडील टेकड्या मोठ्या वाटल्या. त्यांना डोंगर म्हटलें तरी चालेल. डोंगरावरही घरें—आणि मधूनच एखाद्या डोंगरावर भलेंथोरलें किल्लेवजा घर दिसे.

पूर्वी हा सारा भाग सरंजामदारांच्या मालकीचा आणि त्यांच्या प्रभुत्वाखालीं होता. त्यांचे हे किल्ले, असें राईचनीं सांगितलें.

दरेक टेकडीवरचीं हीं इतकीं घरें पाहून दुपारींच क्रोएशिआचे अध्यक्ष मि. बॅकारिच म्हणाले होते, त्याची आठवण झाली. क्रोएशिआंत लोकसंख्या फार आहे.

★ ★ ★

हा पावसाळ्याचा हंगाम असल्यामुळें जिकडेतिकडे हिरवेंगार होतें. जमीन मधूनच तांबडी, मधूनच पांढरी दिसे. दूर डोंगरावर क्वचित काळा खडक दिसे. टेकड्यांवर कांहीं झाडांचें निष्पर्ण दर्शन होई, तर कांहीं झाडांवर पिवळ्या लाल रंगांची वेधक पण कांहींशी शुष्क उधळण दिसे. एखादा द्राक्षाचा वेल अगर द्राक्षवेलांची बाग दिसली म्हणजे लाल रंग शुष्क असूनही कसा मदीर-मस्त दिसूं शकतो ह्याची प्रतीति येई.

शेतांत निरनिराळ्या रंगांचीं, सफेत, लाल, काळीं, बाळींपटेरीं गुरें दिसत—गाई, बैल, घोडे दिसत. त्यांनीं ह्या प्रदेशांत पसरलेल्या ह्या रंगांच्या, क्षणोक्षणीं बदलत जाणाऱ्या आणि नवें रूप धारण करणाऱ्या गतिमान प्रदर्शनांत जीवंत भर पडे. रस्त्यांत बदकें कोंबडी धावत आलीं कीं ह्याची तरल जाणीव होई.

पण शेतांत आज फारशी हालचाल दिसलीच नाहीं.

★ ★ ★

कारण लोकांचें आज संसाराकडे लक्ष नव्हतें.

आमची मोटर शहर सोडून बाहेर गेल्याबरोबर आम्हांला, नवा ठेवणींतला पोषाख केलेल्या, हातांत हारगुच्छ घेतलेल्या आणि आनंदाने हसतखेळत चाललेल्या स्त्रीपुरुषांचे आणि मुलांचे घोळके दिसूं लागले.

मी राईचना कारण विचारलें.

त्यांच्याही प्रथम ध्यानांत येईना. मग त्यांना आठवलें, आज ‘ऑल सेण्ट्स डे’! कॅथॉलिकांचा मोठा सणाचा दिवस. कम्युनिस्ट राज्यांत आज सुटी नव्हती, म्हणून शहरांत तो जाणवला नाहीं, पण खेड्यांत लक्षांत आला—

कारण सारे लोक रंगीबेरंगी पोषाख करून आणि रंगीबेरंगी फुलांचे गुच्छ आणि वर्तुलाकार हार घेऊन चर्चकडे चालले होते.

सभोंवतालीं उसळलेल्या रंगांच्या विलासांत ही रंगदार भर पडली—नुसती पोषाखांची आणि फुलांची नव्हे, तर मुक्त आल्हादमय वृत्तीची !

★ ★ ★

जरा वेळानें एक चर्चचें आवार दिसले. त्या आवारांत शेकडों स्त्री-पुरुष-मुलें गुडघे टेकून प्रार्थनेंत निमग्न झालेलीं दिसलीं. ते काळे सूट घातलेले पुरुष, डोक्याला पांढरा सफेत रुमाल बांधलेल्या स्त्रिया आणि रंगी बेरंगी फ्रॉक घातलेलीं मुलें–त्यांच्या विनीत, प्रार्थनामग्न मेळाव्याचें ते दर्शन म्हणजे शांत पवित्र वातावरणावर फुललेलीं चित्रविचित्र फुलेच असें वाटलें !

माझ्या मनांत विचार आला, नास्तिकांनीं धर्माचा विचार निपटून काढण्याचा कितीही जरी विचार केला, धर्माची अफू निर्वीष करण्यासाठीं समाजरचनेचे आणि राज्यपद्धतीचे कितीही जरी प्रयोग केले, ऐहिक शिस्त बाणविण्यासाठीं यमनियमांचें केवढेंही अवडंबर माजविलें तरी जोंपर्यंत जगांतल्या साऱ्या रहस्यांचा शोध लागला नाहीं तोंवर असंतुष्टतेचा शाप मिळालेलें मानवाचें मन धर्माचा आसरा शोधणारच !

आजूबाजूच्या प्रदेशाचें अनिमिष नेत्रांनीं अवलोकन करीत मी चाललों होतों. मधूनमधून चर्चचा मनोरा दिसे, आणि कांहीं झालें तरी ह्याची मान उंचच असें वाटे.

दूर डोंगरावरचे सरंजामशाहीचे बंगलेवजा अवशेष दिसत, आणि ह्या पंचक्रोशींतल्या शेतकऱ्यांनीं–झागोर्ये विभागांतल्या शेतकऱ्यांनीं–सरंजामशाही-विरुद्ध जे झगडे केले होते त्याची आठवण होई.

नव्या युगोस्लाव्हिआंत ह्या शेतकऱ्यांच्या बंडांना फारच महत्त्व आलेलें दिसलें. त्यांच्या अनेक लोकगीतांना आणि कथांना या संग्रामांनीं स्फूर्ति दिलेली आहे. आमची परिषद ज्या क्रोएशिअन पार्लमेंटच्या इमारतींत भरली होती त्याच्या मंत्रिमंडळाच्या सभागृहांत ह्या बंडांतील एका लढाईचें मोठें थोरलें तैलचित्र मीं पाहिलेलें होतें. १६ व्या शतकांत मातिये गुबेत्सने ज्या बंडाचें नेतृत्व केलें होतें त्याला तर तेथें राष्ट्रीय महाकाव्याचें महत्त्व आलेले आहे.

* * *

कुमरोवेत्सकडे ( टिटोंच्या जन्मग्रामाकडे ) जाणारी आमची मोटर एका अरुंद खिंडींत शिरली. त्या खिंडींतून एक ओढा वाहात होता आणि त्याची संगत ठेवून रस्ता चालला होता. ह्या खिंडींत आल्याबरोबर थोडेंसें निर्जन ओसाड प्रदेशांत आल्यासारखें वाटलें. तेथले डोंगर विशेष खडकाळ दिसले. झाडें फार नव्हतीं आणि गवतही तुरळक होतें.

राईच म्हणाले, ह्या खिंडींत क्रोएशिआच्या राष्ट्रकवीचें स्मारक आहे.

ह्या येथें बसून ॲन्तन मिहानोविच् ह्यानें क्रोएशिआचें राष्ट्रगीत ( ‘ ल्येपा नाशा डोमोविना ’ ) ‘ सुंदर अमुचा देश ’ हें रचलें. ह्या राष्ट्रगीतांत मिहानोविचनें देशप्रेम आणि निसर्गप्रेम ह्यांचा मनोहर संगम साधलेला आहे. क्रोएशिआच्या एका सुपुत्रानें आज युगोस्लाव्हिआला ( ज्या युगोस्लाव्हिआंत क्रोएशिआच्या व्यक्तित्वाला मान आणि स्थान आहे अशा युगोस्लाव्हिआला ) नवें स्वातंत्र्य आणि नवें भाग्य प्राप्त करून दिल्यावर ह्या स्मारकाला प्रतीकात्मक महत्त्व प्राप्त व्हावें आणि कम्युनिस्टांना त्याच्याबद्दल एक नवी आपुलकी आणि नवी कोवळिक वाटावी हें साहजिक आहे.

* * *

मार्शल टिटो लहानपणीं ह्याच परिसरांत खेळले होते. त्यांतून जातांना सारखें वाटत होतें, ह्याचपैकी एखाद्या शेतांत त्यांनीं काम केलेलें असेल ; ह्याच-पैकीं एखाद्या रानांत त्यांनीं गुरें चारलेलीं असतील ; वडिलांनीं विकल्यानंतर नव्या मालकाकडून घरीं पळून आलेल्या आपल्या आवडत्या पोलक कुत्र्याला ह्यांपैकींच एखाद्या जंगलांत त्यांनीं लपविलेलें असेल. रानांत चरत असलेला एखादा घोडा पाहून वाटे, अशाच एखाद्या घोड्याला टिटोंनीं लहानपणीं स्वार होऊन दमविलें नसेल का ?

आमची मोटर एकदम एका गांवांत शिरली आणि एका लहानशा घरापुढें उभी राहिली. हेंच मार्शल टिटोंचें घर.

हें घर ह्या गरीब गांवांतही गरीब दिसलें. आंतून तें अधिक गरीब वाटलें. पांच खोल्यांच्या त्या घराची पूर्वींच केव्हां तरी वांटणी झालेली होती ; आणि उजवीकडच्या भागांत टिटोचे वडील राहात असत, त्यांच्या वांटणीला १८× १२ ची एक खोली, १२×९ ची दुसरी खोली आणि स्वयंपाकघराचा एक भाग आला होता. १८×१२ च्या खोलींत एक प्रचंड स्टोव्ह होता, आणि स्वयंपाकघरांत पाश्चात्य पद्धतीची शेगडी होती. त्या घराला एका लहानसा माळाही होता.

आज हें सारें घर राष्ट्रीय स्मारक म्हणून राखलल आहे. टिटोंच्या विभागांत त्यांच्या वडिलांचें फर्निचर ठेवलेलें आहे. तर दुसऱ्या भागांत युगोस्लाव्हिआचा एक प्रचंड ध्वज आणि मार्शलचें छायाचित्र आढळलें. टिटोंच्या मोठ्या

खोलींत वडिलांचा पलंग आणि जेवणाचें टेबल व दोनतीन खुर्च्या दिसल्या. आंतल्या खोलींत हातमाग, जातें आणि पाळणा होता. ह्या पाळण्यांतच टिटोंनीं बालपणीचे झोंके खाल्ले होते, असें राईच म्हणाले. स्वयंपाकघरांत स्वयंपाकाचीं कांहीं किरकोळ भांडीं आढळलीं.

आज ह्या सर्व वस्तु ऐतिहासिक महत्त्वाच्या बनल्या आहेत – आणि घर हें एक पुराणेतिहाससंग्रह बनलें आहे.

पण तेथें ठेवलेले ' व्हिजिटर्स बुक ' पाहिलें, त्यांत अनेक नामांकित लोकांनीं लिहिलेले अभिप्राय आणि केलेल्या सह्या पाहिल्या, आणि कोणत्याही वस्तुसंग्रहाला प्राप्त होण्याचा संभव नाहीं असें अलौलिक राष्ट्रीय महत्त्व ह्या घराला कसें प्राप्त झालें आहे ह्याची जाणीव झाली. हें घर आणि हें गांव आज युगोस्लाव्हिआंतलें एक महत्त्वाचें यात्रास्थान बनले आहे.

★ ★ ★

पण त्या घराचें ( घराच्या आवाराचें असें म्हणायला हवें ) महत्त्व एका निराळ्याच गोष्टीनें वाढले आहे. घराच्या शेजारींच ( उजव्या बाजूला ) मार्शल टिटो ह्यांचा लष्करी वेशांतला एक पूर्णाकार पुतळा आहे. मार्शल टिटोंच्या वीरमूर्तीचें उत्तम दर्शन ह्या पुतळ्यांतून होतें. ह्या पुतळ्याच्या दर्शनानें शिल्पकाराच्या विषयाचें सामर्थ्य आणि त्याच्या छिन्नीचें सामर्थ्य, दोघांचाही एकात्म प्रत्यय येतो.

हा पुतळा ॲतन ऑगस्टिनचिच ह्या प्रसिद्ध शिल्पकारानें केला आहे. युगोस्लाव्हिआचे जगप्रसिद्ध शिल्पकार आयव्हान मेस्ट्रोव्हिच ह्यांचा हा शिष्य. हिटलरविरोधी स्वातंत्र्ययुद्धांत तो टिटोच्या सैनिकांतून लढलेला असल्यामुळें कम्युनिस्ट राजवटींत त्याला अर्थातच असामान्य महत्त्व प्राप्त झालें आहे.

हा मूळ पुतळा. ह्याच्या प्रतिकृति युगोस्लाव्हिआंत सर्वत्र आढळतात. झाग्रेबच्या मॉडर्न आर्ट गॅलरींत प्रवेशद्वारांतच ह्याच्या एका प्रतिकृतीचें प्रथम दर्शन होतें आणि मग इतर उत्तमोत्तम कालाकृति दृष्टीस पडतात.

टिटोंच्या घराच्या मागच्या बाजूला टेकडीवर अलीकडेच एक वैभवशाली हॉटेल बांधलेलें आहे. अनेक प्रवासी टिटोंचें जन्मग्राम पाहाण्यासाठीं येतात, त्यांच्यासाठीं तर तें आहेच, पण वर्षांतून एकदां खुद्द मार्शल टिटो जन्मग्रामास भेट देतात तेव्हां त्यांच्या वास्तव्यानें त्याला जणुं धन्य वाटतें !

स्वतःच्या गांवाबद्दल टिटोंना फार ओढ आहे. युद्धापूर्वी भूमिगत अवस्थेंत कम्युनिस्ट कार्य करतांना ते गुपचूप गांवाला भेट देऊन जात असत.

आम्ही हॉटेलांत गेलों. मी हॉटेलाच्या खिडकींतून बाहेर नजर टाकली. खाली शेतकऱ्यांचीं विनम्र घरे होतीं. पलीकडे शेतें होतीं आणि आणखी पलीकडे सभोंवार डोंगरांच्या रांगा होत्या.

मी त्या डोंगराकडे पाहात राहिलों. मार्शल टिटोंचे वडील ह्या डोंगरावरील जंगलांतलें लाकूड तोडून आणून भाऱ्या विकीत असत. मार्शलचे आजोबा (आईचे वडील) कोळसेपाड्याचा धंदा करीत. मार्शल पुष्कळदां आपल्या आजोळींच असत, आणि आजोबाबरोबर जंगलांत जात. ह्याच डोगरांतील जंगलांत टिटोंनीं लहानपणीं भटकंती केलेली असेल काय ?...

सूर्य केव्हांच मावळला होता. मावळत्या प्रकाशांत हे डोगर अधिक अधिक अस्पष्ट बनत चालले होते. त्यांचें दर्शन अधिक अधिक गूढ बनत चाललें होतें. त्यांच्या त्या गूढ स्वरूपांत मार्शलचें बालपण अधिकच गूढ आणि मुग्ध वाटूं लागलें —

'आतां परत वळलेलें बरे', राईचनीं सुचविलें. काळोख चांगलाच पडला होता. आकाश भरून आल्यामुळें तो अधिकच दाटला होता. परत येतांना मोटारींतून फारसें कांहीं दिसत नव्हतें.

इतक्यांत एका ठिकाणीं शेकडों दिवे एकत्र आलेले दिसले. दीपज्योतींचें एखादे संमेलन भरल्यासारखेंच वाटलें. या दीपोत्सवाच्या प्रकाशांत समोरच्या चर्चचें दर्शन झालें, आणि तें अतिशय शुचिर्भूत भासलें.

कॅथॉलिक खिस्तभक्तांनीं पेटविलेल्या मेणबत्त्यांचा तो उल्लास होता.

## : ११ :

झाग्रेबच्या परिषदेंत मला सिरिल कोसमॅच नांवाचे एक स्लोवेन कादंबरीकार भेटले. ते इंग्रजी अतिशय सुंदर बोलतात. जिच्याशीं दुभाष्याच्या मदतीशिवाय बोलतां येईल अशी व्यक्ति भेटली म्हणजे किती आनंद होतो तो त्याचा अनुभव घेतलेल्यानेंच समजण्यासारखा आहे.

पण कोसमॅचना भेटण्याचा आनंद एवढाच नव्हता. युगोस्लाव्हिआंत आल्यापासून मी राजकारणासंबंधीं बोलत होतों—अनेकांशीं अनेक प्रकारें बोलत होतों. पण वाङ्मयाबद्दल—माझ्या अतिशय आवडत्या विषयाबद्दल—बोलूं शकेन अशी ही पहिलीच युगोस्लाव्ह व्यक्ति भेटली.

प्रथमदर्शनींच छाप पाडण्याचा गुण सिरिल कोसमॅच ह्यांच्या व्यक्तित्वांत आहे.

सर्वसाधारण युगोस्लाव्ह लोकांच्या मानानें ते जरा नाजुक प्रकृतीचे वाटतात, पण ताठ उभे राहातात ; आणि त्यांच्या नाजुक देहामुळें तो ताठपणा विशेष जाणवतो. त्यांचा चेहरा अतिशय संवेदनाक्षम आहे—आणि बोलतांना त्यांचे ओठ थरथरत आहेत असें वाटतें.

महत्त्वाची गोष्ट म्हणजे ते बुद्धिजीवी दिसतात. व्लॅडिमिर देदियेर हे एक अतिशय बुद्धिमान विचारवंत आहेत, पण दिसतात एक मुष्टियोद्ध्याप्रमाणें. कोसमॅच ह्यांचा देह आणि प्रकृति ह्यांत असा विसंवाद नाहीं.

कोसमॅच परिषदेच्या कामांत इतके गढून गेले होते कीं, त्यांच्याशीं स्वस्थपणानें बोलतां असें आलेंच नाहीं. एकदां दुपारीं जेवतांना थोडेंसें बोललों.

* * *

मी त्यांना सरळच विचारलें, ' तुमच्या वाङ्मयावर पक्षाचा अंमल कितीसा आहे ? "

त्यांनींही मला नेमकेंच उत्तर दिलें, " वाङ्मयीन कृतीचें महत्त्व तिच्या वाङ्मयीन मूल्यांनीं ठरवायचें असतें—राजकीय दृष्टीनें नव्हे. "

मला अतिशय आनंद झाला. अशा स्पष्ट विधानाची अपेक्षा मीं केली नव्हती. ' कमुनिस्ट ' रशियाशीं बेबनाव झाल्यापासून वाङ्मयीन प्रश्नावरचें ' लाल ' धुकें बरेंच दूर झालेलें दिसतें, माझ्या मनांत विचार आला.

पण लगेच ते म्हणाले, " लैंगिक वाङ्मय, रहस्यकथा आणि तत्सम वाङ्मय ह्यांवर पैसा उधळण्यास मात्र आम्ही परवानगी देणार नाहीं. "

आतां हें ' वाङ्मय ' मलाही पसंत नाहीं, पण त्याचा निर्णय वाचकाऐवजीं दुसऱ्या कोणी तरी राजकीय सत्तेनें अगर संस्थेनें करावा ही कल्पना मला चमत्कारिक वाटली !

पण कम्युनिस्ट चर्चेशीं झगडणाऱ्या कम्युनिस्ट राष्ट्रांत जे कांहीं विसंवाद आढळणें अपरिहार्य आहे त्यांतलाच हा एक आहे. बऱ्याचशा प्रश्नांचें दर्शन ह्यामुळेंच श्रृंगापत्तीच्या स्वरूपांत होतें.

झाग्रेबच्या लेखकांच्या क्लबांत भेटलेल्या ग्रिगॉर व्हिलेझ नांवाच्या एका कम्युनिस्ट कवीशीं बोलतांना मला अशाच श्रृंगापत्तीचा आढळ झाला.

मीं त्याला विचारलें, “ तुम्ही पक्षाच्या घोरणानुरूप काव्यरचना करतां काय ?”

तो उत्तरला, “ काव्य आणि कम्युनिझम् ह्यांचा सरळ संबंध नाहीं. पण वाङ्मयाचा सामाजिक प्रश्नाशीं व्यापक दृष्टीने संबंध असतोच. कलाकृतीला सामाजिक अर्थ असलाच पाहिजे. ‘ कलेसाठीं कले ’ला आमचा विरोध आहे. ”

मीं त्याला माझी “ स्वप्नाची समाप्ति ” ही कथा भाषांतरून सांगितली. ( ती कथा माझी स्वतःची आहे हें मात्र मीं सांगितलें नाहीं. ) माझ्या दृष्टीनें त्या कथेंत सामाजिक अर्थ कांहीं नाहीं. व्हिलेझना त्या कथेंतली कल्पना आवडली, पण त्या कथेला सामाजिक अर्थ आहे हा आग्रह मात्र त्यांनीं सोडला नाहीं.

* * *

ग्रिगॉर व्हिलेझशीं बोलतांना माझी थोडी पंचाईत झाली. त्यांना इंग्रजी येत नव्हतें, आणि आमच्या दुभाष्याला वाङ्मयीन प्रश्नांनीं कधीं ओढ लावली असेल असें चुकूनसुद्धां वाटलें नाहीं. वाङ्मयीन चर्चेची एक विशेष भाषा असते. ती वापरून बोललें तरच चर्चेला रंग भरतो आणि तिला अर्थ प्राप्त होतो.

तें अशक्य झालें – तरी पण कांहीं ठोकळ प्रश्न विचारतां आले.

मी आधुनिक काव्याबद्दल – नव-काव्याबद्दल – विचारलें.

युगोस्लाव्हिआंत युद्धापूर्वीपासून नवकाव्य लिहिलें जातें असें त्यांनीं मला सांगितलें.

“ तें जन्तुवादी आहे काय ? ” मीं विचारले. माझ्या ह्या प्रश्नाचें मर्म मराठींतील नवकाव्याविषयींचे वाद माहीत असणाऱ्यांच्या तत्काळ ध्यानांत येईल.

“ नाहीं – नवकाव्य जन्तुवादी असण्याचं कारण नाहीं. आमचं नवकाव्य कम्युनिस्ट कवींनीं लिहिलेलं आहे. ”

“ तुमच्या स्वातंत्र्ययुद्धाचा तुमच्या काव्यावर काय परिणाम झाला ? लोकगीतांना वगैरे उत्तेजन मिळालं असेल नाहीं ? ”

“ अर्थात्. युद्धकाळीं कवींनीं लोकगीतं, संग्रामगीतं, स्वातंत्र्यगीतं, देशभक्तिपर गीतंच मुख्यतः रचलीं. पण आतां निसर्ग, प्रेम इत्यादि विषयांना त्यांचं महत्त्व प्राप्त होत आहे. ”

दुभाष्यामार्फत वाङ्मयीन चर्चा कठिण झाल्यामुळें मीं जरा दूरान्वयाचे प्रश्न विचारले :

" लेखकांना लिखाणावर जगतां येतं का ? "

" नाहीं, " व्हिलेझ म्हणाले, " बहुतेकांना नाहीं. त्यांना प्रकाशनसंस्थांत सल्लागार, पुस्तक-परीक्षक, किंवा वर्तमानपत्रांत समीक्षक म्हणून काम करावं लागतं. पुष्कळ लेखक पत्रकार बनतात. कांहींना प्रुफंही वाचावीं लागतात. इतर कांहींना लेखनाशीं संबंध नसलेलेही उद्योग करावे लागतात. "

" परकीय वाङ्मयांतून बरींच भाषांतरं होत असतात काय ? "

" होय. बरींच. "

" साधारण कोणकोणते परकीय लेखक इथं आवडते आहेत ? "

" अनेक — शेक्सपीअर, पुश्किन, टॉलस्टॉय, दोस्तोव्हस्की, डिकन्स ... "

' दोस्तोव्हस्की ' हें नांव अर्थपूर्ण आहे. रशियांत दोस्तोव्हस्कीला मज्जाव आहे.

" आणि आधुनिकांत कोण ? "

" थॉमस वूल्फ, फॉकनर, हेमिंग्वे, जॉन डॉस पॅसास, ऑडेन, स्पेण्डर, टी. एस. इलियट, जीं पॉल सार्त्रे, काफ्का, आन्द्रे जीद, प्राउस्त, थॉमस मॅन ... "

" रिल्के हा तुमच्या कवींचा कितपत आवडता आहे ? " आधुनिक युरोपियन कवींवरची रिल्केची पकड ध्यानांत घेऊन मीं विचारलें.

" रिल्केचीं भाषांतरं तर युद्धापूर्वीपासून होत होतीं. "

ह्या क्लबांत बसून ह्या कवीशीं गप्पा मारतां मारतां माझें मन एका निराळ्या विचाराला स्पर्श करीत होतें. ह्या क्लबांतलें फर्निचर, भिंतीवरचीं तैलचित्रें, दारांवरचे पडदे, खाण्यापिण्याचे पदार्थ, सारें कांहीं इतकें उंची आणि वैभवपूर्ण होतें ! पत्रकारांच्या क्लबांत असेंच वैभव आढळलें होतें. कम्युनिस्ट राज्यांत ग्रंथकार व लेखक राज्यकर्त्यांवर कां भाळतात, ह्याचें हें एक प्राथमिक दर्शन होतें. पण हें समाधान त्यांच्या अंतरंगाला भिडतें का ?

* * *

युगोस्लाव्हिआच्या मुक्कामांत मला लेखकांना भेटून वाङ्मयाची चर्चा करण्याची आणि ह्या प्रश्नाचें अंतिम उत्तर मिळविण्याची फारशी संधि आणि अवसर मिळालाच नाहीं.

पण जी कांहीं थोडीशी माहिती मी मिळवूं शकलों ती आशादायक वाटली. युगोस्लाव्हिआंत ‘ सेन्सॉरशिप ’ नाहीं, असें अनेकांनीं सांगितलें. अर्थात् मार्क्सवादावर हल्ला चढविणारें अगर स्टॅलीनवादाचा पुरस्कार करणारें लेखाण छापण्यास कोणी प्रकाशक धजेल असें वाटत नाहीं. हा प्रश्न उपस्थित केला तर ‘ स्टॅलीनचे ग्रंथ वाचण्यास कोणी राजीच नाहीं ’ अशीं उत्तरें मिळतात, पण त्यांचा पोकळपणा उघड आहे. पुस्तकांच्या दुकानांत मार्क्स, एंगल्स, लेनिन, प्लेखानॉव्ह ह्यांचे ग्रंथ प्रामुख्यानें दिसले, पण स्टॅलीनच्या ग्रंथांचें दर्शन अशक्य होतें. ट्रॉट्स्की अगर बुखारिन ह्यांचेही ग्रंथ दिसले नाहींत. सेन्सॉरशिप नसतांना हें शक्य होतें ह्याचें कारण कम्युनिस्ट राष्ट्रांत हवें तें सार्वत्रिक वातावरण निर्माण करण्यांत राज्यकर्ते वाकबगार असतात हेंच दिसतें.

पण ह्या वातावरणांत इतर कम्युनिस्ट राष्ट्रांत कल्पनेच्याही पलीकडे गेलेले वाङ्मयीन वादविवाद बिनतक्रार होऊं शकतात हाच त्याचा आशादायक विशेष आहे. उदाहरणार्थ, युगोस्लाव्हिआंत ‘ लिटररी जर्नल ’ आणि ‘ टेस्टिमनी ’ नांवाचीं दोन वाङ्मयीन पाक्षिकें आहेत. ( दोघांचाही खप दहा हजारांवर आहे. ) दोनही कम्युनिस्ट पक्षाच्या ‘ बोर्बा ’ ह्या मुद्रणालयांत छापलीं जातात. ह्या दोन नियतकालिकांत अविरत युद्ध सुरू असतें. ‘ लिटररी जर्नल ’ हें कम्युनिस्ट पक्षाचें मुखपत्र आहे. वाङ्मयांत सामाजिक परिस्थितीचें प्रतिबिंब पडलेंच पाहिजे असा त्याचा आग्रह असतो. उलटपक्षीं, ‘ टेस्टिमनी ’ची ठाम भूमिका अशी आहे, कीं वाङ्मय स्वतंत्र असलें पाहिजे ; तें आशावादी असेल अगर निराशावादी असेल, व्यक्तिनिष्ठ असेल नाहीं तर वस्तुनिष्ठ ; लेखकाची जशी प्रकृति अगर धोरण असेल तसें तें असलें पाहिजे.

कवि हा एक विचित्र पक्षी आहे ( Poet is a queer bird ) असे उद्गार कार्ल मार्क्सनें एकदां काढले होते. त्याचें मर्म युगोस्लाव्हिआनें ओळखलेलें दिसतें. ज्या प्रदेशांत मस्त वृक्षांबरोबर सुकोमल लतावल्लरींचीही वाढ होते तेथलें हवापाणी निसर्गाच्या सर्वांगीण विकासास अधिक अनुकूल असतें हें उघड होय. कवि आणि कलावंत ह्या अतिशय संवेदनाक्षम प्रकृतीच्या व्यक्ति असतात. त्यांच्या विकासास आणि कार्यास युगोस्लाव्हिआंत ( रशियादि राष्ट्रांच्या मानानें किती तरी अधिक ) अवसर मिळतो हा माझ्या दृष्टीनें तेथील जीवनाचा एक फार आकर्षक विशेष होय.

: १२ :

झाग्रेब शहराचा पहिला संस्कार माझ्यावर झाला तो त्याच्या सुंदर, आधुनिक, युरोपियन इमारतींचा — समृद्ध इमारतींचा.

ह्या साऱ्या इमारतींनीं — स्वच्छ, सुसंस्कृत इमारतींनीं — ह्या शहराला जी शोभा आणि वैभव प्राप्त करून दिलें आहे तें एकदम मनावर ठसतें. एकानें सांगितलें, हें शहर ऑस्ट्रियन लोकांनीं बांधलेलें आहे; आणि त्यांच्या जीवनाची आणि संस्कृतीची छाप ह्या शहरावर आहे.

कां नकळे, पण व्हिएन्ना शहराचा एक विशिष्ट काल्पनिक संस्कार (बहुधा सिनेमांतील दृश्यें पाहून) माझ्या मनावर उमटलेला होता, त्याच्याशीं हें जुळत होतें.

ह्या साऱ्या इमारती माझ्या स्थूल दृष्टीला दगडाच्या वाटल्या, आणि तीन लाख वस्तीचें हें छोटें शहर खरोखर किती समृद्ध आहे असें वाटलें. ऑस्ट्रियन लोक येथें राज्य करून गेले. त्यांनीं ह्या प्रदेशाची लूटही भरपूर केली असेल. पण साम्राज्यवादी इमारतीच्या वगैरे रूपानें आपलें थोडेंबहुत वैभव मागें ठेवून जातातच.

पण एका इमारतीच्या कोपऱ्यावरचा गिलावा उडून गेला होता, आणि आंतील विटांचे — अगतिक भासणाऱ्या विटांचें — दर्शन झालें, आणि माझा भ्रमनिरास झाला. ऑस्ट्रियन साम्राज्यवाद्यांचे वैभव दर्शनीयच अधिक म्हणायचें. त्यानंतर इमारत पाहिली कीं नजर, कोठें गिलावा झडला आहे कीं काय, आंतील विटांचें दर्शन होतें आहे कीं काय, पाहूं लागे — आणि तसें दर्शन एकंदरीनें बरेंच झालें!

ह्या विटांच्या दर्शनांत प्रतीकात्मक अर्थही असेल. ऑस्ट्रियन संस्कृतीचे बरेच संस्कार येथील जीवनावर झालेले आहेत, पण तिचा आत्म्याला स्पर्श कितपत झाला हा प्रश्नच आहे.

पण ऑस्ट्रियन राज्यकर्त्यांनीं ह्या शहराला एक प्रकारचें वैभव प्राप्त करून दिलें आहे ह्यांत शंका नाहीं. आमचें हॉटेल एस्प्लेनाड हीच ह्या वैभवाची एक प्रभावी साक्ष होती. हॉटेल एस्प्लेनाड हें सबंध बाल्कनमध्यें सर्वांत भव्य आणि

प्रचंड असें हॉटेल आहे. त्याच्याहूनही प्रचंड असें हॉटेल बांधण्याचा प्रयत्न, नव्या कम्युनिस्ट राजवटींत, बेल्ग्रेड शहराच्या बाहेर, झामून भागांत झाला; पण तो अर्धवट सोडून देण्यांत आलेला आहे. आज तेथें इमारतींचे दोन अवाढव्य सांगाडे तेवढेच दिसतात.

हॉटेलची भव्य इमारत आणि त्याचें विस्तृत आवार मला जातांक्षणीं जाणवलें नाहीं, कारण रात्रीं दोन वाजतां मीं त्यांत पाऊल टाकले. पण आंत प्रवेश केल्याबरोबर तेथलें कांहींसें जुनें पण भव्य आणि मजबूत फर्निचर हॉटेलच्या वैभवाची पाहुण्यांना ओळख करून देऊं लागतें.

जमिनीवर पसरलेले गालिचे, जिन्याच्या पायऱ्यांवर पसरलेलीं उंची तरटें, ठिकठिकाणीं लावलेले मोठे विशाल आरसे, नोकरांच्या अंगावरचे कापीव युनिफॉर्म, खोलींतलें उंची फर्निचर, पलंगावरच्या रेशमासारख्या मऊ लुसलुशित गाद्यागिरद्या, भोजनगृहांतले बिल्वरी बशापेले, नृत्यगृहांतलीं झुबकेदार झुंबरें, आणि नोकरांची अगत्याची शिस्त इत्यादींनीं ह्या वैभवाचें चित्र पुरें केलें.

हें वैभव ताजें नाहीं, सळसळतें नाहीं; त्यावर एक प्रकारचा बुरसट तवंग होता; पण एका काळीं हें हॉटेल म्हणजे अमीरउमरावांच्या आणि श्रीमंतांच्या सुखासीन विश्रांतीचें समृद्ध साधन कसें असेल ह्याची तत्काळ प्रतीति आली. भोजनगृहांत जे लोक दिसले आणि नृत्यगृहांत नृत्यासाठीं ज्या व्यक्ति जमा होत, त्यावरून आजच्या कम्युनिस्ट अर्थव्यवस्थेच्या तंग कालांतही हें हॉटेल म्हणजे विलासी व्यक्तींचें आश्रयस्थान असावें, असें वाटलें.

* * *

झाग्रेब शहरांत ठिकठिकाणीं जीं उद्यानें आहेत त्यांच्यामुळें त्याला 'हरित नगर' असें नांव प्राप्त झालेले आहे. मी गेलों तेव्हां अर्थात् झाडांवर लाल पिवळी मायाच चढली होती, पण पावसाचा हंगाम असल्यामुळें जमिनीवर 'हिरवे हिरवे गार गालिचे' पसरलेले दिसले. पार्लमेंटकडे जाणारा रस्ता एका उद्यानाच्या बाजूनेंच जात होता. इटलींतील झाडांच्या माफकपणाचे माझ्या मनावरचे प्रथम संस्कार रोममधील बागांतील प्रचंड वृक्षांनींही पुरेसे पुसून निघाले नव्हते. त्यामुळें झाग्रेबच्या उद्यानांतील वृक्षांचे आकार पाहून मला नवल वाटलें. माझ्याबरोबर विएस्निकचा वार्ताहर होता. तो म्हणाला, "आमच्याकडे पाऊस अधिक पडतो, आणि आमची जमीन अधिक समृद्ध आहे."

पण झाडाचें खरें वैभव मला युनिव्हर्सिटीशेजारच्या बॉटनिकल गार्डनमध्यें पाहायला मिळालें. ह्या बागेंतलीं झाडें जरा मोकळेपणानें, ऐसपैस वाढलीं होतीं. त्यांना मानवानें आकार दिलेला नव्हता तर निसर्गानें दिलेला होता. ह्या बागेंत बागवानानें आपला हात जरा जपून फिरवला होता, आणि म्हणून त्या मानवाच्या उद्योगानें संस्कारलेल्या शहरांत निसर्गाचें स्वाभाविक हास्य ह्या बागेवर फुलल्यासारखें वाटलें.

हा फुलांचा हंगाम खात्रीनें नव्हता. पण कांहीं फुलें दिसलीं. मीं माझ्या बरोबर आलेल्या विद्यार्थ्याला फुलांचीं नांवे विचारलीं. पण त्यानें नांवें सांगितलीं तीं मला येत असलेल्या इंग्रजीलाही अतिशय अपरिचित वाटलीं. झाडांवर अर्थात् लॅटिन नावांच्या पाट्या होत्या. पण – that was Latin to me!

झाग्रेब शहरांत ठिकठिकाणीं मोठमोठे पुतळे आहेत. ते शिल्पकलेचे उत्कृष्ट नमुने आहेत. आणि ह्यांत कांहीं नवल नाहीं, कारण त्यांतले बरेचसे विख्यात शिल्पकार आयव्हान मेस्ट्रोविच ह्यांचेच आहेत. रेल्वे स्टेशनमधून बाहेर पडलें कीं टॉमिस्लाव्ह स्क्वेअर दृष्टीस पडतो, त्यांत राजा टॉमिस्लाव्ह ह्याचा अश्वारूढ भव्य पुतळा आहे. तो क्रोएट शिल्पकार फ्रान्जेश ह्यांचा आहे. युगोस्लाव्ह ॲकेडमीच्या बाहेर तिचे संस्थापक बिशप स्ट्रॉसमेयर ह्यांचा पुतळा आहे. हा मेस्ट्रोविच ह्याचा आहे. नॅशनल थिएटरच्या समोर मेस्ट्रोविच ह्यांची जी एक कलाकृति आहे ती तर विसरणें कधीं शक्यच नाहीं. ही कलाकृति म्हणजे 'जीवनाची विहीर'. मेस्ट्रोविचचें खरें शिल्पकार्य मॉडर्न आर्ट गॅलरीमध्यें दिसतें. पण मेस्ट्रोविचची कला केवळ शिल्पकृतीपुरती मर्यादित नाहीं. ते जसे शिल्पकार आहेत तसेच थोर आर्किटेक्टही आहेत. ज्या पॅव्हिलिअनमध्यें 'नॅशनल लिबरेशन म्युझियम' आहे तो पॅव्हिलिअन मेस्ट्रोविचच्या प्रतिभेनेंच उभारलेला आहे.

झाग्रेब हें अर्थात् क्रोएशिअन संस्कृतीचें माहेरघर आहे. येथें विद्यापीठें आणि प्रयोगशाळा ह्यांची गर्दी तर आहेच, पण नाट्यगृहें आणि कलामंदिरेंही खूप आहेत. झाग्रेब शहरांत एकंदर सहा नाट्यगृहें आहेत आणि त्यांना सदैव 'हाऊस फुल'चें भाग्य लाभतें. झाग्रेबमध्यें कसलें ना कसलें तरी प्रदर्शन सुरू असतेंच. मीं दोन प्रदर्शनें पाहिलीं. एक चांदीसोन्याच्या कामाचे आणि दुसरें छायाचित्रांचें. चांदीसोन्याच्या प्रदर्शनांतील बहुतेक वस्तु धार्मिक स्वरूपाच्याच होत्या. धार्मिक ग्रंथांतल्या रंगमय चित्रांत जें सुवर्णाचें काम होतें तें कमालीचें सूक्ष्म, नक्षीदार आणि कलात्मक वाटलें.

झाग्रेब शहरांत आंतरराष्ट्रीय प्रदर्शनें नेहमींच भरत असतात. ह्या आंतरराष्ट्रीय प्रदर्शनांची सुरुवात १९०९ सालीं झाली. त्यासाठीं मुद्दाम एक भव्य पॅव्हिलिअन् उभारण्यांत आलेला आहे. १९५० सालीं तेथें एक व्यापारी प्रदर्शन भरलें होते. त्यांतल्या कांहीं वस्तु अद्याप दिसत होत्या. सध्यां तेथे छायाचित्रांचें आंतरराष्ट्रीय प्रदर्शन सुरू होतें.

अनेक राष्ट्रांतील छायाचित्रें ह्या प्रदर्शनासाठीं आलीं होतीं. सर्वांत अधिक अर्थात् युगोस्लाव्हिआंतलीं होतीं. सर्वांत उत्कृष्ट चित्रें हॉंगकॉंग, बेल्जियम, लुक्झेंबर्ग, ब्राझील आणि आर्जेन्टायना येथील होतीं. सर्वांत दरिद्री अमेरिकन होतीं ! भारतांतलीं सुमारे पंचवीस होतीं; त्यांत भट, गोडबोले, कानिटकर, रुस्तुमजी, खान ह्यांचीं अर्थातच डोळ्यांत भरलीं.

त्या पॅव्हिलिअनपाशीं मुद्दाम ध्वजस्तंभ उभारून प्रदर्शनांत भाग घेणाऱ्या सर्व राष्ट्रांचीं राष्ट्रीय निशाणे लावण्यांत आली होतीं. त्यांत भारतीय ध्वज जो होता त्याचे रंग चुकीचे होते. नारिंगी, शुभ्र आणि हिरवा ह्यांच्या ऐवजीं पिवळा, शुभ्र आणि हिरवा असे होते. नीलचक्र मात्र बरोबर होते !

* * *

छायाचित्रांचें प्रदर्शन पाहून आल्यानंतर मी प्रोकोफिव्हचें ‘ रोमिओ ज्युलियेट ’ हें नृत्यनाटक पाह्यला गेलों. हा एक अपूर्व अनुभव होता. आंग्ल प्रतिभा, रशियन संगीत आणि युगोस्लाव्ह नृत्य ह्यांचा तो मनोहर संगम कोणाचीही चित्तवृत्ति मुग्ध करण्यास समर्थ होता. त्या नृत्यनाटकांत काम करणाऱ्या नटनट्यांचें शरीरसौष्ठव लक्षवेधक होते. अंगठ्याच्या टोंकावर उभें राहून तरल नृत्य करणाऱ्या त्या नृत्यागना पाहिल्या कीं शापभ्रष्ट भूमीला शक्य तितका कमी स्पर्श करून वावरणाऱ्या पऱ्यांचा नाच आपण पाहात आहोंत कीं काय असें वाटतें. पाश्चात्य नृत्यांत अंगठ्यावर ताठ उभें राहण्यास फार महत्त्व दिसतें !

एथ्नोग्राफिक म्युझियम आणि मॉडर्न आर्ट गॅलरी ह्यांतला अनुभव अविस्मरणीयच म्हटला पाहिजे. एथ्नोग्राफिक म्युझियममध्यें क्रोएशिआंतील जीवनाचें भौतिक–सांस्कृतिक दर्शन घडविण्याचा प्रयत्न केलेला आहे. शेतकरी काम करतांना कोणतीं अवजारें वापरतात, ते घरांत कोणत्या वस्तु व जिन्नस वापरतात, त्यांच्या घरांचें अंतरंगदर्शन कसें असतें, क्रोएशिआंतला राष्ट्रीय पोषाख कोणता, क्रोएशिआंतील ग्रामोद्योगानें कोणत्या वस्तु निर्माण

होतात, क्रोएशिअन लोकांचे हस्तव्यवसाय कोणते वगैरे गोष्टींचें प्रात्यक्षिकांच्या स्वरूपाचें प्रदर्शन ह्या म्युझियममध्यें आहे. हा म्युझियम मला दाखवितांना माझ्या बरोबर आलेल्या विद्यार्थ्यांच्या तोंडून जे उद्‌गार पडत होते, एकेक वस्तु मला दाखवितांना आणि तिचें वर्णन करतांना त्याच्या आवाजांत ज्या भावना भरत होत्या त्या पाहून ह्यांना आपल्या राष्ट्राबद्दल, राष्ट्रीय जीवनाबद्दल, संस्कृतीबद्दल, किती आदर वाटतो, अभिमान वाटतो, ह्याची सहज प्रतीति येत होती. युगोस्लाव्हिआंतील निरनिराळ्या प्रजासत्ताक राष्ट्रांना त्याची वैशिष्ट्यपूर्ण संस्कृति आहे असें मानलें जातें आणि तिचा अभिमान बाळगणें हें फुटीरपणाचें लक्षण मानलें जात नाहीं. प्रादेशिक संस्कृतीविषयींची आत्मीयता विशाल राष्ट्रीय ऐक्यास मारक आहे असें कोणी मानीत नाहीं !

मॉडर्न आर्ट गॅलरीच्या प्रवेशद्वारांतच ॲटन ऑगस्टिनचिचचा टिटोचा पुतळा लागतो, आणि लगेच आंत मेस्ट्रोविच, फ्राने क्रिश्चिच प्रभृतींच्या शिल्पकृतींचें दर्शन होतें. ह्या शिल्पकृति पाहाण्यासाठीं तरी मॉडर्न आर्ट गॅलरींत आलें पाहिजे असें वाटलें. मेस्ट्रोविच हे कम्युनिस्ट नाहींत, ते अमेरिकेत राहतात तरीसुद्धा त्यांच्या कलेबद्दल युगोस्लाव्हिआंत प्रचंड अभिमान दृष्टीस पडतो. अर्थात् जगद्विख्यात कलावंताबद्दल अभिमान वाटणें साहजिकच आहे. पण आपल्या राज्यांत राहावयास नकार देणाऱ्या कलावंताबद्दल जो एक संताप हुकूमशाही राष्ट्रांत दिसतो त्याचा मागमूसही येथें दिसला नाहीं. उलट टिटोचा पुतळा बनविणारा ऑगस्टिन्चिच हा स्वतःला मेस्ट्रोविचचा शिष्य समजतो ह्याचा वारंवार अभिमानानें उल्लेख करण्यांत आला.

मला चित्रकला आणि शिल्पकला ह्यांतलें फारसें कांहीं कळत नाहीं, पण मॉडर्न गॅलरींत निकोला मासिच ह्यांचीं प्राणिचित्रें, टॉमिस्लाव्ह क्रिझमन ह्यांचीं आत्मचित्रें, व्लॅडिमिर बेसिच् ह्यांचीं निसर्गचित्रें, मिरोस्लाव्ह कार्लेव्हिच् ह्यांचें बागेंतील दृश्य, इत्यादि चित्रकलेचे नमुने आणि ‘युरोपा’, ‘व्हायलिन वादक’ ह्यांसारख्या शिल्पकृति पाहतांना मी स्वतःला बराच विसरलों. क्रिस्तो हेगेडिसिच् आणि आयव्हान जनरॅलिच ह्यांचीं चित्रें पाहून ह्या कम्युनिस्ट राष्ट्रांतही नवकलेचे सृजनशील अंकुर फुटतात ह्याची प्रतीति आली.

* * *

झाग्रेब शहरांत हिंडायला एक प्रकारचा आंतरिक आनंद वाटतो. शहर अतिशय नीटस आणि स्वच्छ आहे. व्यापारी केंद्र असूनही एक प्रकारची नीरव

शांतता आहे. दुकानांत एक प्रकारची पूर्तता नांदत असलेली भासते. रिपब्लिकन स्क्वेअरमध्यें थोडा वेळ उभें राहिलें म्हणजे हें शहर खरेंच कसें आधुनिक युरोपियन आहे ह्याची प्रतीति येते. पण मध्येंच एखादा ग्रामीण शेतकरी आढळतो. शहरांत खरेदीसाठीं तो आलेला असतो. जितके म्हणून जिन्नस डोक्यावर, खाकेस वगैरे लावून नेतां येतील तेवढे तो नेत असतो. त्याचे ऐसपैस राष्ट्रीय कपडे अशा वेळीं विशेष लक्ष वेधतात. शहरांतील तरुण असले कपडे वापरीत नाहींत, पण राष्ट्रीय पोषाख म्हणून त्यांचा अभिमान मात्र त्यांना फार वाटतो.

पार्लमेंटगृहाकडे जातांना रस्त्यांत टेकडीवर एक छोटेंसें चॅपेल आढळलें. केव्हांही गेलें तरी तेथें दोन चार व्यक्ति गुडघे टेकून प्रार्थना करीत असलेल्या दिसत. सायंकाळीं मेणबत्त्या पेटत. पलीकडेच सेंट मार्कचे चर्च होतें. आज कम्युनिस्ट राष्ट्रांत ह्या चर्चेला एक निराळेंच महत्त्व आलेलें आहे. कारण आंतलें शिल्प आयव्हॅन मेस्ट्रोविच ह्यांचे आहे आणि भिंतीवरचीं चित्रें जोझा क्लिया-कोविच ह्यांचीं आहेत. पण चर्चच्या छपरावर रंगीत कौलांच्या साहाय्यानें क्रोएशिआ, डाल्मेशिआ आणि स्लोव्हेनिआ ह्यांचीं जीं राष्ट्रीय मोजाइक बोधचिन्हें आढळलीं त्यांचें कौतुक विशेष दिसलें.

पण असल्या ठिकाणाचें खरें महत्त्व आहे तें निराळेंच. सेंट मार्कच्या चौकांत मधोमध एक विशिष्ट दगड बसविलेला आहे. तेथें सोळाव्या शतकांत सरंजामांविरुद्ध बंड केलेल्या मातिया गुबेत्सला फांशी देण्यांत आलें होतें. ह्या दगडावर उभें करून त्याच्या डोक्यावर धगधगत्या लाल लोखंडाचा मुकुट ठेवण्यांत आलेला होता. कम्युनिस्ट युगोस्लाव्हिआचा गुबेत्स हा एक राष्ट्रीय वीरपुरुष बनलेला आहे.

ह्या पुराण्या शहरांत इतिहासाचा जीवन्त साक्षात्कार घडविणारीं अशीं किती तरी चिन्हें आहेत. ( फक्त तो घडण्यासाठीं इतिहास माहीत असायला हवा, आणि माझी नेमकी तीच पंचाईत होती ! ) ज्या सभागृहांत आमची परिषद् भरली होती तें सेंट मार्कच्या चौकाला लागूनच आहे. त्याचप्रमाणें बॅकारिचची ज्या राजवाड्यांत मीं मुलाखत घेतली तोही येथेंच आहे. अशा सर्व ऐतिहासिक स्मृतिस्थळांना भेट देण्याइतकी मला फुरसतही नव्हती, आणि त्यासाठीं अवश्य असलेलें पूर्वज्ञानही नव्हतें.

: १३ :

झाग्रेबहून विमानानें मी बेल्ग्रेडला निघालों. विमानाचें नावीन्य एकदां ओसरलें कीं विमानाचा प्रवास हें केवळ एक वेळ वांचविण्याचें साधन ठरतें. खालीं नवनवी भूमि येत असली तरी तिचें दूरदर्शन साधारणपणें त्याच त्याच संस्कारांना जन्म देतें. त्यामुळें कंटाळाच येतो.

हाही प्रवास त्याला अपवाद ठरण्याचें कारण नव्हतें. शिवाय झाग्रेब सोडल्यावर लवकरच आम्ही सपाट प्रदेशांत प्रवेश केला. त्यामुळें लांबवर अजगरासारखी पसरलेली ' सावा ' नदी आणि सर्बियाच्या सुपीक प्रदेशांतील समृद्ध शेती पाहाण्याखेरीज दुसरें कांहीं फारसें नव्हतेंच.

हो, एक नवीन गोष्ट मात्र आढळली. सर्बियांतल्या खेडेगांवांची रचना जरा विशेष दिसली. साधारणपणें खेडेगांवाच्या रचनेंत एक प्रकारची स्वैरता असते. ग्रामरचनेच्या पूर्वयोजनेनें त्यांची बांधणी जखडलेली नसते. त्यामुळें खेडेगांवच्या रचनेंत ( विशेषतः डोंगराळ भागांतील रचनेंत ) एक प्रकारचें मुक्त सौंदर्य आढळतें. पण सर्बियामधील खेड्यांत प्रथम आडवेउभे रस्ते आणि नंतर रस्त्यांच्या कांठानें शिस्तवार बांधलेलीं घरें आढळलीं. त्यामुळें विमानांतून खेड्याचें दर्शन सोंगट्यांच्या पटासारखें आढळलें ! घरें म्हणजे एकमेकांच्या साहाय्यास ( कीं शह देण्यास ! ) उभी असलेली सोंगट्यांची फौज !

बेल्ग्रेडचें देशी नांव बिओग्राड म्हणजे शुभ्रनगर. पण ह्या नांवानें जें सौंदर्य सूचित होतें तें मात्र ह्या शहरांत नाहीं. विमानतळावरून शहरांत जातांना तर बिओग्राड ह्या नांवावरून चुनखडीच्या प्रदेशाचीं चित्रेंच माझ्या मनःचक्षूंसमोर ( एकीकडे चर्मचक्षूंना बेल्ग्रेडबाहेरील प्रदेशाचें दर्शन होत असतांना ) आकारूं लागलीं.

डाव्या बाजूला दोन प्रचंड इमारतींचे जे सांगाडे दिसले त्यांनीं मनावरचा हा भाव अधिकच दाटला. ह्या दोन इमारती म्हणजे दारें, खिडक्या, भिंती नसलेले दोन अतिप्रचंड सांपळेच होते. त्यांच्यावरचें काम बंद होतें ; आजूबाजूला अस्ताव्यस्त पडलेल्या सामानाची पूर्ण उपेक्षा सुरू होती; कॉंक्रीटच्या खांबा-तुळयावरचीं लाकडाचीं वेष्टणें मोडलेल्या हाडांवरच्या बँडेजसारखीं दिसत

होतीं – आणि ह्या प्रचंड इमारतींतला पोकळपणा आणि सभोंवतालचें सुन्न भयाण वातावरण आपल्या अंगावर चाल करून येत आहे असे वाटलें. म्हणूनच हे समोरचे सांगाडे म्हणजे राक्षसांच्या अजस्र हाडांचे सांपळे तर नव्हत, असा भेदक विचार मनांत शिरला.

ह्या इमारती अशा अपूर्णावस्थेंत कां, असा मीं प्रश्न विचारला; आणि त्याला उत्तर देत असतांना माझ्या दुभाष्याला इंग्रजी धड येत नाहीं ह्याची जाणीव झाली आणि माझी विषण्णता विचित्रपणें दाटली.

त्यानें सांगितलें, " ह्या भागांत आम्ही नवें बेल्ग्रेड वसविणार आहोंत. ह्या दोन इमारतींपैकीं एकीचे प्रचंड हॉटेल होणार आहे, व दुसरीची सरकारी कचेरी. पण सोव्हिएट रशियाशीं बेबनाव झाल्यापासून आम्हांला ह्या इमारतीला अवश्य असलेला मालच पुरेसा मिळेनासा झाला. "

मीं मनांत म्हटले, " म्हणजे पाश्चात्य राष्ट्रांची पुरेशी मदत होत नाहीं. "

हा विचार माझ्या मनांत येत आहे तोंच तो म्हणाला, " आणि आतां आम्हांला मोठमोठीं शहरें महाग पडतात हें पटूं लागलें आहे. "

अलीकडे मात्र एका पुस्तकांत वाचल्याचें आठवतें कीं, येथल्या जमिनींत मोठमोठ्या इमारती पेलण्याची ताकद नाहीं असें आढळून आल्यामुळें नव्या बेल्ग्रेडचा बेत सोडून देण्यांत आला आहे. हें खरें असेल तर सोव्हिएटच्या प्रभावाखालीं असतांना भव्यतेच्या वेडानें युगोस्लाव्हिआच्या कम्युनिस्ट नेत्यांनीं अनेक प्रचंड योजना कशा आंखल्या असतील, सुरू केल्या असतील आणि आर्थिक नुकसान करून घेतलें असेल ह्याची कल्पना येते.

भांडवलशाहीच्या अर्थव्यवहारांत बजबजपुरीमुळें नासधूस होते. कम्युनिस्ट अर्थव्यवहारांतही नासधूस होते – पण अशी !

* * *

बेल्ग्रेड शहराचा भागच असा आहे, कीं त्याच्यावर शहर वसविण्याची कल्पना मनांत येण्यास अलौकिक प्रतिभेची मुळीं आवश्यकताच नाहीं. एका लांबलचक टेकडीच्या पायथ्याशीं सावा आणि डॅन्यूब ह्या नद्यांचा संगम झालेला आहे आणि ह्या टेकडीवर बेल्ग्रेड शहर अस्ताव्यस्त पसरलेलें आहे. इतिहासांत ह्या शहरावर अनेक राज्यकर्त्यांनीं ताबा मिळविलेला आहे आणि त्यांनीं ह्या

शहरांत स्वतःला हवी तशी ( अक्षरशः हवी तशी ) भर टाकलेली आहे – आणि पुराचें पाणी पसरावें तसें हें शहर पसरलें आहे !

माझी उतरण्याची सोय हॉटेल एक्सेल्शिअरमध्यें केली होती. पांचव्या मजल्यावरील खोलीची खिडकी उघडल्याबरोबर शेजारच्या गल्लींतलें कर्कश ओरड्यें संगीत खोलींत शिरलें. त्या दिवशीं ह्या संगीताचा मारा सारा दिवसभर अखंड सुरू होता.

मला त्याचा अर्थ समजेना. लोकांना कसल्यातरी, संगीताच्या म्हणा, मिरवणुकीच्या म्हणा, सभेच्या अगर प्रदर्शनाच्या म्हणा, कार्यक्रमांना एकसारखें बांधून ठेवून विचार म्हणून करायला अवसर द्यायचा नाहीं हे जें हुकूमशाही राष्ट्रांचें एक ठराविक तंत्र असतें, त्यांतला तर हा प्रकार नाहीं, हा विचार एकसारखा मनांत येत होता—

पण दुसऱ्या दिवशीं तें संगीत बंद झालें. कोणत्या तरी संस्थेच्या वार्षिक उत्सवानिमित्त तें सुरू होतें.

* * *

झाग्रेबप्रमाणेंच येथेंही ऑफिसें सकाळीं ७ – ७॥ लाच सुरू होतात आणि दुपारीं २। – २॥ वाजतां बंद होतात. ही व्यवस्था मुद्दाम केलेली आहे. त्यामुळें दुपारीं १२ – १ वाजतां घरीं जेवायला जाण्याचें कारण पडत नाहीं, आणि वाहतुकीवर अकारण ताण पडत नाहीं. लोक सकाळीं न्याहारी करून कचेरींत येतात आणि दुपारीं काम संपवून घरीं जेवायला जातात. त्यामुळें पाश्चात्य राष्ट्रांत दुपारचें जेवण हॉटेलांत उरकण्याची जी पद्धत आहे ती युगोस्लाव्हिआंत फारशी नाहीं.

चार साडेचारच्या सुमारास बहुतेक सारे लोक फिरायला निघतात. ह्यावेळीं सारे फूटपाथ अगदीं माणसांनीं फुललेले दिसतात. एकमेकांना धक्के मारल्याशिवाय जाणें जवळपास अशक्यच ठरतें.

झाग्रेब–बेल्ग्रेडच्या ( विशेषतः बेल्ग्रेडच्या ) रस्त्यांवरून भटकतांना मला एक प्रश्न वारंवार पडला : ‘ मला दिसणारे हे लोक सारेच इतके तरुण कसे ? म्हातारे लोक ह्या देशांत नाहींतच कीं काय ? कीं ते स्वतःला घरांत कोंडून घेतात ? ’

युगोस्लाव्हिआ हें अनेक अर्थांनीं तरुणांचें राष्ट्र आहे. तेथील लोकांचा उत्साह, त्यांचा उद्योगीपणा, खेळकर आतिथ्यशील वृत्ति, जीवनाकडे पाहण्याची स्वागतपर दृष्टि हीं सारीं यौवनाचीं लक्षणें तेथें नुसतीं नाचत असतात. युगोस्लाव्ह नेतृत्वही अगदीं तरुण आहे. मार्शल टिटो आणि मोशा पियादे हे दोन अपवाद वजा केले तर युगोस्लाव्हिआचे बहुतेक सारे नेते पन्नाशीच्या आंत बाहेरचे आहेत.

हा असा तरुणांचा देश असूनही, लंडन–पॅरिसमध्यें जसा छानछोकी पोषाखीपणा दिसतो तसा झाग्रेब-बेल्ग्रेडमध्यें दिसला नाहीं. पण लोक एकंदरीनें आधुनिक दिसले. विख्यात अमेरिकन लेखक जॉन गुंथर १९४८ मध्यें बेल्ग्रेडला गेला होता. तेथे मुली लिप्स्टिक वापरीत नाहींत (कारण त्यांना भांडवलशाहींतील प्रसाधनांचा तिटकारा असावा) असा अनुभव त्याने नमूद करून ठेवला आहे. पण माझा अनुभव उलट आहे. बहुतेक सर्व स्त्रिया लिप्स्टिक वापरीत होत्या. त्यांचे केस 'बॉब' केलेले होते. आणि विशेष म्हणजे नायलॉन स्टॉकिंगज् (पारदर्शक पायमोजे) बहुतेक सर्व स्त्रियांच्या पायांत दिसले. उंच टांचांचे बूट मात्र फार दिसले नाहींत. युगोस्लाव्ह स्त्रियांच्या प्रसाधनांतला साधेपणा (प्रसाधनांचा अभाव नव्हे) हें त्यांचे फार मोठें आकर्षण मला वाटलें.

* * *

झाग्रेब जितकें शांत वाटते तितकेंच बेल्ग्रेड गजबजलेलें वाटतें. अर्थात् तें राजधानीचे शहर आहे, तेव्हां तेथें अधिक उलाढाली असणारच. पण दोन शहरांतला फरक केवळ प्रमाणात्मक नाही तर गुणात्मक आहे. बेल्ग्रेडचे मोठमोठे चढते-उतरते रस्ते बहुतेक वेळां गजबजलेले दिसतात. रस्ते विशाल विस्तृत आहेत. युगोस्लाव्हिआत दररोज रात्रीं रस्ते धुऊन लख्ख करण्याची पद्धत असल्यामुळे ते अगदीं स्वच्छ दिसतात. रस्त्याच्या कांठचीं दुकानें माल आणि गिऱ्हाइकें ह्यानीं भरलेली दिसली. डिपार्टमेंटल स्टोअर्समध्यें तर प्रवेश करणेंही मुष्किलीचे होई. किंमती भरमसाट असून लोक दुकानांत अशी गर्दी कां करतात हा मला प्रश्न पडला. पण वेळ घालविण्यासाठीं बाहेर पडलेल्या लोकांना दुकानांत जाऊन मालाचे अवलोकन करीत राहणें हे करमणुकीचें एक चैतन्यपूर्ण साधन वाटत असावें.

दुकानांत पुस्तकांचीं दुकानें भरपूर दिसलीं. एक दुकान तर केवळ मुलांच्या पुस्तकांचें दिसलें. तेथे हरतऱ्हेचें, रंगीबेरंगी, सचित्र–विचित्र बालवाङ्मय

आढळलें. कांहीं दुकानें नुसतीं तंत्रविषयक पुस्तकांचीं होतीं. एका दुकानांत औद्योगिक कारखान्यांना लागणारीं यंत्रें दिसलीं. मीं मनांत म्हटलें, ' कम्युनिस्ट राष्ट्रांत सारे कारखाने सरकारच्या मालकीचे असतांना हीं यंत्रांचीं दुकानें कशाला ? ' पण जराशा वेळानें ध्यानांत आलें, कीं कारखाने आतां कामगारांच्या स्वाधीन असल्यामुळें मालाच्या खरेदी-विक्रीचा कारभार कामगारसमित्या आणि त्यांचे प्रतिनिधीच करीत असतील !

केव्हांही जा, कॉफी हाउसेस गिऱ्हाइकांनीं गजबजलेलीं दिसत. कॉफी हें युगोस्लाव्हिआचें आवडतें ( मद्यरहित ) पेय आहे. दुसरें आवडते पेय म्हणजे स्लिव्होविज् ( प्लमब्रॅंडी ). हें युगोस्लाव्हिआचें राष्ट्रीय पेय. त्यांचें आणखी एक पान अतिशय आवडतें आहे. तें म्हणजे धूम्रपान. आपल्या सिगारेट्सना लागणारा सारा तंबाखू आपल्या देशांत पिकतो हें तुम्हांला सिगारेट देतांना सांगण्यास ते विसरणार नाहींत.

बेल्ग्रेडचें जीवन फार महाग आहे. मी पाहुणा म्हणून राहात असल्यामुळें मला ती महागाई फारशी बाधली नाहीं, पण एकदा स्टेशनवरून टॅक्सी करून मी फ्रेंच वकिलातीकडे निघालों तेव्हां टॅक्सी-मीटरमधल्या आकारदर्शक आंकड्याची चपळाई बघून मला भीतिच वाटली !

* * *

बेल्ग्रेड शहरांत मोठमोठे चौक आहेतच. शिवाय कांहीं मोकळ्या जागा दिसल्या. येथें युद्धापूर्वी इमारती होत्या. युद्धांत बेल्ग्रेडवर वैमानिक मारा फार झाला. इमारतींची विद्रूप पडझड झाली. पण लंडन अगर डोव्हर येथें दिसतात तशीं पडक्या घरांचीं भुतें बेल्ग्रेडमध्यें दिसलींच नाहींत. युवकांच्या श्रमपथकांनीं पडक्या इमारतींचे ढीग साफ करून टाकले होते—आतां ह्या मोकळ्या जागांखेरीज त्या संहारक बॉम्बफेकीचें दुसरें कांहींच चिन्ह उरलें नव्हतें.

बेल्ग्रेड शहरांतही मोठमोठे पुतळे आहेतच, पण झाग्रेबमधल्या इतके मात्र नाहींत. नॅशनल असेंब्ली( स्कुपश्टिना )समोरचे अश्वदमनाचे दोन शक्तिशाली पुतळे मात्र लक्ष खेचल्याखेरीज राहत नाहींत.

ऐतिहासिक पुतळ्याबद्दल सरकारचें धोरण काय आहे असें मीं विचारलें तेव्हां माझ्या दुभाषानें, ज्यांनीं ज्यांनीं इतिहासाच्या प्रगतीस हातभार लावला त्यांचे त्यांचे पुतळे आम्हीं कायम ठेवलेले आहेत असें ठोकळेबाज मार्क्सवादी उत्तर दिलें.

मला हे पुतळे पाहण्यास, अगर कलामन्दिरांत जाण्यास फुरसतच मिळाली नाहीं, पण एका युगोस्लाव्ह चित्रपटास मात्र गेलों. पाद्रयाच्या मदतीनें चाललेल्या हेरगिरीवरचा तो बोलपट होता. तो बोलपट पाहून माझी पूर्ण निराशा झाली. मला सर्बियन भाषा येत नसल्यामुळे असेल, पण मला तरी युगोस्लाव्ह चित्रपट-कला फार मागासलेली वाटली. या चित्रांतली कथा तर गुंतागुंतीची होतीच, पण कॅमेरा, अभिनय, संपादन, दृश्यरेखाटन ह्यांपैकीं कांहींच चांगलें वाटलें नाहीं.

युगोस्लाव्हिआंत चांगले बोलपट निघत नाहींत. साहजिकच परदेशी बोलपटांवर त्यांना फार अवलंबून राहावें लागतें. रस्त्याच्या कडेला कोणत्या चित्रमंदिरांत कोणत्या भाषेंतला कोणता बोलपट चालू आहे हें दाखविलेलें असतें. ( बोलपटांच्या अवाढव्य भडक जाहिराती फारशा दिसल्याच नाहींत. ) झाग्रेब शहरांत एका पाटीवर पंधरा बोलपटांचीं नांवे होतीं, त्यांतलीं सात अमेरिकन, तीन ब्रिटिश, दोन जर्मन आणि उरलेलीं तीन फ्रेंच होतीं. एकही युगोस्लाव्ह चित्र चालू नव्हतें. रशियन बोलपटांचें अर्थात् नांवच घ्यायला नको — त्यांच्यावर कडक बहिष्कार !

* * *

आमच्या हॉटेलच्या समोर एक प्रचंड बाग होती. इतकी मोठी कीं हॉटेलमधून दृष्टीला तिचा अंत लागत नव्हता.

एक दिवस सायंकाळीं त्या बागेंत खूप लोकांची गर्दी जमली आहे आणि कित्येक लोक नाचत, ओरडत आहेत असें दिसलें.

मीं विचारलें, " हें काय चालले आहे ? "

" फूटबॉलची मॅच, " दासोविच् म्हणाला.

" मग चला, आपण पाहूं या, " मीं सुचविलें.

" अहो, मॅच येथें नाहीं — ती दूर बेल्ग्रेडच्या बाहेर आहे. येथें ह्या बागेंत रेडिओवरून त्या मॅचचा नुसता वृत्तांत ऐकू येत आहे. "

मी चकित झालों. नुसतें रेडिओवरचें वर्णन ऐकून हे लोक इतके बेहोष होतात, म्हणजे ह्यांना फूटबॉलचें वेड तरी किती असेल !

## : १४ :

मी बेल्ग्रेडला पोंचलों त्याच दिवशीं संध्याकाळीं, सावा आणि डॅन्यूब ह्यांच्या संगमाजवळील टेकडीवर स्वातंत्र्यसंग्रामाचें प्रदर्शन भरलें होतें तें पाहावयास गेलों. १९४१ सालीं मार्शल टिटोच्या नेतृत्वाखालीं युगोस्लाव्ह स्वातंत्र्यवाद्यांनीं हिटलरच्या आक्रमणाला प्रतिकार करण्यास सुरुवात केली, त्याचें दशवार्षिक स्मारक म्हणून हें प्रदर्शन भरविण्यांत आलें होतें.

* * *

त्या प्रदर्शनाचें दर्शन म्हणजे एक अपूर्व अनुभव होता. १९४१–४५ च्या दरम्यान चाललेल्या त्या संस्मरणीय संग्रामाच्या आश्चर्यकारक स्वरूपावर प्रकाश पाडणाऱ्या आणि त्याचें साक्षात् ऐतिहासिक रूप नजरेसमोर उभ्या करणाऱ्या अनेक वस्तु तेथें होत्या. त्यांत युगोस्लाव्ह स्वातंत्र्यसैनिकांनीं वापरलेलीं मोडकींतोडकीं शस्त्रास्त्रें जशीं होतीं त्याचप्रमाणें जर्मनांकडून काबीज केलेलीं अद्यावत शस्त्रेंही होतीं. ह्या दोहोंमधला तो विषम सामना होता. त्यांत युगोस्लाव्हिआचा जय झाला तो मुख्यतः त्यांच्या स्वातंत्र्यसैनिकांच्या अंतःकरणांतील शौर्य, धैर्य, ईर्ष्या, तितीक्षा, देशप्रेम इत्यादि गुणांच्या जोरावर. तें प्रदर्शन मला दाखवितांना माझ्या बरोबरच्या तरुण मित्रांच्या अंतरंगांत ज्या भावना निर्माण होत होत्या आणि ज्या उत्कट आवाजांत त्या व्यक्त होत होत्या त्यांनीं मला युगोस्लाव्हिआच्या विजयाचें अंतिम कारण ठरलेल्या त्या गुणांचें उत्कृष्ट दर्शन झालें.

* * *

त्या प्रदर्शनांत कोणकोणत्या वस्तु ठेवल्या होत्या म्हणून सांगूं!—आणि कसलें कसलें म्हणून वर्णन करूं!

प्रदर्शनाच्या प्रारंभींच युगोस्लाव्हिआच्या राजानें—किंग पीटरनें–आपल्या प्रजाजनांना जो अभिनंदनाचा संदेश पाठविला होता त्याचें फलक-दर्शन घडत होतें आणि त्याच्या शेजारींच पीटरच्या कैरोमधील विलासी वास्तव्याची कल्पना देणारीं रेखाचित्रें लावलेलीं होतीं. लोक इकडे शत्रूच्या अग्निवर्षावांत बेचिराख होत होते आणि तिकडे ऐषआरामांत वावरणारा राजा नुसते शाब्दिक संदेश पाठवीत होता!

ह्या चित्रांच्या शेजारींच हिटलरनें वेळोवेळीं काढलेले जुलमी हुकूम आणि नात्सींना प्रतिकार करण्याचा आदेश देणारीं कम्युनिस्ट पक्षानें काढलेलीं पत्रकें ठेवलेलीं होतीं. वेळोवेळीं कम्युनिस्ट पक्षानें प्रसिद्ध केलेल्या वृत्तपत्रांचे मथळेही कांहीं पोस्टर्सवर चिकटवून ठेवण्यांत आलेले होते.

त्या प्रदर्शनांत हे स्वातंत्र्यसैनिक कसले मोडकेतोडके, जुनाट छापखाने वापरीत आणि आपलें वाङ्मय छापीत ह्याचेंही प्रात्यक्षिक घडविलेलें होतें. ह्या छापखान्यांतील यंत्रें म्हणजे बहुतेक हातांनीं अगर पायांनीं चालविण्याचीं ट्रेडल् मशिन्स होतीं.

स्वातंत्र्यसैनिकांचीं यंत्रेंही बहुतेक अशींच! जुन्या बंदुका, हातबॉम्ब इत्यादींचाच भरणा होता. मोठमोठ्या नद्यांचे पूर ओलांडून जाण्यासाठीं जे तराफे त्यांनीं तयार केले होते ते पाहून मी चकितच झालों. ‘ त्यावरून आम्ही रणगाडेही नेत होतों. ’ त्या कम्युनिस्ट कार्यकर्त्यानें अभिमानानें सांगितलें.

युगोस्लाव्हिआच्या प्रत्येक प्रादेशिक विभागांत लढण्याचें तंत्र अर्थात् वेगवेगळें होतें. सर्बियांतली भूमि सपाट तर बोस्नियांतील डोंगराळ, आणि मॉण्टेनिग्रोंतील तर नुसतीच डोंगराळ नाहीं तर शुद्ध खडकाळ! ह्या निरनिराळ्या भागांतील स्वातंत्र्ययुद्धाचे रंगतरंग निरनिराळ्या प्रकारचे होते, आणि एखादें बॉस्निआंतील घर, नाहींतर मॉण्टेनिग्रोचा लष्करी पोषाख, असें कांहीं तरी दाखवून प्रत्येक प्रदेशांतील स्वातंत्र्ययुद्धाचें दर्शन घडविण्याचा प्रयत्न केलेला होता.

हें युद्ध बरेंचसें गनिमी पद्धतीनें लढलें गेलें होतें, आणि गनिमी युद्धाचीं बरींच दृश्यें ह्या प्रदर्शनांत होतीं. उदाहरणार्थ, डोंगरांत बोगदे खोदून तयार केलेलीं लष्करी ठाणीं, डोंगराळ भागांत बांधलेले मोर्चे मीं एका बोगद्यांतून आरपार जाऊन बघितले.

* * *

पण ह्या सबंध प्रदर्शनाचा मेरुमणि म्हणजे ज्या एका गुहेमध्यें बसून मार्शल टिटोंनीं नात्सींच्या अग्निवर्षावाला आणि वैमानिक हल्ल्यांना तोंड दिलें आणि स्वातंत्र्यसंग्रामाचें मार्गदर्शन केलें—थोडक्यांत म्हणजे जी गुहा सबंध मोहिमेचें मुख्य लष्करी केंद्र अगर कचेरी बनली होती—त्या गुहेचें तंतोतंत प्रात्यक्षिक. ही गुहा ज्या डोंगरामध्यें होती त्या डोंगराची कृत्रिम प्रतिकृति निर्माण करून

तिच्यांत ही गुहा तयार करण्यांत आली होती. ह्या गुहेंत एक तळघरही तयार करण्यांत आलें होतें.

मार्शलची काम करण्याची खोली त्या वेळीं जशी होती तशीच्या तशी नेमकी दाखविण्याचा प्रयत्न केलेला होता. एक टेबल, एक खुर्ची एवढेंच तेथें फर्निचर होतें. भिंतीवर कांहीं नकाशे होते. टेबलाच्या खणांत कांहीं फूटपट्ट्या, कम्पास वगैरे भूमिमापक यंत्रें, एक चष्मा, चाकू, दुर्बीण वगैरे जिन्नस होते.

गुहेच्या मागच्या बाजूला एक दरी होती. तशी दरी निर्माण करण्याचाही प्रयत्न केलेला होता !

ह्या गुहेला भेट देऊन मार्शलच्या खोलींत प्रवेश करण्याचा आनंद कांहीं निराळा होता. राजकारण, अगर मतें कशींही असलीं तरी निव्वळ वीरत्व, शौर्य ज्याला महत्त्वाचें वाटतें त्याला सुद्धां येथें आल्यावर चित्त थरारतें आहे असें वाटल्याशिवाय राहिलें नसतें !

* * *

ही गुहा पाहत असतांना मार्शल टिटोच्या लष्करी नेतृत्वाची एक अलौकिक गोष्ट बरोबरच्या एका विद्यार्थिनीनें आम्हांला सांगितली.

बॉस्नियाच्या प्रदेशांतली हकीकत आहे. प्रदेश अतिशय खडकाळ डोंगराळ. मोठमोठे कडे तुटलेले. दऱ्या हिंस्र श्वापदाप्रमाणें जबडे पसरून खायला येताहेत असें वाटे. अशा प्रदेशाच्या शंभर फूट खोल आणि वीस पंचवीस फूट रुंद अशा एका दरींतून सैन्याची एक फलटणच्या फलटण पलीकडे नेण्याचा प्रश्न उपस्थित झाला.

त्या दरीवर पूल होता—पण त्या पुलावरून सैन्य नेण्याची सोय नव्हती. पूल अगदीं शत्रूच्या माऱ्यांत होता, आणि आजूबाजूच्या डोंगरांत शत्रूचे सैनिक दबा धरून बसले होते. ते इतके नजिक होते कीं त्यांचें दर्शन युगोस्लाव्ह स्वातंत्र्यसैनिकांना होत होतें, आणि ह्यांचें त्यांना होत होतें.

अशा परिस्थितींत हा पूल ओलांडून पलीकडे जाण्याचा सवाल होता. पुलावरून जाण्याचा प्रयत्न झाला असता, तर शत्रूनें दरीच्या पकडींत त्या फलटणीला अचूक पकडून तिची चटणी उडविली असती. मोठमोठ्या लष्करी तज्ज्ञांचीही मति साफ गुंग होऊन गेली.

अखेरीस टिटोंनीं एक ‘ प्लॅन ’, एक योजना काढली.

प्रथम त्यांनीं त्या दरीवरचा पूल अजिबात उडवून टाकण्याचा हुकूम दिला. शत्रूला गाफील करण्यास ह्यासारखा दुसरा मार्ग कोणता ?

आणि मग त्यांनीं शत्रूच्या नजरेआड एक कृत्रिम पूल तयार केला आणि काळोख्या रात्रीं दरीवर तो पूल चढविला आणि गाफीलपणें झोपलेल्या शत्रूला साफ गुंगारा देऊन फलटण पलीकडे नेली.

* * *

त्या प्रदर्शनांत काहीं विमानें तर होतींच, पण एक लष्करी बोटही तयार करून ठेवलेली होती. पलीकडेच सावा नदीचें पाणी पसरलेलें असल्यानें क्षणभर आपण एकाद्या खऱ्याखुऱ्या युद्धनौकेवर आहोत असें वाटलें. त्याच वेळीं पावसाची मोठी सर आल्यामुळें हा भास अधिकच दाटला !

हें प्रदर्शन पाहात असतांना मला सारखें वाटत होतें, आमची ' ऑगस्ट क्रांति ' इतकी भव्य नसेल, पण तिच्यामागची भावना तर इतकी उज्ज्वल होती ना ? सुभाषबाबूंची आझाद सेना आणि तिचे पराक्रम तर कल्पनारम्य होते ना ? तिला यश प्राप्त झाले नसेल, पण तिच्या प्रयत्नांत वीरश्री साकारच झाली नव्हती काय ? सुभाषबाबूंच्या सैनिकांच्या नजरेवर तरळणारीं स्वातंत्र्यस्वप्नें तितकींच स्वर्गीय नव्हतीं काय ? मग आमच्या सरकारनें ह्या प्रयत्नांचीं अशीं प्रदर्शनें कां भरवूं नयेत ?—ऑगस्ट-क्रांतीचें अगर सुभाषसेनेचें असें प्रेरक प्रदर्शन, स्फूर्तिशाली स्मारक कां उभारूं नये ?

## : १५ :

तुम्ही बेल्ग्रेडला आलांत कीं आपल्याकडे आलेंच पाहिजे असें आग्रहाचें निमंत्रण मला श्रीमती विल्फान ह्यांनीं झाग्रेबलाच देऊन ठेवलें होतें. म्हणून बेल्ग्रेडला आल्यानंतर मीं त्यांना फोन केला. लगेच त्यांनीं मला दुसऱ्या दिवशीं जेवणाचें निमंत्रण दिलें.

साडेबारा वाजतां दासोविचबरोबर मी विल्फानच्या घरीं गेलों. सौ. विल्फाननीं माझें स्वागत केलें. डॉ. विल्फान अद्याप कचेरींतून आले नव्हते.

सौ. विल्फाननीं मला मागच्या बाजूच्या व्हरांड्यांत नेलें—आणि कोंवळ्या सूर्यप्रकाशांत आम्ही गप्पा मारीत बसलों. हवा सुंदर पडली होती. पाऊस

अजिबात नव्हता. हवेंत थंडी होती, पण सूर्याच्या कोंवळ्या किरणांमुळें तिची शिरशिरी मजेदार वाटत होती.

विल्फानचा व्हिला गांवाबाहेरच एका टेकडीवर होता. तो बंगला आणि त्यांतलें फर्निचर ह्यामुळें विल्फान पतिपत्नींच्या साध्या सुसंस्कृत आवडीची प्रतीति येत होती. बंगला छोटा, सुबक होता आणि फर्निचर नाजुक, साधें, महोगनी रंगाचें होतें.

* * *

विल्फान पतिपत्नी इंग्रजी सुरेख बोलतात. युगोस्लाव्हिआंत फ्रेंच आणि जर्मन ह्यांवर प्रभुत्व असणारे अनेक लोक आहेत, पण इंग्रजीचा व्यासंग एकंदरीनें कमीच दिसला. अलीकडेच काय ते इंग्रजीच्या प्रसाराचे कसून प्रयत्न होत आहेत.

मीं सौ. विल्फानना विचारलें, "आपण इतकें सफाईदार इंग्रजी कोठें शिकलां ?"

त्यांनीं सांगितलें, "मी स्वतः स्लोव्हेन आहें. डॉ. विल्फानही स्लोव्हेनच. पण आमचं बरंचसं आयुष्य बाहेर गेलं. त्यामुळें इंग्रजी जमतं, पण कोणतीही युगोस्लाव्ह भाषा व्यवस्थित उच्चार करून बोलतां येत नाहीं. इथें बेल्ग्रेडमध्यें सर्वच युगोस्लाव्ह भाषा कानांवर पडतात—त्यामुळें माझं सर्बियन म्हणजे एक खिचडी झाली आहे."

इतक्यांत विल्फान आले.

डॉ. विल्फान हे एखाद्या प्राध्यापकासारखे दिसतात. त्यांचा चेहेरा भरदार आहे. मोठ्या हनुवटीमुळें तो चांगला सशक्त वाटतो आणि शिंगाच्या जाड चष्म्यामुळें त्यांत भरच पडते. हसले म्हणजे त्यांची जिवणी फांकते आणि चेहेऱ्याच्या मानानें नाजुक असलेल्या त्यांच्या हास्यांत मार्दव मिसळतें.

डॉ. विल्फान नुकतेच ॲबिसिनियांतून जाऊन आले होते. आम्ही इंग्रजीबद्दल बोलत होतों, त्या भाषणाचा धागा पकडून ते म्हणाले, "इंग्रजीचं वाढतं महत्त्व ओळखलं पाहिजे. ॲबिसिनियासारख्या मागासलेल्या देशानेंही तें ओळखलं आहे. त्यांनीं आपल्या शाळांत इंग्रजी आवश्यक केलं आहे. इंग्रजी ही विद्यमान् जगांतली सर्वांत महत्त्वाची भाषा आहे हें ते जाणतात. म्हणून त्यांनीं इंग्रजी अभ्यास सक्तीचा केला आहे. पण त्यांना इंग्रज शिक्षक नकोत. ते महाग पडतात. शिवाय पाश्चात्य लोक आपल्याला लुटतील असं त्यांना वाटतं. इंग्रजी

शिकविण्यासाठीं त्यांनीं भारतीय शिक्षक नेमले आहेत. भारतीय शिक्षक हुशार, कार्यतत्पर आणि शिक्षणकलेंत पारंगत असतात असा त्यांचा अनुभव आहे."

लवकर हिंदुस्थानांत जाणार असल्यामुळें भारतीयांबद्दल वाटूं लागलेल्या आत्मीयतेचा हा भाग होता, कीं भारतीय पाहुण्याला खूष करण्याचा प्रकार होता कीं तें केवळ सत्यकथन होतें ह्याची कल्पना ह्या बोलण्यावरून मला आली नाहीं. डॉ. विल्फान हे हुशार मुत्सद्दी आहेत हें मात्र ताबडतोब ध्यानांत आलें.

* * *

इतक्यांत जेवणाची वर्दी आली. सूपचा चमचा तोंडांत घातल्याबरोबर ध्यानांत आलें कीं जेवण तिखट आहे. मला तिखट मुळींच चालत नाहीं आणि युरोपांत तिखटाची संवयच नसल्यानें मला अद्यापपर्यंत अडचण आलीच नव्हती. युगोस्लाव्ह लोकांना थोडेसें तिखट आवडतें. पाप्रिका ( दुधी किंवा भोपळी मिरची ) त्यांना फार प्रिय. पाप्रिका त्या देशांत भरपूर पिकते. आज भारतीय पाहुणा म्हणून बहुधा जेवणांत पाप्रिकाचा जरा जादा वापर केला असावा आणि यजमानाचा अपमान होऊं नये म्हणून तें तिखट जेवण हायहुय न करतां मी घशाखालीं उतरविण्यास लागलों !

* * *

जेवतां जेवतां मिसेस् विल्फाननीं ॲग्नेस स्मेड्ले, एडगर स्नो आणि ॲना लुई स्ट्रॉंग ह्यांच्या गोष्टी सांगितल्या. एडगर स्नो आणि स्मेड्ले ह्यांची त्यांची मैत्री दिसली.

ॲग्नेस स्मेड्लेबद्दल तर त्यांना फार आदर दिसला.

स्मेड्लेना गूढ मरण आलें. त्याचा प्रश्न उपस्थित झाला तेव्हां, 'आम्हांला सुद्धां तें गूढच आहे' असें सौ. विल्फान म्हणाल्या.

स्मेड्लेचें वीरेंद्र चटोपाध्याय ह्यांच्याशीं लग्न झालें होतें असें त्यांनीं मला सांगितलें. 'थांबा, तुम्हांला त्यांच्या पुस्तकांतून वाचून दाखवितें' असें म्हणून त्या एकदम उठल्या, वरच्या मजल्यावर गेल्या आणि एक पुस्तक घेऊन आल्या. जेवतां जेवतां त्यांनीं थोडासा मजकूर वाचून दाखविला. वीरेंद्र चटोपाध्यायांच्या स्वप्नाळू स्वभावाविषयींचा तो मजकूर असावा असें आठवतें.

१९३७ च्या शिर्काणांत वीरेंद्रांची वाट लागली ! नेहरूंनीं रशियाकडे त्यांच्या प्रेताची मागणी केली होती. पण वीरेंद्र हे सोव्हिएट नागरिक होते, त्यांच्या प्रेतावर भारत सरकारचा कांहींही हक्क नाहीं असें नेहरूंना उत्तर मिळालें.

ॲग्नेस स्मेड्लेवर अमेरिकनांनीं हेरगिरीचा आरोप केला होता.

" हा आरोप सोव्हिएटनें केला होता ना ? " मीं विचारलें.

" नाहीं—सोव्हिएटनें हेरगिरीचा आरोप केला तो ॲना लुई स्ट्रॉंगवर. "

मग आमचें बोलणें एडगर स्नोकडे वळलें. १९४८ सालींच रुसो-युगोस्लाव्ह संबंधाचें भवितव्य स्नोनीं कसें अचूक रेखाटलें होतें हें त्यांनीं मला सांगितलें.

विद्यार्थीदशेंत मार्क्सवादाचा अभ्यास करतांना स्नो, स्मेड्ले आणि स्ट्रॉंग ह्यांचें लिखाण मीं थोडेबहुत भक्तिभावानें वाचलेलें होतें. त्यांच्या संबंधाच्या ह्या आत्मीय आणि परिचित गोष्टी ऐकून, आतां मला त्यांच्याबद्दल कांहींही आपुलकी उरलेली नसतांनाही, माझें अंतःकरण आंतून थोडें मोहरतें आहे, आणि लहानपणींच्या स्वप्नांना जाग येत आहे असें वाटलें.

* * *

जेवणानंतर कॉफी पितां पितां विल्फान पतिपत्नीशीं मीं नाना विषयांवर—अक्षरशः अनेक विषयांवर—दोन तास गप्पा मारल्या. त्यांत अनेक विषय निघाले. हिंदुस्थानांत हवामान कसें असते, हिंदुस्थान खरोखर किती प्रचंड देश आहे, हिंदुस्थानांतली शिक्षणपद्धति कोणती आहे, वगैरे प्रश्न त्यांनीं विचारले. पंचवार्षिक योजना, समाजवादी पक्षाचा कार्यक्रम, कम्युनिस्ट पक्षाचे उद्योग इत्यादींवर त्यांनीं माझी थोडीशी परीक्षाच घेतली.

ते लवकरच हिंदुस्थानांत येणार असल्यामुळें त्यांची वृत्ति किती समुत्सुक झाली होती ह्याचा प्रत्यय कांहीं प्रश्नांवरून आला. कोकिळा कशी असते, असें त्यांनीं विचारलें. झाडें, फुलें, फळें ह्याबद्दल विचारलें. आंब्याची चव कशी असते असें त्यांनीं विचारलें तेव्हां मीं त्यांना पुढील गोष्ट सांगितली—

एक साधु होता. त्याच्याकडे एक भक्त गेला आणि त्यानें ब्रह्म कसें असतें असें विचारलें. तेव्हां साधूनें, कांहीं न बोलतां, त्याला एक खडीसाखरेचा खडा दिला, आणि तो तोंडांत टाकायला सांगितलें. तो खडा भक्ताच्या तोंडांत थोडा वेळ विरघळल्यावर साधूनें विचारलें, " बेटा, मला सांग, खडीसाखर कशी लागते ? "

माझी ही गोष्ट ऐकल्यावर विल्फाननीं आपलें मजेदार हास्य केलें !

* * *

डॉ. विल्फान ह्यांच्या मृदु विनोदबुद्धीमुळें त्यांच्याशीं गप्पा विशेष रंगतात. मधुनमधून ते पत्नीची साजुक चेष्टा करतात. सौ. विल्फान शांततापरिषदेच्या सरचिटणीस होत्या. त्याला उद्देशून विल्फान म्हणाले, "मला सध्यां शांतता-वादाचं अजीर्ण झालं आहे."

युगोस्लाव्हिआ सोडण्याच्या आदल्या दिवशीं मला पत्रकारांच्या क्लबांत खाना होता. अशा खान्याला कोणीतरी वरिष्ठ अधिकारी हजर असला पाहिजे अशी तेथें प्रथा असल्यानें डॉ. आणि सौ. विल्फान हीं हजर होतीं.

पुनः गप्पा झडल्या !

स्टॅलिनबद्दल बोलणें चाललें असतांना मीं विचारलें, "स्टॅलिनला समाजवादी ध्येयाचं मुळींच आकर्षण नाहीं, अगर त्याच्या वृत्तींत समाजवाद मुळींच नाहीं, असं तुम्हांला वाटतं ?"

"असेल," सौ. विल्फान म्हणाल्या, "पण त्याच्या समाजवादाचं स्वरूप आतां विकृत बनलं आहे. स्टॅलिन लष्करी दृष्टीनें विचार करतो. माणसांपेक्षां उत्पादनाच्या आंकड्यांची तो अधिक पर्वा करतो. जनतेच्या दुःखांची त्याला क्षिति वाटत नाहीं. जागतिक समाजवादाचा तो रशियाच्या हिताच्या दृष्टीने विचार करतो."

आमच्या संभाषणाचा ओघ रुसोचिनीसंबंधाकडे वळला. चीनचें आणि रशियाचें केव्हां ना केव्हां तरी बिनसणार असें पुष्कळ युगोस्लाव्हना वाटतें. मीं विचारलें,

"युगोस्लाव्ह दुधानें तोंड पोळल्यामुळें स्टॅलिन चिनी ताक सुद्धां फुंकून पिणार नाहीं का ?"

त्यावर विल्फान म्हणाल्या,

"पण स्टॅलिन हा आपल्या राज्यपद्धतीचा गुलाम बनला आहे हें विसरूं नका. एका विशिष्ट रीतीनें वागण्याखेरीज त्याला गत्यंतरच नाहीं."

कम्युनिस्ट लेखकांच्या लेखनशैलीबद्दल आम्ही बोललों. डॉ. विल्फानना मार्क्सची शैली आवडते. स्टॅलिनची रंगहीन वाटते. लेनिनची पसंत. प्लेखानॉव्हची जुनाट १९ व्या शतकांतली.

"तुम्हांला ट्रॉट्स्कीची शैली कशी काय वाटते ?" मीं विचारलें आणि म्हटलें, "मला भारी आवडते."

विल्फाननीं वाईट तोंड केलें—आणि म्हणाले, “ ट्रॉट्स्कीच्या लिखाणांत तःविषयींचीच जाणीव फार ! ”

“ तें खरं आहे. ” मीं म्हटलें, “ पण साहित्यिकांची प्रकृतिच तशी असते ! ट्स्की हा साहित्यिक होता ! ”

विल्फानना पुस्तकांची प्रचंड आवड आहे. “ ते सारखे नवनवीं पुस्तकं कत आणीत असतात, आणि तीं ठेवायचीं कुठें ह्याची मला पंचाईत पडते. ” मती विल्फान म्हणाल्या.

विल्फानच्या बुद्धिजीवी दर्शनाला हें शोभणारेंच होते.

पत्रकारांच्या क्लबांत त्याच वेळीं स्पॅनिश शिष्टमंडळाला खाना होता. फ्रँकोच्या ज्यांत परागंदा झालेल्या स्पॅनिश क्रांतिकारकाचें हें शिष्टमंडळ होते. भोजन रतां करतां ह्या शिष्टमंडळाचे दोन तीन सभासद उठून एक क्रांतिगीत गाऊं गगले. त्याबरोबर विल्फान—सौ. विल्फानही उठल्या आणि त्या गायनांत ामील झाल्या.

हें बुद्धिजीवि जोडपें एका काळीं क्रांतीच्या अग्नीशीं खेळलेलें होतें. त्या ग्नीची ज्वाळा त्यांच्या नजरेंत खेळते आहे आणि त्याची प्रभा चेहेऱ्यावर ुळते आहे असें आतां वाटले !

: १६ :

सारायेवो ! इतिहासांत हें नांव प्रसिद्ध आहे. ऑस्ट्रियाचे आर्चड्यूक फर्डिनाण्ड ह्यांचा र्बियन क्रान्तिकारकांनीं जेथें खून केल्यामुळें पहिलें महायुद्ध सुरू झालें तेंच हें ारायेवो ! सध्या बॉस्निया-हर्झेगॉविना ह्या प्रजासत्ताकाची तें राजधानी आहे.

सारायेवोला जाण्यासाठीं विमानांत बसल्यावर अल्पावधींतच बॉस्निआंत वेश झाला. खालीं डोंगराळ मुलूख दिसत होता. आपल्या कोंकणासारखा. हानलहान डोंगर, लहानलहान खोरीं आणि त्यांतून वाहणारे लहानलहान ोढे. डोंगरावरचीं जीं झाडें निष्पर्ण झालीं नव्हतीं तीं पिवळींधमक दिसत होतीं.

कोंकणांत आणि ह्या प्रदेशांत एक फरक मात्र दिसला. हे डोंगर खडकाळ ेसले नाहींत आणि इतके रानटीही दिसले नाहींत ! म्हणजे खेड्यांची वसति

पुष्कळदां अगदीं डोंगराच्या माथ्यावरच दिसली आणि शेतकऱ्याचा आणि धनगराचा हात डोंगराच्या बऱ्याच भागावर फिरलेला दिसला.

डोंगराच्या अगदीं टोंकावर एखादेंच घर उभें असलेलें दिसलें म्हणजे मौज वाटे. विमान फार अंतरावरून जात नसल्यानें पुष्कळदां गुरेंमाणसें अगदीं स्पष्ट दिसत.

एका गोष्टीची सारखी गंमत वाटली. खालीं मधुनमधून आपादमस्तक पाडुरपिवळीं असलेलीं घरें दिसत. हीं अशीं कां, हें प्रथम ध्यानांतच आलें नाहीं. मग लक्षांत आलें कीं हीं घरें सर्वस्वीं लाकडाचीं आहेत, आणि हा कोऱ्या लाकडाचा रंग आहे.

बॉस्निआंत जंगल भरपूर. त्यामुळे लाकडांचा सुकाळ. शक्य तितक्या कामाला लाकूड वापरण्याची प्रवृत्ति.

सारायेवोंत आल्याबरोबर लाकडाच्या वखारी दिसल्याच !

* * *

सारायेवोंत शिरल्याबरोबर जुन्यानव्याचें, पाश्चात्य–पौर्वात्याचें, स्वच्छ-अस्वच्छतेचें, मागासले–पुढारलेपणाचें नमुनेदार मिश्रण दृष्टीस पडतें ! सारायेवो ही तुर्कांची जुनी राजधानी–त्यांच्या युरोपांतील नेतृत्वाचें अभिमानाचें स्थान ! पण आतां कम्युनिस्टांचा नवोन्मेष तेथें संचार करूं लागला आहे. त्यामुळे नवनवे कारखाने बांधले जात आहेत, नवनव्या इमारती उठत आहेत. नवे पोषाख दृष्टीस पडत आहेत. नव्या शिस्तीचा दण्डा फिरत आहे !

म्हणूनच जुन्या बुरखेवजा पोषाख केलेल्या स्त्रियांच्या खांद्याला खादा लावून चाललेल्या आधुनिक रंगदार ओष्ठांच्या, स्कर्ट, पेटीकोट घातलेल्या आणि नायलॉनचें वैभव उडवीत चाललेल्या तरुणी दिसल्या मशिदीला भिडून उभी असलेली कॉंक्रीटची इमारत दिसली. आणि बैलाच्या खटाऱ्याला घासून जाणारी अगदीं स्टुडबेकर नाहीं तरी फोर्ड दिसली !

* * *

आम्ही जेवूनखाऊन बाहेर पडतों तों सूर्य क्षितिजाला भेटण्यास अधीर झालेला दिसला. त्या ऋतूंत सूर्य पांचच्या सुमारास मावळतो, पण सारायेवो डोंगरांनीं वेढलेला असल्यानें सूर्यबिंब अगोदरच अंतर्धान पावतें.

त्यामुळें शहर पाहण्यास फारसा अवधि मिळालाच नाहीं. आम्ही प्रथम आर्चड्यूक फार्निनांडचा खून झाला ती जागा पाहावयास गेलों. सारायेवो शहरांतून बोस्ना नदी वाहते. शहर दोनही कांठांना आहे, आणि मधूनमधून पुलांनीं जोडलेलें आहे.

ह्यांपैकीं एका पुलाच्या टोकाला तो खून झाला. ह्या खुनामुळें जग युद्धाच्या खाईत होरपळून निघालें. पण बॉस्नियांत त्या खुनाचा स्वातंत्र्याचा एक उज्ज्वल प्रयत्न म्हणूनच गौरव होतो. तशी एक दगडी पाटी नदीच्या कांठावरच्या धक्क्यांत बसविलेली आहे. नात्सींच्या राजवटींत ती पाटी उखडून टाकण्यांत आली होती. तिची आतां पुनः स्थापना करण्यांत आली आहे.

नदीच्या पलीकडे जाऊन आम्हीं मुस्लिम लायब्ररी आणि गाझी हुझ्रेवेगॉव मशिद पाहिली. लायब्ररींत धार्मिक पुस्तकांची लयलूट आहे. आम्ही वाचनालयाच्या खोलींत गेलों तेव्हां कांहीं मुस्लिम पंडित, खालीं जमिनीवर पसरलेल्या गालिच्यावर बसून आणि लोडांना टेकून, समोर लाकडी तिकाटण्यावर ठेवलेल्या कुराणाचें पठण करतांना आढळले. पौर्वात्य पद्धतीनें बसून वाचण्याची त्यांची पद्धत आणि त्यांचा अस्सल मुस्लिम, तुर्की पायजमा, खमिस आणि फेझ हा पोषाख पाहून साहजिकच आपलेपणाची भावना जागृत झाली. बॉस्नियांतले मुसलमान हे सर्बियन वंशांतले आहेत. तुर्कांच्या स्वाऱ्यांत मुस्लिम धर्म स्वीकारून त्यांनीं स्वतःचे प्राण, वित्त आणि स्त्रियांची अब्रू ह्यांचें संरक्षण केलें होतें. त्यांचा पोषाख मुसलमानी असला तरी ( किंवा त्याचमुळें ) त्यांचा स्लाव्ह वंश ध्यानांत येतो – आणि त्यामुळें तेथली मुस्लिम संस्कृति विशेषच नजरेंत भरते.

त्यानंतर आम्ही मशिदींत गेलों. युरोपांतल्या तीन महान् मशिदींत तिची गणना होते. तिचा घुमट तीनशें मिटर उंच आहे. पैगंबराचा एक केस त्यांत ठेवलेला असल्यामुळें तिचें पावित्र्य विशेष गणलें जातें. मशिदींत आम्हांला बूट काढून ठेवून जावें लागलें. मशिदींतले गालिचे अतिशय उंची आहेत. एकंदरींत तिचें दर्शन भव्य आणि वातावरण अतिशय गंभीर वाटलें.

तेथून आम्ही शहरामागच्या टेकडीवर गेलों. शहराचा कांहीं भाग टेकडीवर पसरलेला आहे. टेकडीवर आम्हांला मुसलमानी पोषाखानें मढविलेल्या स्त्रिया दिसल्या. कम्युनिस्ट राज्यांत गोषाला बंदी आहे. पण परक्याचें दर्शन झाल्याबरोबर अंगावरल्या विस्तृत वस्त्रानें बहुतेक सारें तोंड झांकून घेऊन गोषाचें काम करतां येतें !

टेकडीवर पोचलों तेव्हां सूर्य डोंगराआड पार गेला होता. पश्चिम आकाश लाल लाल झालें होतें, पण विरळ धुके पसरलेलें असल्यामुळें त्याचे दर्शन धूसर दिसत होतें. समोरच्या टेकडीवर आणि त्यावर वसलेल्या शहरावर हें धुक्याचें नीलधूसर विरल वस्त्रच पसरलें होतें – आणि मधूनमधून दिसणाऱ्या दिव्यामुळें त्या वस्त्राचें सौंदर्य खुललें होतें.

टेकडीवरून आम्ही मोटरनें सारायेवोच्याच परिसरांत उष्ण झरा आहे तेथें गेलों. ह्या झऱ्याचा शोध रोमन लोकांनींच लावला होता, आणि तेथें एक उद्यानही उभारलें होतें. तेव्हांपासून अनेक राजवटी आल्या आणि अनेक मोडल्या, पण प्रत्येकीनें तो झरा आणि सभोंवतालचें प्रचंड उद्यान ह्यांचें मात्र अभिमानानें संरक्षण-संवर्धन केलें.

त्या झऱ्यापासून कांहीं अंतरावर आल्याबरोबर गंधकाचा दर्प घ्राणेंद्रियांत भरूं लागतो. आम्ही त्या बागेंत आलों तेव्हां चांगला काळोख झाला होता. मोठमोठे वृक्ष रखवालदारासारखे स्तब्ध निश्चल उभे असलेले दिसले.

झऱ्याचें पाणी चांगलेंच गरम आहे आणि ते धो धो वाहत असतें.

* * *

झरा पाहून आल्यानंतर आम्ही एका फळबाजारांत गेलों. त्याचें दर्शन पूर्णपणें पौर्वात्य-मुस्लिम होतें. थोडेसें भेंडीबाजारांतच आल्यासारखे वाटलें, पण कल्पनेनें बगदादमध्यें गेलों. लहानथोर व्यापारी रस्त्यावर फळांच्या राशी मांडून बसले होते. लहान लहान दिव्यांच्या प्रकाशांत त्यांचीं फळें उजळत होतीं.

सारायेवोच्या ह्या साऱ्या मुस्लिम दर्शनानें माझें अंतःकरण आंत कोठेतरी हलतें आहे असें वाटलें. हिंदुस्थानांत मुस्लिम संस्कृति कांहींशी परकीच वाटते. येथें ती अगदीं स्वदेशी वाटली !

* * *

कांहीं कांहीं वेळां कॉफीऐवजीं चहा पिण्याचा माझा हट्ट मला चांगलाच बाधला. हॉटेल लंडननें सकाळीं चहा म्हणून मला जें पेय दिलें त्यांत दूध ओतल्यानंतर त्याचा रंग दुधापेक्षांही पांढरा झाला. आपण पितों तें विष आहे कीं अमृत आहे ह्याचा विचार दाबीत दाबीत ते मिश्रण मीं घशाखालीं उतरविलें. सुदैवानें तें विषही नव्हतें आणि अमृतही नव्हतें. ( विष पिण्याची माझी तयारी नाहीं त्याप्रमाणें अमृत पिण्याचीही नाहीं. अमृत पिऊन नंदनवनांत अमर होणें हें ठीक आहे. पण ह्या जगांत अमर होणें म्हणजे मरणच ! )

नऊ वाजण्याच्या सुमारास आम्ही मोटरनें दोबोईला 'यूथ रेल्वे' पाहण्यासाठीं निघालों. आमच्याबरोबर सारायेवोच्या इन्फर्मेशन सर्व्हिसचे एक ज्यू गृहस्थ होते. (त्यांचें नांव आतां आठवत नाहीं.) गृहस्थ अतिशय बोलका, खेळकर!—आणि त्याचें इंग्रजीवर प्रभुत्व असल्यामुळें मला फारच बरें वाटलें.

हा गृहस्थ ज्यू होता. सारायेवोमध्यें ज्यू आतां फारसे उरलेले नाहींत. हा गृहस्थ हिटलरच्या कैदखान्यांत होता. तेथें त्यानें अनन्वित हालअपेष्टा सोसल्या. अखेरीस युद्धाच्या अखेरीस अखेरीस तो कैदखान्यांतून पळाला आणि नॉर्वे-ब्रिटन मार्गानें युगोस्लाव्हिआंत परत आला. कैदखान्यांत सोसलेल्या हालअपेष्टांच्या खुणा त्याच्या चेहेऱ्यावर अद्यापही स्पष्ट दिसत होत्या. त्याच्या चेहेऱ्यावर अकाल वृद्धत्वाच्या छाया नाचत होत्या.

पण गृहस्थांत तारुण्याचें पाणी खेळत होतें. त्याचा एका मुस्लिम तरुणीशीं प्रेमविवाह झाला होता. त्याला एक मूलही होतें. ती आणि तो—दोघेंही सरकारी कचेऱ्यांतून नोकरी करीत.

* * *

हा गृहस्थ माझ्याबरोबर असल्यामुळें माझा दोबोईचा प्रवास अगदीं सुखकर झाला. पण तो नसता तरीही झाला असता असें वाटलें. कारण बॉस्निआ हा अतिशय सुंदर प्रदेश आहे. आणि निसर्गाच्या उंचसखल उत्संगावरून आमची मोटर खालींवर होत, डावींउजवीं वळणें घेत, क्षितिजाचीं नवनवीं दर्शनें घडवीत, रमणीय प्रदेशाचीं प्रतिक्षणीं उमलत जाणारीं बदलतीं दृश्यें दाखवीत जात असता माझें लक्ष बोलण्यापेक्षां पाहण्यावर अधिक केंद्रित होणें अपरिहार्यच होतें.

पण बॉस्निआ प्रदेश डोंगराळ आहे, निसर्गरम्य आहे, भूमि आणि वृक्ष ह्यांचें रंगदार दर्शन घडविणारा आहे, बॉस्निअन लोकांच्या ग्रामीण जीवनाचे विविध रंग दाखविणारा आहे एवढाच कांहीं त्या प्रवासाचा आनंद नव्हता.

कित्येक मैल तो रस्ता दोन पर्वतश्रेणींच्या मधून जात होता. शेजारून रेल्वे जात होती. आगगाडीचा रस्ताही जात होता. तो प्रवास म्हणजे नदी, रस्ता आणि रेल्वे (इंग्रजींत बोलायचें म्हणजे रिव्हर, रोड आणि रेल्वे अशा तीन Rचा) त्रिवेणी गोफच होता—कारण, रस्ता नदीच्या कधीं ह्या बाजूला तर कधीं त्या बाजूला, रेल्वे कधीं ह्या बाजूला तर कधीं त्या बाजूला, आणि कधीं रस्ता-रेल्वे दोनही एका बाजूला असा प्रकार होता, आणि नदीशीं शिवाशिवीचा खेळ खेळत आम्ही चाललों होतों.

दोनही बाजूला डोंगरांचे उंच उंच कडे, मधून खोल, वेगानें वाहणारी स्वच्छ पाण्याची बोस्ना नदी, एका बाजूनें अनेकदां डोंगरांच्या कड्यांना घांसून जाणारा रस्ता, दुसऱ्या बाजूला खडक फोडून जाणारा आगगाडीचा रस्ता, नदी आणि रेल्वे दोघांनाही, कधीं पुलाच्या साहाय्यानें तर कधीं पुलाशिवाय छेद देऊन जाण्याचीं स्थळें, मधुनमधून नदीच्या कांठीं वसलेलीं खेडीं आणि शहरें, त्या हिवाळ्यांतही तुलनेनें हिरवी असणारी नदीकांठची झाडी,—आणि विशेष म्हणजे नदीचीं बदलतीं दर्शनें, क्षणाक्षणाला नवीं रूपें धारण करणारीं दर्शनें, जीवनाचा उल्लास पसरीत व्यक्त होणारीं दर्शनें! सौदर्याचा साक्षात्कार म्हणतात तो ह्याहून वेगळा असतो ?

* * *

साधारणपणें मशीद मला कधीं सुंदर वाटत नाहीं. पण बोस्ना नदीच्या कांठीं एक मशीद पाहिली आणि सौंदर्याचें दर्शन झालें. त्या प्रदेशाच्या सौंदर्यानें मन मुग्ध झाल्यामुळें असेल, बोस्ना नदीच्या सान्निध्यामुळें असेल, अगर त्या छोट्याशा मशिदीचे मिनार सुबक सुंदर होते म्हणून असेल; कां तें सांगूं शकत नाहीं, पण ती मशीद मला फार सुंदर वाटली.

वाटेंत मशिदी बऱ्याच दिसल्या. बॉन्सिआंत मुस्लिम संस्कृतीचा प्रसार बराच आहे. युगोस्लाव्हिआंत सुमारे पंचवीस लाख मुसलमान आहेत, त्यांतले पंधरा लाख एकट्या बॉन्सिआंत (सारायेवो शहरांत साठ हजार) आहेत. वाटेंत दिसणाऱ्या स्त्रीपुरुषांचा पोषाख त्यांच्या मुस्लिम संस्कृतीची कहाणी सांगतो. बॉस्निआंत कांहीं ठिकाणीं स्त्रिया पोटावर लोखंडी पत्रे बांधतात, कारण ऐतिहासिक कालीं मुस्लिम राजे गरोदर ख्रिश्चन स्त्रियांच्या पोटावर लाथ मारून गर्भस्थ काफिरांचा नाश करीत. कांहीं स्त्रिया पोटावर कापड बांधून गरोदरपणाचा देखावा आणतात, कारण कांहीं दयाळु राजे, गरोदर स्त्रियांवर बलात्कार करण्यास मनाई करीत. पोषाखावरच्या ह्या पुराण्या ऐतिहासिक खुणा मला दिसल्या नाहींत, पण कांहीं स्त्री-पुरुषांच्या अंगांत जरीच्या वेलबुट्टीचीं किनखापी जाकिटें दिसलीं. स्त्रियांचा पोषाख बहुतकरून पांढरा—बराचसा सैल आणि भोंगळ. गोशा नसला तरी आपल्या खेडवळ बायका तोंडावर पदर घेतात तशी परकीयाच्या दर्शनानें उत्तरीयाचा उपयोग करण्याची पद्धत फार दिसली. बहुतेक स्त्रियांच्या पायांतले पायजमे भरपूर गोल फुगीर असल्यामुळें त्या

स्त्रिया चालूं लागल्या म्हणजे 'अलिबाबा चाळीस चोर'मधले रांजण चालत आहेतसें वाटे !

पण एका अर्थानें हें वर्णन अगदीं अन्याय करणारें आहे. युगोस्लाव्हिआंत स्त्रियांचें सौंदर्य मला खरोखर दिसलें तें येथें. त्यांचे फुगीर हिमगौर गाल, रेखीव नाक, बोलके डोळे, स्वच्छ, नितळ, आरोग्यानें मुसमुसलेली कांति, आणि थोराड, पण रेखीव, भरदार देह—हें सौंदर्य मुग्ध बनवीत होते.

बॉस्निआच्या राष्ट्रीय पोषाखांत तें कसें उसळतें, विलसतें ह्याचाही सुदैवानें अनुभव आला. एके ठिकाणीं समोरून लग्नाची वरात आली. नवरा आणि बायको घोड्यावर विराजमान झालेलीं होतीं. बहुतेकांनीं आपला ठेवणींतला राष्ट्रीय पोषाख केला होता, आणि अर्थात् पति आणि पत्नी अगदीं सजलीं होतीं ! पांढऱ्या शुभ्र अश्वावरचें नवदांपत्याचें तें उल्लसित दृश्य पाहून मला बाजबहादूर–रूपवतीसारख्या ऐतिहासिक प्रणयी दांपत्याची आठवण झाली !

*　　　*　　　*

पण इतक्यांत आमची मोटर बिघडली—आणि थांबणें भागच पडलें. थोड्याच वेळांत आमच्या भोंवतीं खेड्यांतलीं पोरें जमा झालीं. त्यांच्या अंगावरचीं घाणीचीं पुटें, लक्तरें, पायांतले फाटके जोडे (कांहीं अगदीं अनवाणीच), हें पाहिलें, आणि हें सौंदर्य, हा आनंद ह्याच्या आड असलेल्या दारिद्र्याची जाणीव झाली. युगोस्लाव्हिआचें हें अंतस्थ दर्शन विदारक होतें !

## : १७ :

दोबाईहून आलों त्याच दिवशीं माझी मार्शल टिटो ह्यांच्याशीं भेट ठरली होती. अकराला वीस पंचवीस मिनिटें असतांना त्यांच्याकडे नेण्यासाठीं मोटर आली.

त्याच मोटरींत मारिआ विल्फान होत्या. त्या दुभाष्याचें काम करणार होत्या.

त्यांनीं जातांना मुलाखतीसंबंधीं एक दोन महत्त्वाच्या सूचना दिल्या. त्या म्हणाल्या, "ज्यांचीं उत्तरें तुम्हांला लेखांतून अगर पुस्तकांतून मिळूं शकतील असे प्रश्न शक्य तों टाळा. परवां एका अमेरिकन पत्रकारानें मार्शलना विचारलें, 'तिसरें महायुद्ध केव्हां सुरू होणार ?' मार्शल ह्या प्रश्नानें थोडेसे चिडले आणि

म्हणाले, ‘ तें मला काय विचारतां ? तें स्टालिनला नाहींतर तुमच्या सरकारला विचारा. ’ असे प्रश्न टाळा. ”

मीं त्यांचे आभार मानले. मुलाखत मिळत नव्हती तोंपर्यंत ठीक होतें. पण ती मिळाली आणि तिची वेळ आली तशी तिची थोडीशी भीतिच वाटूं लागली होती.

कांहीं म्हटले तरी स्टालिनसारल्या प्रमत्त हुकूमशहाला विरोध करण्याचें अपूर्व धैर्य दाखविणाऱ्या व्यक्तीस भेटण्यासाठीं मी चाललों होतों. ह्या एका कृत्यामुळे मार्शलना आंतरराष्ट्रीय राजकारणांत मोक्याचें महत्त्व प्राप्त झालेलें आहे. अशा व्यक्तीच्या सान्निध्यांत येणार आणि तिच्याशीं राजकारणाच्या कमीजास्त महत्त्वाच्या प्रश्नांवर चर्चा करणार हा विचार विमनस्क करणारा होता. अशा परिस्थितींत आपुलकीच्या सूचना देणारी एक हितकर्ती व्यक्ति दुभाष्या म्हणून भेटावी हें एक भाग्याचें स्मितच होतें.

* * *

विमनस्क स्थितींतच आल्यामुळें आमची मोटर कशी कोठून आली तें मला सांगतां येणार नाहीं. पण विल्फानचा बंगला ज्या रस्त्यावर होता त्याच रस्त्यानें आम्ही आलों एवढें आठवतें. विमनस्क स्थितींतच मी मोटरमधून उतरलों. मार्शलच्या लष्करी चिटणिसानें लगबगीनें पुढें होऊन आमचें स्वागत केलें — आणि बंगल्याच्या आवारांत नेलें.

आवाराच्या दाराशीं दोन सशस्त्र द्वाररक्षक होते. त्यांची धांदलगडबड जराही दिसली नाहीं. त्यांच्यावर फार मोठी जबाबदारी होती. कारण मार्शलच्या प्राणावर घाला घालण्यास स्टालीनचे हस्तक टपून बसले आहेत [ असें सांगण्यांत आलें होतें. ] ते आपलें कर्तव्य शांत स्थिर वृत्तीनें करीत होते.

मिलिटरी सेक्रेटरीनें आम्हाला मुलाखतीच्या खोलीत नेलें. ही मंत्रिमंडळाच्या बैठकीची खोली दिसली. कारण तेथें एक लांबलचक संपन्न टेबल होतें आणि त्याच्या भोंवतालीं नीट व्यवस्थित लावून ठेवलेल्या खुर्च्यांची रांग दिसली. पलीकडेच भिंतीवर एक प्रचंड तैलचित्र दिसलें. १६ व्या शतकांतील क्रोएशिअन शेतकऱ्यांनीं सरंजामशाहीविरुद्ध केलेल्या बंडाचा एक प्रसंग त्यांत रंगविलेला होता. ह्याच चित्राची एक प्रतिकृति क्रोएशियाच्या पार्लमेंटगृहांतील मंत्रिमंडळाच्या सभागृहांत पाहिलेली आठवली.

तेथलें सारें फर्निचर विशाल, मजबूत आणि अगदीं समृद्ध दिसलें.

*  *  *

मार्शल आमची वाटच पाहात होते. आम्ही गेल्याबरोबर ते पुढें झाले आणि यांनीं स्मित केलें. त्यांच्या डाव्या हातांत पाईप होता आणि उजवा हात त्यांनीं स्तांदोलनासाठीं पुढें केला. त्यांच्या त्या हस्तांदोलनानेंच त्यांच्या मजबूत ातांतील शक्तीचा मला थोडासा प्रत्यय आला. मार्शलचें वय सुमारें साठ र्षांचें आहे हें मला माहित होतें. पण त्या मानानें ते तरुण दिसतात. त्यांच्या ेहेऱ्यावर यौवनाचें पाणी नाचतें आहेसें वाटतें. त्यांचे निळे डोळे कसल्या तरी ोधांत आहेत असा भास होतो. त्यांच्या विशाल सशक्त देहयष्टीमुळें ही ारुण्याची जाणीव अधिकच बळावते. त्यांच्या अंगांतील लष्करी पोषाखामुळें ेच्यांत आणखी भर पडते.

ह्या थोर पुरुषाच्या निकट सान्निध्यामुळें असेल, मी क्षणभर भांबावलोंच. पण यांनीं इतकें मनमोकळे स्वागत केलें, कीं माझी भीति उडूं लागली.

*  *  *

आम्ही एका वाटोळया टेबलाभोंवतीं बसलों. मिलिटरी सेक्रेटरी आमच्या ामोर स्थानापन्न झाला. त्याच्या आणि मार्शलच्या मधल्या खुर्चीवर मारिआ ेल्फान बसल्या; आणि त्यांच्या आणि माझ्यामध्यें लघुलेखक वही-पेन्सिल ारसावून बसला.

समोर टेबलावर कॉफीचे आणि स्लिवोविझ ( युगोस्लाव्हिआचें राष्ट्रीय पेय ) चे ेले आले. मीं कॉफीचा कप उचलला आणि मार्शलनींही कॉफीच पसंत केली. नंतर मार्शलनीं मला सिगरेट देऊं केली आणि मीं आभारपूर्वक नकार देला तेव्हां त्यांना थोडेंसे आश्चर्य वाटलेलें दिसलें. युगोस्लाव्हिआंत बहुतेकांचीं ुखें म्हणजे अखंड अग्निहोत्रें असतात !

भारताविषयीं सदिच्छा प्रकट करून मार्शलनीं मुलाखतीला सुरुवात केली. मीं त्यांना रशियाबद्दल कांहीं विचारायचें नाही म्हणून निश्चय केला होता. ्यामुळें मीं मागासलेल्या देशांच्या आर्थिक उन्नतीबद्दल विचारलें. पण अल्पावधींतच त्यांच्या विवेचनाची गाडी सोव्हिएटविरोधी रुळावर गेली. ोड्याच वेळांत त्यांच्या चेहेऱ्यावरचें स्मित मावळलें, आणि त्यांच्या चेहेऱ्याचे स्नायु जरा ताणलेच ! अशा वेळीं त्यांचा चेहेरा उग्र अगर कठोर दिसत नाहीं पण निश्चयी दिसतो.

मी थोडा चपापलों. एवढ्या मोठ्या व्यक्तीची मुलाखत घेण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग होता. ( आपल्याकडच्या कांहीं थोर व्यक्तींना मी भेटलेला होतों. पण त्या तशा परिचयाच्याच असतात. ) आपली ही मुलाखत म्हणजे एक फुसका बार ठरणार कीं काय अशी भीति मला वाटूं लागली.

पण जरा वेळानें त्यांच्या चेहेऱ्याचे स्नायु जरा मोकळे झाले. त्यांचा चेहेरा थोडासा खुलला. त्याच्यावर प्रसन्नता पसरली. ह्या मुलाखतीनें मार्शलना खरोखर कितीसा संतोष होतो आहे हें जाणून घेण्यासाठीं मीं म्हटलें,

" मार्शलना वेळ असेल तर मी त्यांना आणखी एक प्रश्न विचारूं इच्छितों. "

त्यावर मार्शल दिलखुलास स्वरांत म्हणाले, " विचारा ना – विचारा. "

आणि मग मीं त्यांना लोकशाही आणि एकपक्षीय हुकूमशाही ह्यांच्या संबंधाविषयीं विचारलें.

ह्या प्रश्नाचें नीट उत्तर देण्यासाठीं बराच तात्त्विक उहापोह करावा लागेल असें म्हणून मार्शलनीं एक तात्त्विक प्रवचन झोडण्यास सुरुवात केली. तें ऐकतांना, माझें मन भूतकाळांत गेलें आणि मी एल्फिन्स्टन कॉलेजांत प्रो. पटवर्धन ह्यांचें राज्यशास्त्रावरील एक व्याख्यानच ऐकत आहें असें वाटलें. मार्शलची ही मुलाखत म्हणजे लहान लहान प्रवचनांचा एक संग्रहच होता !

* * *

ह्या मुलाखतीला असें वळण लागलें कीं तिच्यामुळें मार्शलचे मला त्रिविध दर्शन झालें. तें म्हणजे शिक्षक, राष्ट्रनेता आणि धोरणी राजकारणी ह्या तीन दृष्टींनीं.

सर्वसाधारण समजूत अशी आहे, कीं मार्शल हे नुसते शिपाई गडी आणि संघटक आहेत – आणि त्यांचें मार्क्सवादाचें वगैरे ज्ञान म्हणजे जें कांहीं त्यांना, त्यांचे सहकारी पियादे, कार्देल, आणि जिलास ह्यांजकडून मिळालें असेल तेवढेंच. पण मला असें आढळून आलें कीं ही समजूत बरोबर नाहीं.

टिटो आपला बराचसा मार्क्सवाद मोशा पियादेकडून शिकले ही गोष्ट खरी आहे. पियादे हे खरे हौशी चित्रकार. मार्क्सवादाच्या आवडीमुळें ते चळवळींत शिरले आणि तुरुंगांत गेले. आयुष्याचीं एकंदर सोळा वर्षें त्यांनीं तुरुंगांत घालविलीं. तेथेंच त्यांनीं मार्क्सच्या त्रिखंड कॅपिटल ग्रंथाचें भाषांतर केलें आणि टिटोला मार्क्सवाद शिकवला.

पण टिटो हे मला नुसते विद्यार्थी वाटले नाहींत तर हौशी शिक्षक वाटले. एखादा विषय समजावून सांगण्यांत ते अगदीं रंगून जातात. किंबहुना माझा लोकशाहीसंबंधाचा प्रश्न हें एक त्यांना चांगलें निमित्त सांपडलें आणि त्यामुळें अंतर्यामीं खूष होऊन गेले असें वाटलें.

* * *

धूर्त राजकारणी म्हणूनही त्यांचा अनुभव आला. झाग्रेबच्या शांतता परिषदे-संबंधीं आणि तिनें निर्माण होणाऱ्या चळवळीविषयीं मीं मुद्दाम अनेक प्रश्न विचारले, आणि अशा बिनसरकारी चळवळींत सरकारचा कितीसा भाग असावा असे मीं खोदखोदून विचारलें. एकपक्षीय कम्युनिस्ट राज्यांत सरकारी आणि बिनसरकारी अशा भेदाला कांहीं अर्थच नसतो. युगोस्लाव्हिआचें सरकार ह्या परिषदेचीं सूत्रें कितपत हालवीत आहे हें मला पाहायचें होतें. पण मार्शल टिटो माझ्या प्रश्नाच्या कैचींत सांपडूं शकले नाहींत.

हा धूर्त राजकारणी अतिशय निर्भीड स्पष्टवक्ता आहे असेंही ह्याच मुलाखतींत प्रत्ययास आलें. पाश्चात्य राष्ट्रें युगोस्लाव्हिआला जी मदत करीत आहेत त्यांच्या-संबंधीं बोलणें निघालें. मला टिटोंनीं स्पष्ट सांगितलें कीं, "आमची त्या राष्ट्रांना वास्तव दृष्ट्या मदत होते, आमच्या सोव्हिएटशीं असलेल्या भांडणामुळें कम्युनिस्ट आक्रमणाची भीति कमी होते, म्हणून तीं राष्ट्रें आम्हांला साहाय्य करतात; ही भीति कमी झाली तर आम्हांला अशी मदत सुरू राहील किंवा काय हा प्रश्न आहे."

युगोस्लाव्हिआच्या आर्थिक उद्धाराची चर्चा करतांना त्यांच्या नजरेवर स्वप्नें तरळत आहेत असें वाटलें, तर विकेंद्रीकरणाची चर्चा करतांना, लोकांची सांस्कृतिक–शैक्षणिक–नैतिक तयारी नसली तर हा प्रयोग किती धोकेबाज ठरेल हें सांगतांना, त्यांची नजर वस्तुस्थितीचा ठाव घेत आहेसें वाटलें. राष्ट्रीय नेतृत्वाच्या सामर्थ्याचें दर्शन ह्यांत मला घडलें. आशा, आस्था आणि वास्तव सावधपणा ह्यांचें जणुं अंतरंगदर्शनच तें होतें.

मार्शल टिटोंनीं माझ्यासाठीं बरोबर एक तास खर्च करायचा ठरविला होता असं दिसलें. बरोबर ११–५५ ला, एखादी कळ दाबली जाऊन उठावे तसे ते उठले.

मीही उठलों. पांच मिनिटें आम्ही उभ्यानींच बोललों. मार्शलनीं भारताच्या लोकासांठीं पुनः एकवार सदिच्छा व्यक्त केली !

* * *

मोटरींतून परत येतांना मारिया विल्फाननीं, मुलाखत पुष्कळच यशस्वी झाल्याबद्दल समाधान व्यक्त केलें. मी तर उन्मनस्क होऊन गेलों होतों. आज आपल्याला एक अपूर्व अनुभव आला आणि एका थोर पुरुषाला भेटण्याची सुवर्णसंधि लाभली असें वाटत होतें.

— आणि ह्या मनःस्थितींतच दुशान लोवरिच् ह्यांनीं डांग्यांबद्दल सांगितलेली गोष्ट मला आठवली.

१९४७ सालीं डांगे युगोस्लाव्हिआंत गेले होते. त्यावेळीं चिनी मजुर फेडरशनचे लियु निंग ह्यांच्याबरोबर ते टिटोच्या भेटीस गेले होते.

टिटोशीं झालेल्या मुलाखतीनें डांगे अगदीं मुग्ध होऊन गेले होते. परत येतांना त्यांचा जीव जणुं अंतराळांत विहरत होता. ते बेभानपणें बोलत होते— आणि पुनःपुन्हा म्हणत होते, "आज मला खरोखर एक फार थोर पुरुष भेटला. आज माझ्या जीवनाचं सार्थक झाल्यासारखं वाटत आहे."

— पण स्टालीनचा टिटोशीं बेबनाव झाल्यावर मात्र डांग्यांनीं 'टिटोच्या युरोपविरोधी कटां'चा शोध लावण्यास सुरुवात केली !

## : १८ :

मार्शलच्या मुलाखतीच्या दुसऱ्याच दिवशीं मी स्वित्झर्लंडमार्गें लंडनला जायला निघालों. लहानपणापासून लंडन आणि जिनीवा ह्या दोन शहरांची कांहीं तरी विलक्षण मोहिनी माझ्या मनावर पडलेली होती. [ तसें पॅरिसचें आकर्षण मला कधींच वाटलें नाहीं.] इंग्रजी कथा-कादंबऱ्यांच्या वाचनामुळें इंग्लंड देश आणि लंडनचें जीवन ह्यांबद्दलचें एक सुप्त आकर्षण निर्माण होणें साहजिक होतें. पण जिनीवाचें आकर्षण लेनिनच्या आठवणी वाचल्यामुळें निर्माण झालें असावें असें वाटतें.

युगोस्लाव्हिआंत झाग्रेब-बेल्ग्रेड आणि बेल्ग्रेड-सारायेवो असा प्रवास विमानानेंच केला असल्यामुळें नवीन असें पाहायचें फारसें कांहीं शिल्लक

राहिलेंच नव्हतें. उत्तरेकडचा स्लोव्हेनिआचा प्रदेश पाहायचा होता. पण विमान झाग्रेबला थांबून जाईल असें वाटत होतें, आणि झाग्रेब आतां येईल, जरा वेळानें येईल अशा विचारांत विमान स्लोव्हेनिआ ओलांडून आल्प्स पर्वतावर केव्हां आलें तें समजलेंच नाहीं !

* * *

भारताला हिमालयाची जशी गूढ आणि मुग्ध ओढ असते तशी युरोपला आल्प्सची असते. आल्प्स हा युरोपचा सर्वांत मोठा पर्वत आहे. पण तो हिमालयासारखा उग्रभीषण नाहीं. ( कारण तो तितका अजस्र नाहीं. ) हिमालयाच्या स्मरणानें भारतीयांच्या मनांत पावित्र्याची भावना निर्माण होते तर आल्प्सच्या स्मरणानें युरोपिअनाच्या मनांत सौंदर्याच्या लहरी उसळतात.

आणि हें सौंदर्य जितकें निसर्गनिर्मित आहे तितकेंच मानवनिर्मित आहे. आल्प्सच्या उत्संगावर मानवाचा विहार बराच झाला आहे, आणि हा विहार तपश्चरणासाठीं झालेला नसून सौंदर्यास्वादासाठीं आणि मनोविनोदनासाठीं झालेला आहे.

* * *

आल्प्सचें सौंदर्य कसें वर्णन करूं ? अद्याप हिंवाळ्याचा भर आलेला नव्हता, पण आल्प्सच्या शिखरावर बर्फाची पखरण होती. बाराही महिने असते. आल्प्सचीं शिखरें, बर्फाचें हें धवल वस्त्र सोडल्यास अगदीं उघडीं, बोडकीं असतात—आणि बर्फाच्या स्वच्छ शुभ्रतेमुळें आणि खडकाच्या राखट-काळ्या रंगामुळें तीं तशीं विशेषच वाटतात.

सूर्याच्या प्रकाशांत शिखरांवरचें बर्फ अधिकच शुभ्र वाटतें आणि अधिकच स्वच्छ वाटतें.

फारसे ढग नव्हतेच. पण जे होते त्यांना ह्या बर्फाच्या स्वच्छतेचा आणि शुभ्रतेचा जणुं मत्सर वाटत होता ! हे ढग त्या हिमाच्छादित शिखरांना विपरीत आलिंगन देऊन त्यांचें स्वच्छ सुंदर धवल रूप मलीन करण्याचा प्रयत्न करीत होते. पण त्यांचा हा प्रयत्न त्यांच्या निःप्रभ अंगाप्रमाणेंच निष्प्रभ वाटत होता.

सूर्याच्या किरणांनीं बर्फाचा शुभ्रपणा अधिक अधिक उमलत होता.

कल्पनेपेक्षां सत्य थिटें असतें ह्याचा प्रत्यय मला आला. बर्फावर नाचणारे सूर्याचे किरण इन्द्रफुलें किंवा विद्युत्पुष्पें फुलवतात अशी कल्पना मीं एक दोन

ठिकाणीं वापरलेली होती, पण हीं इंद्रफुलें किंवा विद्युत्पुष्पें मला दिसलींच नाहींत !

* * *

आल्प्स पर्वतावर मानव आणि निसर्ग किती शेजारीं शेजारीं नांदतात ! पर्वताचें शिखर बर्फानें आच्छादलेलें असतें आणि त्याच्या खालींच, कांहीं अंतरावर—पर्वताच्या पायथ्याशीं नव्हे तर बाजूवर—एखादें टुमदार खेडें वसलेलें असतें, किंवा पाईन वृक्षांचें घनदाट जंगल असतें. शिखरावरचें तें पांढरेंशुभ्र बर्फ, खेड्यांतील घरांचीं लाल छपरें आणि पाईन वृक्षाच्या जंगलाचा गहिरा हिरवेपणा—मानव आणि निसर्ग ह्यांनीं रंगविलेल्या ह्या रंगीबेरंगी पटाचें दूरदर्शन फारच मोहक होतें. क्षणाक्षणाला त्यांत नावीन्याचा प्रत्यय येत होता, पण त्या बदलत्या दृश्यांतूनच एक प्रकारची स्थिर एकात्मताही जाणवत होती.

पाईन !—ते हिरवे हिरवे, सरळ ताठ उभे असलेले वृक्ष—कवायतीला उभ्या असलेल्या पलटणीसारखे दिसत ! आल्प्स पर्वतावरील हिमनगरींतील सौंदर्याचें संरक्षण का करीत होते ते ?

त्यांचा तो हिरवेपणा—हिरवेपणा, पानगळीच्या ऋतूंतल्या झाडावरचें पीतसौदर्य पाहून पाहून विटलेल्या माझ्या डोळ्यांना अपरिमित आल्हाद देत होता ! मी हिंदुस्थानातून आलो तेव्हां हें सुवर्णसौंदर्य आणि कुंकुमसौंदर्य मला किती मादरमस्त वाटलें होते ! पण आता माझ्या डोळ्यांवर त्यांनीं थोडीशी झांपड येऊं लागली होती. त्या पिवळ्या आणि लाल रंगाआडचा पानाचा शुष्कपणा माझ्या वृत्तीला आता जाणवूं लागला होता. ह्या ऋतूंत इतर वृक्षांप्रमाणें पाईन वृक्ष पिकत नाहींत—ते गडद हिरवे गारच राहातात. (त्या जंगलांत एखादें झाड मेलेलें दिसे, पण त्याचीं पाने पिवळीं अगर लाल नव्हतीं तर मातट—करपट होतीं !) ह्या पाईन वृक्षांचे असें दर्शन मला युगोस्लाव्हिआंत झाले नव्हतें. चिरयौवनाचें हे वैभव स्वित्झर्लंडलाच विशेष लाभलेलें दिसले.—खरें म्हणजे तें आल्प्सचे वैभव आहे !

* * *

आणि तीं मधुनमधून आपल्या कोमल हिरवेपणानें बहरलेलीं शेतें. नुकत्याच उगवलेल्या शेतांचा तो मृदुमधु पोपटी हिरवेपणा—ताजा सतेज हिरवेपणा, तोही नेत्रांना संतोष देत होता !

आणि तीं तळीं आणि सरोवरें!—स्वित्झर्लंड तर ह्या सरोवरांनीं नुसतें नटलेलें आहे. आणि हीं सरोवरें म्हणजे सभोंवतालच्या निसर्गाचें आणि वरच्या विविध रंगांनीं नटलेल्या आकाशाचें प्रतिबिंबदर्शन फुलविणारे बिलोरी आरसेच ! त्या सरोवरांतलीं तीं प्रतिबिंबें—जणुं जलदेवतांचा खेळच !

आमचें विमान अगदीं थोड्या अंतरावरून जात होतें—आणि म्हणून खालचें सौंदर्य अगदीं डोळे भरून पाहतां येत होतें.

एका सरोवरावरून जातांना आमच्या विमानाचेंच प्रतिबिंब पाहून मला फार गंमत वाटली !

* * *

बराच वेळ आमचें विमान अगदीं स्थिर वृत्तीनें जात होतें. मीही स्थिर दृष्टीनें खालचें सौंदर्य न्याहाळीत होतों. इतक्यांत विमान विलक्षण हलूं लागलें, गोतेच खाऊं लागलें.

आकाशांत हवेच्या पोकळ्या असतात, आणि त्यांत विमान शिरलें म्हणजे एकदम चारचारशे फूट खालीं येतें, ह्याचा अनुभव आतांपर्यंत बराच आला होता. पण हें प्रकरण कांहीं निराळें होतें !

विमान हलत होतें, थरथरत होते—गोते खात होतें ! सारेच प्रवासी एक-मेकांच्या आणि विशेष म्हणजे ‘एअर होस्ट’च्या तोंडाकडे पाहूं लागले.

त्या विमानांत ‘एअर होस्टेस’ नव्हती, ‘एअर होस्ट’ होता. पण तो वागायला इतका गोड होता, त्याच्या चेहेऱ्यावर एकसारखें खेळणारें स्मित इतकें मधुर होतें, त्याचें बोलणें इतकें अगत्याचें होतें, कीं अद्यापपर्यंत भेटलेल्या साऱ्या एअर होस्टेसपेक्षां तो मला अधिक आवडला.

विमान गोते खाऊं लागल्यावर त्याच्या चेहेऱ्यावरचें हास्य अधिकच फुललें. तो प्रत्येकाशीं जाऊन बोलूं लागला, प्रवाशांना पट्टे बांधा म्हणून सांगूं लागला, त्यांना पेपरमिंट हवें का विचारूं लागला—थोडक्यांत म्हणजे, त्याची हालचाल विमानाप्रमाणेंच वाढली; फक्त तिचा परिणाम अगदीं विरुद्ध स्वरूपाचा होता !

* * *

जरा वेळानें आमचें विमान जरा प्रसन्न वृत्तीनें जाऊं लागलें. आणि मग कांहीं वेळानें तो एअर होस्ट प्रवाशांकडे जाऊन त्यांना खालीं बघा म्हणून सांगूं लागला.

मीं विचारलें, " खालीं काय आहे!"

तो म्हणाला " बर्केसूगॅडन—हिटलरचें निवासस्थान."

मीं म्हटलें, " इकडे कुठें आलें तें!"

" हवा वाईट असल्यामुळें आम्हांला विमानाचा मार्ग बदलावा लागला."

विमान गोते कां खात होतें तें एकदम ध्यानांत आलेंच, पण ह्यामुळें आमचा कसा फायदा झाला तेंही समजलें!

मीं खालीं पाहिलें. इतक्यांत आमचें विमान जरा दूर असल्यानें—आणि जमनीपासून बरेंच उंच चढलें असल्यानें—मला तें निवासस्थान नीटसे दिसलें नाहीं. पण खालचा प्रदेश फारच डोंगराळ वाटला! मला आपल्याकडील सह्याद्रीच्या घाटांतील देखाव्याचें स्मरण झालें.

हिटलरनें आपल्या संरक्षकगृहासाठीं किती बंदोबस्ताचे—नैसर्गिक बंदोबस्ताचें—ठिकाण निवडलें होतें ह्याची कल्पना आली!

* * *

जिनीवाला जाण्यासाठीं झुरिकला विमान बदलावें लागलें.

झुरिकला विमानांत बसलों तेव्हां सूर्य पश्चिमेला बराच कलंडला होता, आणि खालच्या सुंदर भूमीवर सायंकाळच्या सावल्या नाचूं लागल्या होत्या.

आतां लहान लहान डोंगर, पाईनवृक्षांचीं जंगलें, शेतें, खेडीं आणि मधून मधून एखादें टुमदार शहर ह्यांचे आलटूनपालटून दर्शन होऊं लागले.

हें पाहिले म्हणजे स्वित्झर्लंड किती नीटस आहे, सुबक आहे, सुव्यवस्थित आहे ह्याची कल्पना येते. सर्वत्र माणसांची सौंदर्यदृष्टि फिरलेली, साऱ्या गोष्टींना माणसाच्या हाताचा स्पर्श झालेला! सारें कसें स्वच्छ, स्वच्छ! झाडें स्वच्छ, घरें स्वच्छ, रस्ते देखील स्वच्छ, नितळ!

खेडीं आणि शहरें—दोघांत फारसा फरक दिसलाच नाहीं. शहरांचा फक्त आकार मोठा! टुमदार घरांऐवजीं टुमदार बंगले, मोठ्या इमारती, मोठे कारखाने, मोठीं स्टेशनें, आणि रस्त्यावर सायकलींची व मोटरींची वर्दळ! बाकी तसेंच!

* * *

मनांत विचार येत होता: युरोपिअन लोकांनीं आपलें जीवन जसें संघटित केलें आहे, त्याचप्रमाणें ज्या भूमींत ते राहातात ती भूमिही त्यांनीं संघटित केली आहे!

पण ही संघटना अगदीं भौतिक स्वरूपाची नाहीं का ? त्याला आत्मिक संघटनेची जोड आहे का ? ती असती तर युद्धें झालीं असतीं का ? आणि युद्ध झालें म्हणजे खेडीं आणि शहरें ह्यांची ही नीटस संघटना क्षणार्धांत बेचिराख होत नाहीं का ?

युरोपिअनांनीं जीवनाचें सुव्यवस्थित शास्त्र बनविलें आहे, पण जीवनाची कला त्यांना अवगत आहे का ?

जीवनाची कला अवगत असती तर दर पंचवीस वर्षांनीं युद्धाची, नव्हे, महायुद्धाची आराधना त्यांनीं कशाला केली असती ?

पण स्विस लोक ह्या आरोपाला पात्र नाहींत. त्यांनीं आपला देश युद्धापासून अगदीं कटाक्षानें अलिप्त राखला आहे. आणि म्हणून मला स्वित्झर्लंडच्या ह्या सुव्यवस्थित जीवनांत एक प्रकारचा आत्मिक आनंद होत होता.

## : १९ :

झाग्रेबच्या शांतता परिषदेत मला लाइलो हॅमोरी नांवाचे एक गृहस्थ भेटले होते. युनोच्या कचेरींत ते एक बडे अधिकारी होते. जिनीवाला ' लीग ऑफ नेशन्स ' च्या कचेरींत त्यांच्या दर्जाची मला वास्तविक कल्पना आली, पण त्याच्या वागण्या-बोलण्यांत रुबाब जराही नव्हता.

ते क्वेकर होते. क्वेकर पंथ हा थोडासा गांधीवादी भासणारा असा एक खिश्चन धार्मिक पंथ आहे. ह्या पंथाचा साधेपणा आणि शांतिवाद ह्यांचे नमुनेदार मिश्रण मि. हॅमोरींत मला आढळून आलें.

' जिनीवाला आलांत तर मला जरूर भेटा ' असें निमंत्रण मला त्यांनीं दिलें होतें आणि जिनीवाला आल्याबरोबर मीं त्यांना फोन केला. दुर्दैवानें त्यांची मुलगी आजारी होती, आणि ते मला भेटूं शकत नव्हते.

दुसऱ्या दिवशीं रविवार होता. ते मला भेटूं शकत नव्हते, पण क्वेकर पंथीयांची साप्ताहिक बैठक दर रवितारीं भरत असे तिला मी हजर राहावें असें त्यांनीं सुचविलें.

* * *

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी रू द लोझॉ ह्या रस्त्यावर क्वेकर भुवनांत गेलों. त्यापूर्वींच मी पलीकडच्या जिनीवा सरोवराचें सौंदर्य न्याहाळण्यांत स्वतःला थोडाबहुत विसरलों असल्यानें मला त्या सभेला जाण्यास पांच मिनिटें उशीर झाला.

मी घाईघाईनें खोलींत शिरलों तों काय ?—

त्या लहानशा नीटस खोलींत वर्तुळाकार खुर्च्यांवर सुमारें वीस लोक डोळे मिटून प्रार्थनामय शांततेंत गढून गेले होते !

म्हणजे तसें दिसत होतें, कारण एकदोघांचे डोळे थोडे किलकिले होते, हें ध्यानांत यायला वेळ लागला नाहीं.

माझें लक्ष एका ओळखीच्या चेहेऱ्याकडे गेलें. त्याचा मालक झाग्रेबला आलेला होता.

माझ्या येण्याची चाहूल लागल्यामुळें बहुधा त्याचे डोळे थोडे उघडले. त्याने खुणेने मला बसायला सांगितले. मी त्याच्या शेजारीं जाऊन बसलों.

खरे म्हणजे मीही डोळे मिटून प्रार्थनेंत शांतसामील व्हायला हवें होतें. पण माझे डोळे मिटतच ना. खरें म्हणजे ते गोंधळले होते. हें काय चाललें आहे ह्याचाच बोध मला होईना. हे सारे लोक ही ' आंधळी प्रार्थना ' किती वेळ चालू ठेवणार ह्याचा कांहीं पत्ता लागेना. अशा परिस्थितींत आपले कर्तव्य काय ह्याचीही उमज पडेना.

मींही डोळे मिटण्याचा प्रयत्न केला, पण माझी चोरटी अर्धमिटली नजर खोलीभर भिरभिरलीच !

सारेजण चूपचाप होते. बरेच जण अर्थात् प्रार्थनेंत निमग्न होते. त्यांच्या चेहेऱ्यांवर शांततेचे भाव पसरले होते. पण कांहीं जण उघडउघड नाटक करीत होते—आणि त्यांच्या चेहेऱ्यांवरचा कंटाळा अगदीं बोलका बनला होता !

मौज अशी कीं खुर्च्यांच्या एका रांगेवरचीं चारपांच मुलेंही ह्या प्रार्थना-स्तब्धतेंत सामील झालीं होतीं. पण एक मूल एकदम खुदकन हसतें कीं काय, असें वाटत होतें !

मला काय करावें हें सुचेना. स्वतःचें एखाद्या अर्थपूर्ण शून्यत्वांत रूपांतर करूं पाहणाऱ्या तेथल्या प्रार्थनामय लोकांकडे नुसतें पाहात राहाणें ही सुद्धां एक प्रयत्नशील बाब मला वाटूं लागली !

मी प्रार्थनामय बनूं शकत नव्हतों–पण दुसरें तरी मी काय करूं शकत होतों ?

* * *

इतक्यांत देव पावला—

आणि एक वृद्ध–अतिवृद्ध स्त्री उठली आणि आपल्या कांपऱ्या आवाजांत भाषण करूं लागली.

ती म्हणाली,–" आज ह्या क्षणीं माझे विचार माझ्या बालपणींच्या काळांत शिरत आहेत..."

किती योग्य ! ( मी मनाशींच म्हणालों ) ह्या बाईचें दुसरें बालपण आतां किती निरागस दिसत आहे !

ती बोलत होती–" त्यावेळीं आम्ही एक प्रार्थनागीत म्हणत असूं त्याची मला आतां आठवण होत आहे—

Dare to be Danu
Dare to have a purpose
Dare to say no."

आणि तिनें ह्या प्रार्थनागीतामागची कथा सांगितली. दानिएल दिवसांतून तीन वेळां प्रार्थना करीत असे. परमेश्वराखेरीज इतर कोणाचाही अधिकार मान्य करायचें त्यानें नाकारलें. राजाला तो आवडत असे, पण इतर त्याचा द्वेष करीत. त्यांच्या दडपणामुळें दानिएलला सिंहाच्या गुहेंत टाकणें राजाला भाग पडलें. पण परमेश्वरानें त्याला वांचविलें.

ही वृद्ध स्त्री भाविक चेहेऱ्यानें ही कथा सांगत होती, पण कोणी ऐकत नव्हतें–निदान ऐकत असल्याचें दिसत नव्हतें. कसें दिसेल ! ते सारे प्रार्थनेंत गढून गेले नव्हते काय ?

कित्यकांचे चेहेरे कंटाळलेले दिसत होते. साहजिकच आहे. हे प्रार्थनेचे सोपस्कारही त्यांना नवीन नव्हते, आणि ही कथाही ते पहिल्यांदा ऐकत नव्हते.

एक मुलगी मात्र तळहातावर हनुवटी ठेवून ऐकत होती–अर्थात् डोळे मिटून !

त्या वृद्ध स्त्रीनें अखेरीस कथेचें तात्पर्य सांगितलें–दानिएल कां वांचला ? कारण तो दररोज तीनदां परमेश्वराची प्रार्थना करीत असे म्हणून ! अर्थात् आपणही प्रार्थना केली पाहिजे–आपलें जीवन प्रार्थनामय बनविलें पाहिजे !

इतकें म्हणून ती स्त्री खालीं बसली, आणि पूर्वीची प्रार्थनास्वरूप शांतता सुरू झाली. डोळे उघडत, मिटत. कांहीं चेहेऱ्यांवरचा कंटाळा किंचित् रुष्ट भासे. मध्येंच एखादा खोकल्याचा आवाज ऐकूं येई.

* * *

मला कांहीं समजेना. हें असें किती वेळ चालायचें हें ध्यानांत येईना. आतां कोणी तरी उठेल आणि एखादें गाणें म्हणेल, अगर एखाद्या नाटकांतला संवाद म्हणून दाखवील तर बरें, असें वाटलें. तोंच...

एक गृहस्थ उठला आणि भाषण करूं लागला.

आणि खरोखरच त्यानें एक सुंदर भाषण केले.

तो म्हणाला, "आतांच आपण सिंहाच्या गुहेंत शिरलों होतों. मी आपणास सिंहाच्या गुहेपासून फार दूर म्हणजे एका देवळांत नेणार आहे. त्या देवळांत तें छत पाहा. दिसतं का? नाहीं दिसणार. कारण ते अंधारांत लपलेलं आहे. आतां कदाचित् विजेच्या प्रकाशानें तिथे तुमची दृष्टि पोचूं शकेल. पण त्या काळीं कुणाला दिसूं शकत नव्हतं.

"अशा ह्या अंधाऱ्या छतावर एका कारागिरानें कमलिनीची आकृति कोरली होती. ही आकृति डोळ्यांना दिसूं शकत नव्हती. पण त्या कारागिरानें ती माणसासाठीं कोरलीच नव्हती, तर परमेश्वरासाठीं कोरली होती.

"आतां एवढं खरं, कीं आम्हा क्वेकरपंथीयांना ह्या आकृतीशीं कांहीं कर्तव्यच नाहीं. आपणास असल्या सुंदर ललितकृतीशीं कांहीं करावयाचंच नाहीं. आपल्या ह्या खोलींत, इथें, त्या शेगडीच्या वर उदाहरणार्थ, सुंदर नक्षीकाम आहे. पण तें आपल्या ह्या सभेशीं अगदीं विसंगत आहे. कारण आपल्याला काय हवं?—तें समोरच्या भिंतीवरचं चित्र पाहा. (येथें सातआठ मिटलेले डोळे उघडले) तें क्वेकर्सच्या एका सभेचं आहे. किती साधी आहे ती सभा! आम्हा क्वेकर्सना सौंदर्य नको, नक्षीकाम नको—केवळ साधेपणा पाहिजे.

"आतां सांगा—बरोबर कोण? आपण साधेपणाचे भोक्ते क्वेकर्स कीं तो छतावर कमलिनी कोरणारा कारागीर?

"दोघेही बरोबर. कारण ती कमलिनीची कलाकृति माणसासाठीं नव्हती, तर परमेश्वरासाठीं होती.

"आपलं बाह्य जीवन साधं हवं व अंतरंग सौंदर्यमय हवं—हेंच ह्याचं तात्पर्य!"

* * *

मि. बेल ह्यांचें हें व्याख्यान खरोखरच सुंदर झालें. जमलेले लोकही (डोळे मिटून कां होईना पण) ऐकत होते, पण आपलें ऐकणेंही शक्य तितकें अनिच्छेचें आहे असें दाखविण्याचा प्रयत्न ते करीत असावेत.

अंतरंगाच्या सौंदर्याचा पुरस्कार करणाऱ्या सुंदर व्याख्यानांतही जरा अधिक रस घेतला तर तें प्रार्थनेला बाधक ठरेल असें त्यांना वाटत असावे.

ह्या व्याख्यानानंतर पुनः निःस्तब्ध शांतता सुरू झाली. लोकांचे डोळे मिटलेले होते. ते प्रार्थना करीत असावेत, पण त्यांचे चेहेरे मात्र व्याकुळ दिसत होते.

इतक्यांत मागच्या बाकावरची एक बाई आणि चारपांच मुलें उठलीं. त्यांना घेऊन ती निघून गेली. मलाही जावेसें वाटलें. पण मी कसा जाणार? मी तेथें पाहुणा होतों. मी येणार म्हणून हॅमोरींनीं फोन करून कळविलेलें होतें. मी असाच मध्येंच निघून गेलो तर त्यांना काय वाटेल? मी त्या कृत्रिम शांततेच्या यातना मुकाट्यानें सहन करावयाचें ठरविलें.

जरा वेळानें आणखी एक गृहस्थ उटला. त्यानें भाषण केलें. अगदीं नीरस भाषण! त्याने केकरच्या ह्या बैठकीची एक लहानशी राजकीय सभाच बनविली. मला वाटलें, लोक आतां पळूनच जातील! वाटलें, म्हणजे आशा वाटली. पण तसें कांहीं झालें नाहीं—लोक आपले मिटल्या डोळ्यांनीं बसून राहिले!

चारदोन मिनिटांनींच आणखी एक गृहस्थ उठला आणि त्यानें एक भाषण केलें. खरें म्हणजे, मला तें समजलेंच नाहीं. समजण्याच्या मनःस्थितींतच मी नव्हतों.

* * *

इतक्यांत एकदम सारे लोक डोळे उघडून एकमेकांशीं बोलायला लागले. मुलींच्या शाळेंत बाई वर्गाबाहेर पडल्या कीं एकदम किलकिलाट सुरू होतो तसें झालें.

मीं घड्याळाकडे पाहिलें. साडेअकरा वाजले होते. प्रार्थनाविधि बरोबर तासभर चालला होता.

तास संपल्याबरोबर ज्या उत्सुकतेनें आणि अधीरतेनें प्रत्येकानें शेजारीं बसलेल्या व्यक्तीशीं बोलायला सुरुवात केली त्यावरून त्या तासभरांत त्याचा जीव किती गुदमरला होता ह्याची तत्काळ कल्पना आली. त्या तासांतल्या त्या कृत्रिम शांततेचें ओझें केव्हां एकदा झटकून टाकतों म्हणून प्रत्येक जण अधीर झाला होता.

हें पाहिलें नि क्वेकर्सच्या ह्या प्रार्थनापद्धतींतला एक अंतर्विरोध माझ्या ताबडतोब ध्यानांत आला.

प्रार्थनेंत चित्ताच्या एकाग्रतेला खरें महत्त्व असतें. वैयक्तिक प्रार्थनेंत चित्ताची एकाग्रता साधण्याची जी पद्धति उपयोगी पडेल ती सामुदायिक प्रार्थनेंत उपयोगी पडेलच असें नाहीं, किंबहुना न पडण्याचाच संभव अधिक. हे क्वेकर्स वैयक्तिक प्रार्थनेंतली पद्धति सामुदायिक प्रार्थनेला लावूं पाहात होते — आणि म्हणूनच त्यांचा प्रयत्न फसत होता.

डोळे मिटणें, निःस्तब्ध शांततेची साधना करणें, हे सामुदायिक प्रार्थनेचे मार्ग नव्हत. सामुदायिक गायन, भजन हेच ते मार्ग होत.

महात्मा गांधींनीं हे अचूक ओळखलें होतें. म्हणून गीता-कुराणांतल्या मंत्रांचें पठण, अभंग-गायन, भजन आणि अखेरीस प्रार्थनोत्तर भाषण इत्यादि मार्गांचा अवलंब त्यांनीं केला होता! गांधीजींच्या प्रार्थनासभांत जी प्रसन्नता नांदे आणि भक्तिशीलता प्रगट होई त्यांचें कारण ह्या साध्यसाधनांच्या अनुरूप समन्वयांत शोधावें लागेल!

## : २० :

जिनीव्हांत आल्यानंतर खऱ्या युरोपिअन शहरांत आल्यासारखें वाटलें.

सुमारें तीन आठवडे युरोपमध्यें घालविल्यानंतर असें वाटलें, ह्याला महत्त्व आहे. मी रोममध्ये एकच दिवस होतों, आणि तो रविवार असल्यानें सुट्टीचा दिवस होता. त्यामुळें दैनंदिन वातावरण म्हणतात तें अनुभवायला मिळालेंच नव्हतें.

झाग्रेब हें युगोस्लाव्हिआंतलें सर्वांत युरोपिअन शहर. ऑस्ट्रियन लोकांनीं बांधलेलें, आणि ऑस्ट्रियन संस्कृतीचे संस्कार मिरविणारें, पण रस्त्यावर

मध्येंच एखादा शेतकरी आपल्या 'राष्ट्रीय' पोषाखांत दिसे आणि आपण पूर्व युरोपांत आहों ह्याची तात्काळ प्रतीति येई.

आणि कांहीं म्हटलें तरी जिनीवांत जो आधुनिकपणा आहे—जो अद्ययावत् युरोपिअनपणा आहे—तो रोम अगर झाग्रेब ह्या शहरांत खात्रीनें नाहीं.

* * *

तरीपण, मनु बानर्जी मला म्हणाली, जिनीवांतले लोक सनातनी आहेत. आधुनिक संस्कृतींतल्या यांत्रिक सुखसोयी, नीटपणा, स्वच्छता इत्यादि गोष्टी त्यांनीं आत्मसात् केल्या आहेत, पण आधुनिक संस्कृतींतली नास्तिक वृत्ति आणि तिला आनुषंगिक असे छानछोकीचे विलास त्यांना मान्य नसावेत. त्यांच्या जीवनांत एक प्रकारची शिस्त आणि संयम आहे.

त्यांच्या आधुनिकतेंत पैशाला प्रधान महत्त्व आहे हें मात्र लगेच ध्यानांत येतें. त्यासाठीं बाजारांत एखादा फेरफटका करून आलें तरी पुरे! दुपारीं १२ वाजल्यापासून रात्रीं ८ वाजेपर्यंत माझी एक बॅग क्लोकरूममध्ये ठेवण्याबद्दल मी ज्या हॉटेलांत उतरलों होतों त्याच्या मॅनेजरनें माझ्याकडून चोपून भाडें वसूल केलें!

जिनीवाच्या आधुनिक संयत जीवनांत ही पैशाची दृष्टि असावी हें आधुनिक संस्कृतीच्या इतिहासास अगदीं धरून आहे. जिनीवांतले लोक मुख्यत: प्रॉटेस्टंट आहेत. प्रॉटेस्टंट पंथाचा एक संस्थापक कॅल्व्हीन ह्याची हें शहर म्हणजे कर्मभूमि होती. प्रॉटेस्टंट पंथाचा विकास आणि आधुनिक भांडवलशाहीचा विकास केवळ समांतरच ठरला असें नव्हे, त्यांचे एकमेकांवर खोल संस्कार झालेले आहेत.

पण भांडवलशाहीची बेसुमार विषमता जिनीवांत नाहीं. मला असें कळलें, कीं त्या शहरांत जास्तींत जास्त पगार दोन हजार फ्रॅंक्स आणि कमींत कमी दोनशें फ्रॅंक्स आहे.

* * *

सकाळीं उगीच इकडे तिकडे भटकलों. कोठें जातों नि काय पाहतों ह्याची नीटशी कल्पनाच येत नव्हती. सुदैवानें पाऊस मात्र नव्हता. त्यामुळें हवा प्रसन्न होती. आणि सूर्याच्या कोंवळ्या किरणांनीं हवेंतली प्रसन्नता अंतःकरणावर अगदीं परीच्या पावलानें खेळत होती. रविवार असल्यानें सर्व व्यवहार अगदीं थंड होते, आणि वातावरणांत पूर्ण शांतता होती. आणि हवेंतल्या थंडीच्या

शिरशिरीमुळें ही शांतता अधिकच जाणवत होती. मध्येंच चर्चच्या घंटेचे सुस्वर नाद ऐकूं येत होते, आणि त्या वातावरणांत ते खरोखरच मंगल वाटत होते.

* * *

दहाच्या सुमारास रू द लोझॉ ह्या रस्त्यानें मी क्वेकरभुवनाकडे निघालों. तेथें पोंचलों तेव्हां साडेदहाला चांगला दहा पंधरा मिनिटे अवकाश होता. म्हटलें, जरा आणखी भटकावें. म्हणून पुढें गेलों. तों एका बागेचें दर्शन झाले. त्या बागेत गेलों आणि समोर सौंदर्याचें आकाशपुष्पच जणुं उमललें. जिनीवाचें प्रख्यात सरोवर समोर पसरलेलें होतें! त्या सरोवराचें शांत शीतल पाणी, त्याच्या मृदु लाटांवर नृत्यनाटिकेंतील नर्तिकांप्रमाणें डोलणाऱ्या छोट्या-छोट्या नौका, पलीकडची अंतराचे विरल आवरण धारण केलेली टेकडी, त्या टेकडीवरचे मुग्ध बंगले आणि ऋतूने बरेंचसे वैभव हिरावून नेल्यामुळें ओका उघडा बनलेला निसर्ग, पण मधुनच, मालविण्यापूर्वी दिवा मोठा व्हावा त्याप्रमाणें गळण्यापूर्वी वाढलेलें पर्णसौंदर्य रंगदारपणें धारण करणाऱ्या कांहीं मोजक्या झाडांची मिजास —

किती तरी वेळ मी नुसता टक लावून पाहात उभा होतों!

ह्या जिनीवा सरोवरांतून ऱ्होन नदी वाहते. किंबहुना ह्या नदीला मध्येंच फुगवा आल्यामुळे हें सुंदर सरोवर निर्माण झालें आहे, आणि एखाद्या गर्भवतीच्या सौंदर्याप्रमाणें जिनीवांतील नागरिकांच्या कोडकौतुकामुळें त्याचें सौंदर्य वाढलेलें आहे.

* * *

जिनीवांत असतांना वेळ सांपडेल तेव्हां सरोवराच्या कांठीं जाऊन चक्कर मारायची ह्याचा मला नादच लागला होता. त्या दिवशीं रात्रीं जेवण झाल्यावर मी सरोवरावरच गेलों. पलीकडच्या इमारतींवर जे रंगी-विविधरंगी निऑन लाइट्स होते त्यांचीं तरल प्रतिबिंबें सरोवराच्या पाण्यांत पडलीं होतीं. पाण्याच्या लहरींबरोबर तीं लहरत होतीं. मानवाच्या जलविहारापेक्षांही प्रतिबिंबांचा हा जलविहार मनोज्ञ वाटला.

दुसऱ्या दिवशीं पाऊसच होता. दुपारीं जरा उघडलें तेव्हां सरोवरावर गेलों. एक अनपेक्षित दृश्य दिसलें. सरोवरांतच मधोमध दोन कारंजीं पन्नास साठ फूट उंच उडत होतीं, आणि सूर्याचे किरण पडल्यामुळें त्यांच्यावर इंद्रफुलें फुलत होतीं. कारंज्यांची उंची आणि विस्तार कमीजास्त करण्यांत येत होता,

त्यांची दिशा आणि गतिही बदलण्यांत येत होती—आणि साहजिकच सूर्याच्या किरणांनीं निर्माण झालेल्या सुरंगी मायेलाही विविध मोहक स्वरूपें प्राप्त होत होतीं !

स्वतःच्या मनोविनोदनासाठीं जिनीवाचे लोक ह्या सरोवराचा किती तऱ्हेतऱ्हेनें उपयोग करून घेतात ह्याची ह्यानें थोडी कल्पना आली. नौकाविहार, जलावतरण, इत्यादि नित्याच्या प्रकारांचा उल्लेखच करण्याचें कारण नाहीं.

क्वेकर्सच्या सभेनंतर माझे पाय आपोआपच पुनः सरोवराकडे वळले. दुपारच्या उन्हांत सरोवराच्या कांठचा तो फेरफटका मजेदार वाटला, पण ह्या सरोवराकडे फारसें लक्ष जाऊं शकलें नाहीं. शेजारच्या मोठ्या रस्त्यावरून सैनिकांच्या मिरवणुका जात होत्या.

आज ता. ११ नोव्हेंबर ! पहिल्या महायुद्धानंतर हा शांततादिन म्हणून पाळला जातो. त्या युद्धांत पतन पावलेल्या असंख्य अज्ञात वीरांना आज आदरांजलि वाहिली जाते !

जिनीवाच्या रस्त्यावरून सैनिकांच्या तुकड्या उत्साहानें जात होत्या. प्रत्येक तुकडीचा गणवेश निराळा, बँड निराळा आणि संगीतही निराळें. मिरवणुकीबरोबर अनेक नागरिक रक्तवर्णीय फुलें कोटाला लावून जात होते.

त्या मिरवणुकींत शांततेला योग्य असा संयम, गांभीर्य अगर अंतर्मुखता मात्र नव्हती. उत्सवी उत्साहच अधिक होता. माझ्या मनांत विचार आला, स्वित्झर्लंड हें तत्त्वनिष्ठ तटस्थ राष्ट्र. युद्धापासून अलिप्त राहण्याचा जणुं त्यानें धर्म केलेला. युद्धवीरांच्या स्मारकदिनाचें इतकें कोडकौतुक कशाला ?

पण ज्या समारंभांत युद्धखोरीबद्दल एक प्रकारची उबग आहे, मानवी प्राणांच्या संहाराबद्दल एक प्रकारचा अनुताप आहे, त्याच्याबद्दल, युद्धापासून कटाक्षानें अलिप्त राहणाऱ्या राष्ट्रानें उत्साह बाळगावा हें साहजिकच आहे.

पण ह्या उत्साहांत उथळपणा होता. आंतरिक जाणिवेचें खोल गांभीर्य नव्हतें.

साहजिकच आहे. ज्याला युद्धाचे भीषण परिणाम साक्षात् समजलेले नाहींत त्याची शांतिपूजा किती म्हटलें तरी उथळच असणार. आणि उथळ असते म्हणूनच ती भडक वठणार !

* * *

दुपारीं मनु बानर्जींबरोबर मी शहर पाहाण्यास निघालों. ट्रॅमनें शहरांत गेलों. एका पुलावरून जातांना नदींत मधोमध रूसोचें स्मारक आहे तें तिनें मला दाखविलें. मनूनें मला जुन्या शहरांत नेलें. तीं जुनीं उंच उंच गुदामासारखीं दिसणारीं, आणि निरुंद रस्त्यामुळें अधिक उंच भासणारीं घरें, शहराचा प्राचीनपणा मनावर लगेच ठसवीत होतीं. शहर टेकडीवर वसलेलें असल्यानें उंचसखल होतें. आणि त्यामुळें एक घर दुसऱ्याकडे दृष्टिपात करून बघतें आहे, असें वाटे.

"ह्या घरांत कॅल्व्हिन जन्मला" मनूनें एका घराकडे बोट करून म्हटलें. घरासारखेंच घर. कॅल्व्हिनच्या आईवडिलांनीं तें पसंत केलें होतें हें त्याचें वैशिष्ट्य ! पण हें वैशिष्ट्य नजरेंत भरविण्यासाठीं कांहीं खास व्यवस्था केल्याचें मला दिसलें नाहीं.

जरा वेळानें मनूनें मला, लेनिन ज्या काफेमध्यें नेहमीं कॉफी पिण्यास जात असे त्या काफेकडे नेले. मला आंत जाऊन कॉफी पिण्याची अनिवार इच्छा झाली. पण मुख्यतः विद्यार्थ्यांच्या आश्रयावर चालणारें तें काफे, रविवार असल्यानें, बंद होते. जिनीवांत कम्युनिस्ट पक्ष प्रबल असल्याचें ऐकलें होते. आदर्श स्विस लोकशाहींत कम्युनिस्टांचा जोर लेनिनच्या ह्या स्मृतीमुळे असेल का ?

मनूनें नंतर मला रिफॉर्मेशनस्मारकाकडे नेलें. हे स्मारक म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून एका प्रचंड धक्क्यापाशीं रांगेनें उभे करून ठेवलेले, ल्यूथर, क्रॉमवेल, नॉक्स इत्यादींचे पुतळे होते. मात्र तेथल्या वातावरणामुळें, पण मुख्यतः त्यांच्या जीवनाभोंवतीं तेजस्वितेचें आणि पराक्रमाचें जें वलय पसरलेलें आहे त्यामुळें तेथे गेल्यावर वृत्ति विनम्र होतात.

* * *

सोमवारीं दुपारीं, हामोरींच्या निमंत्रणावरून लीग ऑफ नेशन्सची वैभवशाली इमारत पाहावयास गेलों. युरोपमध्यें ही प्रचंडपणांत दुसऱ्या नंबरची इमारत आहे. पहिली पॅले दि व्हर्साय. ह्या पॅले दि नेशन्समध्यें एकंदर एक प्रचंड सभागृह, वीस छोटीं सभागृहें आणि ६०० कचेऱ्या आहेत. शिवाय एक ग्रंथालय.

राष्ट्रसंघाच्या निरनिराळ्या सभासदांच्या सहकार्यानें ही टोलेजंग इमारत उठली. ह्या इमारतीच्या नमुन्यासाठीं आंतरराष्ट्रीय स्पर्धा लावलेली होती, आणि

निरनिराळ्या आर्किटेक्ट्सनीं दहा हजार कल्पना पाठविल्या होत्या. अखेरीस आलेल्या उत्तमोत्तम कल्पनांची सांगड घालण्यासाठीं फ्रान्स, इटली, स्वित्झर्लंड आणि हंगेरी ह्या चार देशांतील पांच गृहरचना-शास्त्रज्ञांची निवड करण्यांत आली.

दुर्दैव असे, कीं १९३६ मध्यें इमारत तयार होऊन राष्ट्रसंघाची कचेरी तेथें येते तोंच जर्मनींत हिटलरचें वर्चस्व वाढल्यामुळें राष्ट्रसंघ मोडणार अशीच परिस्थिति निर्माण झाली. १९३९ सालीं युद्ध सुरू होऊन राष्ट्रसंघाची रीतसर इतिश्री झालीच !

सुदैव एवढेंच, कीं तटस्थ राष्ट्रांत ही इमारत उभारल्यामुळें ती युद्धाच्या अग्निवर्षावापासून मुक्त राहूं शकली — आणि तिच्यावर झालेला कलेचा वर्षाव अबाधित राहिला. निरनिराळ्या राष्ट्रातील उंची निवडक लाकूड, संगमरवरी दगड, गालिचे, कांचकाम आणि मुख्य म्हणजे कला ह्यांचा संगम होऊन ही इमारत आकारास आलेली आहे. निरनिराळ्या राष्ट्रांच्या निरनिराळ्या कलावंतांनीं त्या आंतरराष्ट्रीय प्रासादाचे निरनिराळे विभाग सजविलेले आहेत. उदाहरणार्थ, तिसऱ्या नंबरच्या समितिसभागृहामध्यें स्विस चित्रकार बारो ह्यांचीं चित्रें आहेत. पांचव्या सभागृहांत लंडनच्या व्हाइट ॲलोमनें कलात्मक साधेपणाचें नमुनेदार दर्शन घडविले आहे. सहावी खोली स्वित्झर्लंडच्या कलेनें तयार झाली आहे. तिच्या दरवाजाच्या आंतल्या भागावर स्वित्झर्लंडच्या इतिहासांतलीं दृश्यें आहेत. आंत दोन भित्तिचित्रे आहेत. एकांत एक मृत सैनिक आहे — आणि शेजारीं त्याची माता, पत्नी, आणि अपत्यें आहेत. दुसऱ्या चित्रांत औदार्याचीं प्रतीकें रेखाटलेलीं आहेत.

कौन्सिल चेम्बर ही स्पेनची देणगी आहे. सुप्रसिद्ध स्पॅनिश कलावन्त जोशे मारिआ सर्त ह्यांच्या कुंचल्यानें ह्या खोलीचें छत आणि भिंती कलामय आणि अर्थपूर्ण बनल्या आहेत. ह्या कलावंताच्या कलेंत जें चैतन्य सळसळतें तें ह्या चित्रांत पूर्ण प्रतीत होतें. सारीं चित्रें प्रतीकात्मक आहेत. एका भिंतीवर धान्य वारविण्याचें चित्र आहे. दुसरीवर पांच इसम एक प्रचंड वजन उचलताहेत आणि त्या क्रियेंत एका इसमाचा चुराडा होतो आहे असें दाखविलें आहे. तिसऱ्या भिंतीवर जगाच्या पांच वंशांचे पांच लोक शस्त्र कबजांत घेऊन त्याच्यावर नियंत्रण बसवीत आहेत. चौथ्या चित्रांत सर्व जगाचे कायदेकानू एका ग्रंथांत बसविण्याची मानवतेची धडपड आहे, आणि पांचव्यांत एक

पुरुष गरुडापासून इंद्रास्त्र ओढून घेत आहे असें दाखविलें आहे. हीं चित्रें अनुक्रमें न्याय, शक्ति, शांति, कायदा आणि प्रज्ञा ह्यांचीं प्रतीकें आहेत.

छतावर पंचखंडांच्या पांच प्रचंड व्यक्ति ऐक्याचा निर्धार व्यक्त करीत आहेत, आणि त्यांच्या पायाशीं सालामांका विद्यापीठाचे विद्वान् प्राध्यापक शिष्यासमवेत वादविवाद करीत आहेत असें अप्रतिम चित्र आहे. ( १६ व्या शतकांत सालामांका विद्यापीठानें आंतरराष्ट्रीय कायद्याची कल्पना शिकविण्याचा प्रथम प्रघात पाडला. ) ह्या चित्राची मौज अशी, कीं ते चेंबरच्या कोणत्याही कोपऱ्यांतून पाहिलें तरी सारखेंच दिसतें.

मुख्य सभागृहांत दोन हजार श्रोत्यांची बसण्याची सोय आहे. ह्या सभागृहाच्या दोन बाजूला दोन ब्रॉझचे दरवाजे आहेत, आणि ते सुप्रसिद्ध फ्रेंच आर्किटेक्ट मोरॉ ह्यानें तयार केले आहेत, आणि त्यांत फ्रेंच शिल्पकार ऑरिकोस्त आणि कोतुरिए ह्यांच्या मूर्ति बसविलेल्या आहेत. चारही भित्तिचित्रें फ्रेंच चित्रकारांचीं आहेत : स्फूर्तिदेवता ( विलार्ड ), उद्योग ( रूसे ), न्याय ( डेनिस ), आणि कुटुंब ( चेसेल ).

* * *

फिनिश दगड आणि स्वीडिश संगमरवर ह्यांनीं बांधलेली लॉबी, हा ह्या प्रासादाचा विशेष भाग आहे. ह्या लॉबींत येईपर्यंत माझें मन मुग्ध होऊनच गेलें होतें—पण लॉबींत उभें राहून बाहेर पाहिलें, आणि समोरच्या सौंदर्यानें एकदम भान हरपल्यासारखेंच झालें !

मॉ ब्लॅचें तें अवर्णनीय दर्शन !

त्या आंतरराष्ट्रीय प्रासादांतून युरोपच्या त्या पर्वतश्रेष्ठाचें दर्शन म्हणजे जणुं दसऱ्याच्या मिरवणुकींत गजराजावर स्वार होऊनच सामील होणें ! सौंदर्याची जणुं समोर मिरवणूकच चालली होती ! प्रथम म्हणजे त्या प्रासादासमोरचें भव्य पटांगण. त्या पटांगणापलीकडे तितकेंच भव्य उद्यान. त्या उद्यानांतले ते दोन मस्त सेडार वृक्ष म्हणजे त्या बगिच्याचे मानकरीच वाटत होते ! नंतर दूर पलीकडे जिनीवा सरोवर आणि सरोवरापलीकडचे, जिनीवा शहर आणि आसपासचीं गांवें कुशींत घेऊन स्तब्ध उभे असलेले डोंगर, आणि त्यांच्या मागें आल्प्सची पर्वतश्रेणी व त्या श्रेणींतूनच उन्नत माथ्यानें निश्चल उभा असलेला मॉ ब्लॉ—युरोमधला सर्वोत उंच पर्वत !

सुदैवानें पाऊस नव्हता. पण त्या पर्वतश्रेणीच्या माथ्यावर ढगांची सारखी जा ये सुरू होती. त्यामुळें मॉं ब्लांचें सारखें बदलतें दर्शन होत होतें. त्या नील-धूसर श्रेणींच्या छटा सारख्या बदलत होत्या. मधूनच ढग दूर होत, सूर्याचे किरण मॉं ब्लांवर पडत, आणि त्याचें जरा स्वच्छ सतेज दर्शन होई. लगेच ढग येत आणि तें दर्शन काळवंडे !

दोन ढग त्या पर्वतश्रेष्ठाच्या शिखरावर ठाण देऊन बसले होते—आणि त्याचें समग्र दर्शन अशक्यच झालें.

मॉं ब्लांचे तें तेजस्वी दर्शन, शिखरावरची ढगांची मलीन धूसरता, ढगांच्या बदलत्या छायांमुळें त्या पर्वताच्या दर्शनाची बदलती कळा—खरोखर तो पर्वत म्हणजे मला एक साकार झालेली गूढताच वाटूं लागली. एखाद्या ध्यानस्थ तपोमुनीच्या तेजस्वी चेहेऱ्यावर मधून मधून गढूळ छटा उमटाव्या आणि त्याच्या भस्मार्चित जटासंभारामुळें त्या छटा अधिकच विषण्ण वाटाव्या, तसें त्या पर्वताचें दर्शन मला वाटलें.

इतक्यांत मला आठवलें. आदल्या वर्षी एअर इंडियाचें विमान ह्याच पर्वताच्या दरींत कोसळलें होतें.

त्या गूढतेंत एकदम भीतीच्याही छटा शिरल्या.

मीं मनांतल्या मनांत त्या दृश्याला वंदन केलें आणि परत यावयास निघालों !

## : २१ :

मंगळवारीं रात्रीं मी लंडनला जाण्यासाठीं निघालों.

स्लीपरमध्यें एक इंग्रज गृहस्थ माझ्या कम्पार्टमेंटमध्यें होता. इंग्लंडला जायला निघाल्याबरोबर एक नमुनेदार इंग्रज गृहस्थ माझा सोबती म्हणून भेटावा हा मोठा योगायोगच नव्हे काय ?

पाहतांक्षणींच हा गृहस्थ शहरवासी नाहीं हें ध्यानांत येत होतें. मीं विचारलें तेव्हां तो उत्तरला,

"I live in the country." ( मी खेड्यांत राहतों. )

पण ह्या उत्तर देण्यांत कमालीची अनिच्छा दिसली, इतकी कीं ह्याच्याशीं गप्पा मारण्याचा मीं नंतर प्रयत्न केलाच नाहीं.

पण तो बेफिकीर नव्हता. युरोपमध्यें सारख्या सरहद्दी बदलतात, आणि पासपोर्ट वगैरे कागद अधिकाऱ्यांना दाखवावे लागतात. एक अधिकारी येऊन आमचे पासपोर्ट मागून घेऊन गेला, तेव्हां ह्या गृहस्थानें आपण होऊन मला म्हटलें, "रात्रीं आपली झोपमोड होऊं नये म्हणून तो आतांच पासपोर्ट घेऊन गेला. उद्यां सकाळीं परत करील."

त्याच्या आवाजांत साहाय्यक बुद्धि जाणवली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्याला थोडें गप्पांत ओढावें म्हणून म्हटलें,

"चर्चिलचं सरकार अधिकारारूढ झालं ह्याबद्दल ब्रिटिश लोकांना काय वाटतं?"

मला वाटलें, ब्रिटिश लोक हवेप्रमाणें राजकारणावर बोलण्यास खूष असतात, पण तो एवढेंच म्हणाला, "Well, some people like it, some don't." (कांहीं लोक खूष आहेत, कांहीं नाखूष.)

ब्रिटिशांना बोलके करणें म्हणजे काय प्रकरण आहे ह्याची ह्या अनुभवावरून चांगली कल्पना आली. एका दृष्टीनें ही ब्रिटनची आगाऊ ओळखच होती, पण दर सेकंदाला ब्रिटनकडे पळत असतांना मला कांहीं ती उत्तेजक वाटली नाहीं.

* * *

पॅरिसला गाडी सकाळीं ६ वाजतांच आली. कां नकळे, पॅरिसबद्दल मला फारशी उत्सुकता कधींच वाटली नाहीं, आणि आतां, गाडीबाहेर जाऊन स्टेशन पाहावें असेंही वाटलें नाहीं.

गाडीच्या खिडकींतून दिसणारा देश पाहावा असें मात्र तीव्रतेनें वाटलें. माझी थोडी निराशाच झाली. पावसाळ्यांत देशावरचा प्रदेश दिसतो तसा फ्रेंच मुलूख दिसत होता. (कॅलेकडचा समुद्रकांठचा भाग अर्थात् अगदींच निराळा होता.) देशावर मोठमोठीं शेतें असतात तशींच शेतें व मधूनच एखादा डोंगर आणि त्याच्यावर तुरळक झाडे! ह्या ऋतूंत त्यांचीं पानें गळून गेलेलीं किंवा पिवळीं झालेलीं, एवढाच फरक!

कांहीं ठिकाणीं शेताच्या कांठीं, कोंकणांतील सोनावळीसारखीं लहान लहान पिवळीं फुलें दिसलीं त्याचें आश्चर्य वाटलें. लहानपणीं माझ्या जीवनांत शिरलेलीं हीं फुलें इकडे कोठें, आणि ह्या हंगामांत कशीं?

कॅलेच्या जवळजवळ गाडी येऊं लागली तशीं घरामागून पडकीं घरें दिसूं लागलीं. युद्धांतील वैमानिक हल्ल्यांच्या विदारक जखमा धारण करून कशींबशीं उभीं असलेलीं तीं घरे आणि कारखाने म्हणजे मानवी संस्कृतीकडे बघून केलेलीं विकट हास्येच वाटलीं!

★ ★ ★

आम्ही खाडी एका फ्रेंच बोटींतून ओलांडली. इतकी वैभवपूर्ण बोट मीं पूर्वी कधीं पाहिलीच नव्हती. हा अर्थात् माझ्या अल्पानुभवाचा भाग होता, पण मी पहिल्या वर्गानें प्रवास करीत असल्यानें (आणि त्याची मला फारशी संवय नसल्यानें) हें वैभव अंगावर येत असल्यासारखें वाटले!

बोटींत मला दोन फ्रेंच इंजीनिअर्स भेटले. त्या ब्रिटिश माणसाचा अनुभव ताजा असल्यामुळें मी जरा आंखडत्या वृत्तीनेंच वागत होतों. पण त्यांनींच माझ्याशीं स्नेह जोडण्यास प्रारंभ केला—आणि ब्रिटिश माणूस आणि फ्रेंच माणूस ह्यांतला फरक ध्यानांत आला. त्यांनीं मला रेस्टोरॉंमध्यें नेलें आणि आम्ही कॉफीच्या कपावर मनसोक्त गप्पा मारल्या.

युरोपमध्यें युद्धानंतर फ्रेंच भाषेची पिछेहाट होत असून इंग्रजीचें (विशेषतः अमेरिकन इंग्रजीचें) वर्चस्व वाढत आहे ह्याची त्यांना खंत वाटत होती. फ्रेंचच्या अधोगतींत युरोपिअन संस्कृतीचीच अधोगति आहे असें एकानें बोलून दाखविलें.

★ ★ ★

डोव्हरहून निघालेली गाडी कोठें न थांबतां भराभर लंडनकडे निघाली होती. मी अनिमिष नेत्रांनीं बाहेरचें सृष्टिसौंदर्य पाहात होतों. येथेंही भाग्याचा अनुग्रह माझ्यावर झालाच. जिनीवाला इंग्रजी वृत्तपत्रांत मी सारखें वाचीत होतो, कीं लंडन सध्यां पाऊस आणि धुकें ह्यांनीं वेढलेलें आहे. पण डोव्हरवर पाऊल टाकलें तेव्हां आकाश केवळ निरभ्र होतें—इतकें कीं, त्या निळ्याभोर आकाशांत कागदाच्या कपट्याएवढाही ढग दिसत नव्हता.

इंग्लंडचें तें निसर्गदर्शन पाहून माझें मन हरखून गेलें. बाराही महिने पर्जन्याचें सिंचन होत असल्यामुळें जिकडे तिकडे हिरवेंगार असतें एवढेंच त्या निसर्गाचें आकर्षण नाहीं. त्या निसर्गावर ब्रिटिश लोकांचा जो व्यवस्थेचा काळजीपूर्वक हात फिरलेला आहे तें त्याचें खरें आकर्षण आहे. मोठमोठीं कुरणें हें इंग्लंडच्या ग्रामीण विभागाचें वैशिष्ट्य आहेच, पण हीं कुरणें टेनिसच्या

लॅनप्रमाणें सुव्यवस्थित, नीटस ( पण अर्थात् विस्तृत ) वाटतात. इंग्लंडमधील गवताच्या प्रत्येक काडीवर, झाडाच्या प्रत्येक फांदीवर आणि जमिनींतील प्रत्येक खड्यावर माणसाचा हात फिरला आहे कीं काय असें वाटलें. फ्रान्समधून येतांना असें वाटलें नव्हतें.

अधुनमधून जंगलें दिसत, पण राखीव ( शब्दशः राखलेलीं ) जंगलें होतीं तीं. झाडें लहानलहानच, पण व्यवस्थित वाढविलेलीं. झाडांवरचीं पानें पिवळीं-धमक. लाललाल पानांचीं झाडें मात्र फारशीं दिसलीं नाहींत. बरींचशीं निष्पर्णच दिसलीं. मला युरोपांत पानगळीच्या पर्णरंगांचें सौंदर्य दिसलें त्याला आतां तीन आठवडे झाले होते. शिवाय इंग्लंड, इटली-युगोस्लाव्हिआच्या किती तरी उत्तरेस. झाडांचीं पानें अगोदरच गळून गेलीं होतीं. पण मानवी व्यवस्थेचा स्पर्श झालेल्या त्या जंगलांतलीं तीं निष्पर्ण झाडेही थोडींशीं सुसंस्कृत शालीनच वाटत होतीं. त्यांच्या उघड्याओक्या दर्शनाने सौंदर्याची थोडीशी निराळीच जाणीव झाली, पण ती उग्र रानटी नव्हती, भकास नव्हती अगर विरक्तही नव्हती !

क्वचित् चांगले फुलांनीं फुललेले बगीचे दिसत ! हींच तीं ' विंटर फ्लॉवर्स ' ! हिंवाळ्यांतलीं फुलें ! निळीं, लाल, पिवळीं, सफेत ! त्यांची कोण निगा ! पुष्कळ फुलझाडांसाठीं मुद्दाम उबदार कांचगृहें उभारलेलीं होतीं. उद्यां शोभिवंत दिवाणखान्यांत तीं फुलें गेलीं म्हणजे त्यांची मिजास अधिकच वाढेल. खुद्द मालकिणीचा मृदु प्रेमळ हात त्यांच्या कोमल अंगावरून फिरेल ! पण मला त्यांनीं दिलखुलास आनंद झाला नाहीं. कांहीं म्हटलें तरी ते व्यापारी सौंदर्य !

कुरणांत चरतांना दिसणारीं गुरें पाहून मात्र मनापासून आनंद झाला ! प्रत्येक गुराचें शरीरसौष्ठव पाहून अगदीं समाधान वाटलें !

पश्चिमेकडच्या आकाशात अपूर्व ( म्हणजे मीं पूर्वी कधीं न पाहिलेलें, इतकेंच नव्हे तर पूर्वी कधीं न कल्पिलेलें ) दृश्य दिसलें. क्षितिजावर किती तरी वर आकाशांत लाल लाल सूर्यबिंब दिसत होतें. ' वरी बिंब जे लाल आलें विशाळ ' तें हिंदुस्थानांत मीं अनेकदां पाहिले होतें. पण तो उमाळ्यावरचा तप्त गोळा ! पाव अर्ध्या घटकेंत तो नजरेला जाळून टाकूं लागतो. पण हे सूर्यबिंब आकाशांत खूप वर एखाद्या आकाशकंदिलासारखें लोंबकळत होतें आणि नेत्रांना विलक्षण आल्हाद देत होतें !

लंडनच्या उपनगरांत आमची गाडी शिरल्यावर घराच्या रांगाच रांगा दृष्टीस पडूं लागल्या. एकासारखीं एक तीं मातटलाल विटांचीं घरें! सारख्या आकाराचीं, सारखीं दिसणारीं तीं एकसुरी घरें पत्त्याच्या बंगल्यांप्रमाणें दिसलीं. प्रत्येक घरावर चौकोनी धुराडें, आणि घरामागें मागीलदारचे अंगण!

ह्या अंगणांत इंग्रज गृहस्थाच्या जीवनांत जी कांहीं अव्यवस्था, केरकचरा अगर घाण असेल त्याचें मुक्त दर्शन होत होतें! तीं अंगणेंसुद्धा घराप्रमाणेंच एकसुरी. त्यांत तोच कचरा, तींच लाकडें, तीच जुनी मोडतोड! क्वचित् एखाद्यांत कोंबडीचें खुराडें दिसे, अगर भाजीचा वाफा आढळे!

* * *

अमेरिकन एक्स्प्रेसनें व्यवस्था केल्याप्रमाणें मी व्हिक्टोरिआ स्टेशनला लागून असलेल्या ग्रव्हनर हॉटेलमध्यें उतरलों. पण हें महागडें हॉटेल माझ्या खिशाला परवडणारें नव्हतें. मी लगेच हॅम्पस्टेडला कानिटकरांना फोन करून त्यांच्याकडे राहण्याची व्यवस्था केली!

हें हॉटेल महाग असेल! पण तेथले नोकर चाकर खऱ्या आदबीनें वागत. रात्रीं जेवतांना, वेटर्स गिऱ्हाइकाकडे मनःपूर्वक लक्ष देत असल्याचें माझ्या अनुभवास आलें.

एका वेटरचें माझ्याकडे विशेष लक्ष दिसलें. तो मध्येंच माझ्याकडे येई आणि विनम्रतेनें विचारी, "All right, Sir?" आणि निघून जाई.

जरा वेळानें तो आला तेव्हां त्याचा चेहेरा जरा फुरसतीचा दिसला. त्यानें मला म्हटलें, "When you go back, Sir, please take me with you." (आपण परत जाल तेव्हां बरोबर मला घेऊन जा.)

मीं विचारलें, "पण हा देश सोडण्याची तुला इच्छा कां होते आहे?"

तो उत्तरला, "Fed up!" (कंटाळलों!)

भारतीयांना युरोपांत जावेंसें वाटतें, युरोपिअनांना भारतांत येण्याची तळमळ लागते!

तो मला आणखी म्हणाला, "मला भारताबद्दल आदर आहे. कां ठाऊक आहे? एका हिंदी डॉक्टरनें माझ्या बायकोला एका जिवावरच्या दुखण्यांतून बरं केलेलं आहे."

त्याच्या नजरेंत कृतज्ञता लकाकली. त्याच हॉटेलमध्यें राहून त्या वेटरशीं अधिक दोस्ती करतां आली असती तर किती बरें झालें असतें!

## : २२ :

दुसऱ्या दिवशीं सकाळीं कानिटकरांकडे बिऱ्हाड हालविलें आणि दुपारीं थोडीशी झोंप काढून, बाहेर लंडन पाहायला निघालों. आजही पाऊस नव्हता.

पण कुठें जायचें, कसें जायचें, कांहींच माहीत नव्हतें. हॅम्प्स्टेड हीथकडे उगीचच भटकत निघालों. इतक्यांत रस्त्यानें जातांना दोन महाराष्ट्रीय विद्यार्थी भेटले. एकानें मला ओळखलें.

नमस्कार चमत्कार झाल्यावर ते म्हणाले, 'चला, आपण इंडिया हाऊस-मध्यें जाऊं.' आणि आम्ही बेल्साइझ पार्क स्टेशनवरून ट्यूबनें आल्डविचूला गेलों—

—आणि त्यांच्याच बरोबर परत आलों. लंडनच्या त्या भूमिगत रेल्वेनें प्रवास केल्याबरोबर, त्या शहराचें हें केवढें रहस्यपूर्ण वैभव आहे ह्याची थोडी-बहुत कल्पना आली—आणि हें रहस्य जाणून घेतल्याशिवाय लंडनची ओळख होणार नाहीं ह्याची खात्री पटली.

* * *

'आज ह्या रहस्याचा पूर्ण भेद करावयाचा' असा निश्चय करून मी दुसऱ्या दिवशीं सकाळीं बाहेर पडलों, आणि बेल्साइझ पार्क स्टेशनवर आलों.

पण पुरा गोंधळून गेलों. मी लंडनला आलों त्याच दिवशीं व्हिक्टोरिआ स्टेशनवर जाऊन ट्यूबचें तत्त्व कांहीं ध्यानांत येतें का ह्याचा प्रयत्न केला होता. तेथलीं तीं निरनिराळीं प्रवेशद्वारें, 'फॉलो दि रेड लाईन', 'फॉलो दि ब्ल्यू लाईन' वगैरें मार्गदर्शक सूचना, लोकांची सांचेबंद घाई आणि सुव्यवस्थित बेफिकीरी—ह्या गुहेंत शिरण्याचें धाडस इतक्यांतच नको, असा पोक्त विचार करून, ट्यूब रेल्वेच्या फांट्यांचें एक रेखाचित्र मिळतें तें घेऊन आलों. स्टेशनवरच्या कारकुनानें मला तें दिलें तेव्हां 'How much for this?' हा प्रश्न विचारण्यास मी चुकलों नाहीं! तें मानचित्र कोणालाही विनामूल्य मिळतें!

तो नकाशा खिशांतून काढला, बेल्साइझ पार्क ज्या फांट्यावर आहे त्यावरील एकाद्या चांगल्याशा स्टेशनचें तिकिट काढावें असें ठरविलें, आणि कांहींच निर्णय होईना तेव्हां, आदल्या दिवशीं आल्डविचूला गेलों होतों तेव्हां

त्याच अनुभवाची पुनरावृत्ति करावी म्हणून आल्डविच्चें तिकिट काढलें. लिफ्टनें खालीं आलों आणि वॉटर्लूकडे जाणारी गाडी आहे हें स्टेशनांतल्या फलकावर आणि हातांतल्या नकाशांत पुनः पुनः पाहून, माझें स्थिरचित्त होण्यापूर्वींच, आलेल्या गाडींत बसलों.

टॉटनॅहम कोर्टला गाडी बदलावी लागते ह्याची आठवण होती. नकाशांतही तसें स्वच्छ दर्शविलेलें होतें. पण त्या स्टेशनवर उतरतांना दुसऱ्या एका उतरणाऱ्या गृहस्थाला, खात्री करून घेण्यासाठीं, विचारलेंच. त्या गृहस्थाने एक अतिशय मधुर हास्य केलें आणि म्हटलें,

" Yes, you have to change here. I am sorry, our tube system is so complicated, but once you get to know it, you will find it most convenient. " ( होय होय, तुम्हांला येथेंच गाडी बदलायला हवी. आमची ही ट्यूबची पद्धति इतकी गुंतागुंतीची आहे ह्याचें मला वाईट वाटते, पण एकदा ती तुमच्या परिचयाची झाली कीं तिच्यासारखी सोय नाहीं बघा. ) एवढें तो म्हणाला आणि घाईघाईनें निघून गेला.

मी चकित झालों. ह्या अगत्याची आणि आस्थेची मीं अपेक्षा केली नव्हती.

लंडनमध्यें प्रत्येक जणच घाईत असतो. स्त्रिया तर उंच टांचांच्या बुटांनींही नुसत्या धांवत असतात! हळुहळू मीही धांवत चालूं लागलो. थंडींत त्याची अतिशय गरज असते हें लवकरच माझ्या ध्यानांत आलें.

पण आतां मला घाई नव्हती. नव्हे, ट्यूबस्टेशनवर रेंगाळून ट्यूबपद्धतीचें ज्ञान करून घेणें हेंच माझें कार्य होतें, आणि तें घाईनें साधण्यासारखें नव्हते.

मी स्टेशनावरच्या साऱ्या सूचनाफलकांचा कसून अभ्यास करावयाचें ठरविलें आणि हळुहळू माझ्या ध्यानांत येऊं लागलें, कीं एखादा अगदीं मुका गृहस्थ आला तरी त्याचे अडूं नये, इतक्या सूचना देण्याची व्यवस्था ट्यूब-कंपनीनें केलेली आहे.

* * *

नंबर १ च्या फलाटावरून अमक्या स्टेशनांत गाडी जाते; नंबर २ च्या फलाटावरून तमक्या स्टेशनला जाते, हें तुम्हांला पाठ असण्याचें कारणच नाहीं. त्या फलाटाच्या तोंडाशींच तसें सांगणारा फलक लावलेला असतो.

जंक्शनचें स्टेशन असलें कीं बाहेर पडण्याचा रस्ता कोणता, अमुक फांट्याला जाणारा कोणता, तमुक फांट्याच्या फलाटावर नेणारा कोणता हें ठळक

ठिकाणचा फलक सांगत असतो. डोळे आणि बुद्धि शाबूत असेल आणि साक्षर म्हणविण्याइतकें शिक्षण असेल तर कोणाचेंही अडण्याचें म्हणून कारण नाहीं.

एखाद्या फांट्याला पुढें दुसरा फांटा फुटणार असेल तर नंतरची गाडी कोणत्या फांट्याने जाणार हें स्पष्ट दर्शविणारा फलक समोर टांगलेला असतो. वॉटर्लूहून येणारा 'काळा' फांटा एजवरेला जातो तसा कॅम्डेन टाऊनला दुभंगून हायबार्नेट आणि मिलहिल ईस्टलाही जातो. आगामी गाडी एजवरेकडे जाणार कीं हायबार्नेटकडे जाणार हें स्पष्ट केलेलें असतें–आणि विशेष म्हणजे आगामी दोन गाड्यांचा तपशील फलकावर असतो.

स्टेशनावर त्याच्या नांवाच्या पाट्या तर इतक्या, कीं सहज खिडकीच्या बाहेर बघितले तरी समोर स्टेशनचें नांव उभें असते!

लोकांना सूचना देण्याच्या कंपनीच्या साक्षेपाचें मला मोठें नवल वाटलें!–पण एवढ्यानें काय भागलें! बहिर्दिशेच्या एका ठिकाणीं, Please adjust your dress before leaving. (बाहेर पडण्यापूर्वी पोषाख ठाकठीक करा) अशीही पाटी आढळली!

* * *

माझ्या मनांत विचार आला, ही ट्यूब म्हणजे ब्रिटिशांच्या स्वभावाचेंच प्रतीक नव्हे काय? ब्रिटिश माणूस कोणाशींही स्वतः होऊन बोलणार नाहीं. त्याचें काडीमात्र अडूं नये म्हणून कोण ही दक्षता! आणि पोषाखाविषयींची ती सूचना!–कोणाच्याही नैतिक दृष्टीस कसलाही धक्का बसतां कामा नये हा सनातन ब्रिटिश आग्रह त्यांत दिसत नाहीं काय?

ब्रिटिशांच्या स्वभावाचेंच काय, पण ब्रिटिशांच्या वैभवाचें आणि कांटेकोर उद्योगीपणाचेंही ही ट्यूब रेल्वे निदर्शक आहे.

आज कित्येक वर्षे सारें लंडन तिनें प्रवास करीत आहे. माझ्या मनांत सारखा विचार येई, ब्रिटिशांपाशीं साम्राज्याचें वैभव नसतें, तर ही ट्यूब बांधणें त्यांना शक्य झालें असतें काय?

पण लगेच दुसरा विचार सांगे, नुसतीच साम्राज्याच्या लुटीची ही किमया आहे काय? ब्रिटिशांच्या उद्योगीपणाला, संशोधक बुद्धीला तुम्ही कांहींच का श्रेय देणार नाहीं?

ह्या ट्यूबचे सात फांटे थेम्स नदीखालून जातात. एकमेकांना काटून तर ते अनेकदां अनेक ठिकाणीं जातात. हे भूमिगत रस्ते ह्यांनीं आंखले तरी कसे?

वरचें शहर इमारतींनीं आणि माणसांनीं भरगच्च भरलेलें. त्या इमारतींना अगर माणसांना हात न लावतां आंतला मार्ग त्यांनीं आंखला तरी कसा ?

मला माहित आहे कीं शास्त्रज्ञांना त्यांत कांहींच नवल वाटणार नाहीं. पण ह्या ट्यूबचा संसार पाहत असतांना शास्त्रीय विवेक कोठच्या कोठें पळतो, आणि मन आश्चर्यानें व्यापून जातें !

[ युद्धकालांत ट्यूबस्टेशनें वैमानिक हल्ल्याविरुद्ध आसरा घेण्यासाठीं उपयोगीं पडतात हा अर्थात् परिस्थितीचा शोध ! ]

ट्यूबच्या सबंध इतिहासांत अपघाताचे अपवाद असलेच तर नियमासाठीं. मागची गाडी पुढचीच्या कांहीं ठराविक अंतरांत आलीं कीं आपोआपच तिचा वीजप्रवाह तुटून ती बंदच पडते ! आणि ह्या ट्यूबच्या गाड्या मिनिट दोन मिनिटांनीं येतात. गर्दीच्या वेळीं तर अर्ध्या अर्ध्या मिनिटांनीं !

* * *

ट्यूबचा आणखी एक चमत्कार सांगायचा राहिला, तो म्हणजे एस्केलेटर !

एस्केलेटर ! मला हा शब्द फक्त ऐकून माहित होता. एकदां त्याचा अर्थ मीं अस्थेनें समजावून घेतला होता. मॅक्स ईस्टमनने, मार्क्सवादी जग हें एस्केलेटरसारखें आहे असें विधान केलें होतें, आणि तें समजावून घेण्यासाठीं हा प्रयत्न करावा लागला होता !

एस्केलेटर म्हणजे स्वयंगतीनें फिरणारा जिना. विजेच्या पट्ट्याबरोबर पायऱ्या फिरत असतात. आपण नुसतें एखादी पायरी पकडून तिच्यावर स्तब्ध राहायचें. ती पायरी वरच्या ( अगर खालच्या ) मजल्यापाशीं आलीं कीं त्याच्या तक्तपोशीशीं समांतर जुळते. मग आपण हळूच पाऊल टाकून बाहेर पडायचें !

तुमच्यांत अर्थात् तितका उत्साह असलाच तर ती पायरी वर वर जात असतांनाच ( अगर खालीं येत असतांना — एक जिना वर नेत असतो, शेजारचा खालीं नेत असतो ) तुम्ही नेहमींप्रमाणें पायऱ्या चढूनही जाऊं शकतां. तुम्ही कांहीं सेकंद अगोदर पोंचाल ! मी नेहमीं असें करीत असें, आणि तें करतांना ‘ काळ, काम, वेगा’चीं उदाहरणें आठवीत असें !

एस्केलेटर निर्धोक असतो. तरीपण त्याच्या सांध्यांत कपडे सांपडणार नाहींत अशी काळजी घेतल्यास बरी. एस्केलेटर बसविणाऱ्यांनीं तसें कांहीं होऊं नये म्हणून शक्य तितकी व्यवस्था केलीच आहे ! पण वेळ आहे — वखत आहे !

एकदां एकाची विजार अडकली! अखेरीस विजारीची आशा सोडून त्याला तसेंच ओढून काढावें लागलें–आणि बरोबरीच्या लोकांनीं त्याला ब्लँकेटांत लपेटून घरीं नेलें!

—म्हणजे काम अगदीं पक्कें! ह्यांतही ब्रिटिशांच्या व्यवस्थेचें प्रतीक! बहुतेक सुरळित! पण बिनसलें म्हणजे पार बिघडलें!

## : २३ :

मीं इंग्लंडच्या भूमीवर पाऊल टाकलें तेव्हां तो देश सूर्यप्रकाशानें न्हाऊन निघत होता. पण मी चौदा दिवस इंग्लंडमध्ये होतों, तितके सारे दिवस हें भाग्य माझ्या वांट्यास येईल असा संभव नव्हताच!

इंग्लंडच्या हवामानाची ललनांच्या लहरीशीं तुलना केली जाते. कोणती स्त्री लागोपाठ दोन आठवडे ( आठवडे कशाला, दिवस ) खुशींत असते?

इंग्लंडमधला नोव्हेंबर महिना म्हणजे धुकें व पाऊस ह्यांचा महिना. मी तेथें असतांना धुकें बहुतेक पडलेंच नाहीं, हेंच माझें नशीब. एक दोनदां पडलें, पण तें विरळ मलमलीसारखें. ज्याची भीति अन्यांनीं घातली होती त्या लंडनच्या जीवघेऊ धुक्याचा अनुभव मला आलाच नाहीं.

सकाळीं मी जागा झालों कीं थंडी किती वाजत आहे ह्यावरूनच मी पावसाची कल्पना करीत असें. इंग्लंडच्या नोव्हेंबर महिन्यांत पाऊस पडूं लागला कीं हवा ओलसर बनते, पण थंडी कमी होते. उलट पाऊस बंद होऊन निरभ्र आकाशांत सूर्य तळपूं लागला कीं थंडी चावूं लागते. सूर्याचा नक्षा उतरविण्याचा थंडीचा ह्या मोसमांत मनसुबा असतो कीं काय, नकळे!

बाकी सकाळीं आकाश स्वच्छ असलें म्हणून घटकाभरांत ते भरून येऊन पाऊस झिरपूं लागणार नाहीं ह्याची खात्री नाहीं! स्त्रीची लहर म्हणतात ती काय उगीच!

* * *

लंडनमध्यें आल्याबरोबर केशकर्तनालयाला भेट द्यायची असा निश्चय मीं मुंबईलाच करून ठेवला होता, कारण लंडनच्या न्हाव्यांच्या अनेक कथा मीं ऐकलेल्या होत्या.

आणि हॅम्पस्टेडच्या त्या न्हाव्यानें माझी मुळींच निराशा केली नाहीं.

केस कापायला बसल्याबरोबर मला त्याच्या विनोदबुद्धीचा अनुभव आला.

माझ्या डोक्यावर टकलाचा अंमल झपाट्यानें बसत आहे. म्हणून मीं त्याला म्हटलें, " बाजूचे केस बारीक कर, टाळूवरचे बारीक करण्याचं कारण नाहीं. "

त्याबरोबर तो म्हणाला,

"I am sorry, we here can only cut hair, we cannot stick it." ( आम्ही केस फक्त कापूं शकतो, नवे चिकटवूं शकत नाहीं ह्याचें मला वाईट वाटतें. )

इंग्रज लोक विनोदबुद्धीसाठीं प्रसिद्ध आहेतच. सामान्य लोकांच्या विनोदबुद्धीचा प्रत्यय मला आलाच.

ब्रिटिश ब्रॉडकास्टिंग कॉर्पोरेशनच्या इमारतीचा शोध घेत मी चाललों होतों. दोनचार इसमांनीं सांगितलेल्या खुणांचा मागोवा घेतघेत मी चाललों, पण ती इमारत कांहीं ध्यानांत येईना. अखेरीस मी एका पोलिसाला विचारलें. तेव्हां तो म्हणाला,

"Don't you realise, gentleman, that you are standing exactly in front of the building you are looking for ? "

( तुम्ही ज्या इमारतीचा इतका निक्षून शोध करीत आहांत त्याच इमारतीच्या अगदीं समोर तुम्ही उभे आहांत हें, सद्‌गृहस्थहो, तुमच्या ध्यानांत येत नाहीं काय ? )

मी बी. बी. सी.च्या दुसऱ्या मजल्यावरून खालीं येण्यासाठीं लिफ्टमध्यें शिरलों. लिफ्टवाल्या बाईनें लिफ्ट खालीं नेण्यास सुरुवातही केली, इतक्यांत लिफ्टमधली घंटा कर्रर्र वाजली. लिफ्ट थांबवून तें उलट दिशेनें नेतांना, तसें न करतां आपण लिफ्ट खालीं नेलें तर वरचा इसम कशी ओरड करील ह्याची तिनें मला नक्कल करून दाखविली, आणि त्या क्षणीं ती कुरूप बाई सुद्धां मला मजेदार वाटली !

लंडनमधला न्हावी मला जितका कार्यक्षम वाटला ( त्यानें बरोबर पांच मिनिटांत मला मोकळें केलें होतें. ) तितका धोबी वाटला नाहीं. एका लॉँड्रीमध्यें मीं वूलन सूट धुवायला दिला होता, तो परत देतांना घडी घालून द्यायचें तर तेथल्या नोकरीणीला सुचलें तर नाहींच, पण जमलेंही नाहीं.

पोस्टमन तसेच. मुंबई मराठी साहित्यसंघाचे श्री. बापूराव नाईक ज्या बेल्साईज लेनमध्यें राहत होते ती छोटीशी गल्ली आहे. मीं बापूरावांना पाठविलेल्या पत्रांवर त्यांचा घराच्या नंबर लिहिलेला नव्हता म्हणून त्यांना एक सुद्धां पत्र पोंचलें नाहीं. आमच्याकडच्या पोस्टमनची अशी अडचण कधीं झाली नसती.

* * *

लंडनचा पोलिस ही मात्र अतिशय आवडती आणि आवडण्यासारखी संस्था आहे. प्रत्येक पोलिस हा निदान सहा फूट उंचीचा आणि मजबूत बांध्याचा असतोच. पार्लमेंटच्या सभागृहासमोरचे आणि आंतले पोलिस तर जवळजवळ साडेसहा फूट उंचीचे वाटले. खरें म्हणजे ते हर्क्युलसचे पुतळेच भासले. त्यांचा पोषाख त्यांच्या शारीरिक रुबाबाला शोभूनच दिसतो आणि त्यांचें शिरस्त्राण त्या ग्रीक देवतेच्या स्मरणाशीं सुसंगतच वाटतें. लंडनच्या पोलिसांचें लहान मुलांविषयींचें प्रेम सुप्रसिद्धच आहे. ट्राफलग्यार स्क्वेअरमध्ये कबुतरांचा एक तळ आहे. तेथें कबुतरांची गंमत पाहाण्यासाठीं अधीर झालेल्या मुलांना हलकेच रस्त्यापलीकडे हसतखेळत नेतांना मीं एकदां दोन पोलिसांना पाहिले. ब्रिटिश म्युझियममधील पोलिसाला मीं ह्याबद्दल विचारलें तेव्हां तो म्हणाला, 'The London police is supposed to be human.' (लंडनच्या पोलिसांकडून माणुसकीची अपेक्षा असते.) जनतेचें जीवित आणि वित्त ह्यांजबरोबर माणुसकीचे संरक्षण करण्याची ही कल्पना खरेंच किती हृद्य !

* * *

त्या दिवशीं मीं रस्ता ओलांडण्यासाठीं पाऊल टाकलें, इतक्यांत उजवीकडून मोटर आली. मी थबकलों, पण मोटरवाला आपली मोटर थांबवून 'तूं जा' असें मला खुणेनें सांगूं लागला.

मी चकित झालों. लंडनचे मोटरवाले सुद्धां पोलिसाप्रमाणेच माणुसकीचे उपासक बनले कीं काय ?

मागाहून मला समजलें, कीं लंडनमध्यें सफेत रेषांनीं आंखलेल्या रस्त्याच्या भागावर पादचाऱ्यांचा पहिला हक्क असतो. ह्या भागांत अपघात झाला, तर मोटरवाल्याची कोणतीही कसलीही सबब न ऐकतां त्याला दोन हजार पौंड दंड ठोठावला जातो.

* * *

मुंबईच्या फ्लोरा फौंटनच्या भागांत अगर रेसकोर्सवर मोटरींच्या नवनव्या झकपक मॉडिल्सचें प्रदर्शन उसळतें तसें लंडनला उसळलेलें कोठें दिसलें नाहीं. तेथें मोटर विकत घेण्यासाठीं चारचार वर्षें 'क्यू' लावून राहावें लागतें आणि कारखान्यांचें वैभव ठरणाऱ्या मोटरी देशाचें वैभव ठराव्या म्हणून निर्यात केल्या जातात. लंडनच्या टॅक्सीज् म्हणजे विक्तुरिआ महाराणीसाहेब अगर राजे सातवे एडवर्ड ह्यांच्या काळचीं मॉडेल्स! पुराणवस्तुसंग्रहालयांतलीं हीं धांवतीं प्रदर्शनें इंग्रज लोकांच्या पुराणप्रिय सनातन स्वभावाचे बोलके पुरावेच होत!

लंडनमधल्या टॅक्सीवाल्याला एक वेळ भाडें न दिलें तर तो क्षमा करील पण भाड्यावर चिरीमिरी (टिप्) न दिली तर तो बिथरेल! मनुष्य संतापलेला न दिसण्याचा प्रयत्न करीत कसा बिथरतो, शिव्या न देतां त्यांचा आशय सभ्य शब्दांत कसा व्यक्त करतो, रांगड्या भाषेचा खरपूस उपयोग गोड गोंधळलेल्या चेहेऱ्यानें कसा करतो, आणि तुमची सारी इज्जत तुमच्या देखत गळून कशी पडते व त्यामुळें तुमच्या ऐवजीं दुसऱ्याचेंच मन कसें दुखावलें जात आहे हें जर तुम्हांला अनुभवायचें असेल तर तुम्हीं टॅक्सीवाल्याला टिप् देण्यास विसरण्याचा प्रयोग करा. लंडनच्या टॅक्सीवाल्याच्या दृष्टीनें तुमची शान तुमच्या पोषाखांत नाहीं, तुम्ही कोणत्या हॉटेलांत उतरतां त्याच्यावर नाहीं, तुम्ही कोणत्या विभागांत वावरतां त्याच्यावर नाहीं, ती सारी तुम्ही जी 'टिप्' देतां (अगर देत नाहीं, असें मी म्हणूं शकत नाहीं, कारण ती दिल्याशिवाय तुमची सुटकाच नाहीं) तिच्यांत आहे.

इंग्लंडमध्यें 'टिप्' ही स्वतंत्र संस्था आहे. तिचा संचार हॉटेल, रेस्टोराँ सर्वत्र होत असतो. तिच्या तडाक्यांतून तुम्ही सुटूं शकत नाहीं. कॉंटिनेंटवर टिप् मुळीं तुमच्या भाड्याबरोबरच आकारली जाते. इंग्लंडमध्यें ती तुम्हांलाच द्यावी लागते. टिप् देण्याची 'शान' तुमची तुम्हांला उपभोगण्यास मिळावी असा इंग्लिश पद्धतीचा स्तुत्य हेतु दिसतो?

* * *

लंडनमध्यें मोटरी जाणवत नाहींत. पण बसेस् फार जाणवतात! कारण मिनिटामिनिटांनीं बसेस् येतात. लाललाल वस्त्र परिधान केलेल्या ह्या रस्त्यांच्या राण्या एकसारख्या धांवत असतात! गर्दीच्या वेळीं तर बसेसची रांग लागलेली असते. मी गेलों तेव्हां लंडनची ट्राम आपल्या आयुष्याचे अखेरचे क्षण मोजीत

होती. बसेसमध्यें पुरुष-कंडक्टरांप्रमाणेंच स्त्रीकंडक्टरही दिसल्या. गेल्या महायुद्धांत ट्रामबसेस स्त्रियांनीं चालविल्या आणि त्या इतक्या कार्यक्षमतेनें चालविल्या, कीं थोड्याच दिवसांत हा व्यवसाय पूर्णतः त्यांच्याच ताब्यांत जाईल असें वाटतें. इंग्लंडमध्यें श्रमकऱ्यांचा तुटवडा किती आहे ह्यांचीही मूक कहाणी त्या सांगतात. लंडनच्या कंडक्टरांच्या कार्यक्षमतेची ख्याति त्रिखंड आहे. दोनही मजल्यांना एक कंडक्टर; पण, लंडनच्या रस्त्यांचा अचूक वेध घेण्यांत पूर्णपणें अयशस्वी झालेल्या मला माझे उतरण्याचें ठिकाण आलें म्हणजे मजकडे येऊन जाणीव देण्याचें काम तो बिनचूक आणि विशेष म्हणजे हसतमुखानें करी.

लंडनचे लोक प्रामाणिक आहेत, आपण होऊन भाडें अगत्यानें देतात हें एकच कंडक्टर पुरण्याचें कारण असेलच, पण लंडनच्या बसमध्यें 'भाडें चुकविण्याचा प्रयत्न केल्यामुळें लोकांवर खटले भरण्यांत आलेले आहेत' अशा इशाऱ्याची पाटी दृष्टीस पडते! अर्थात् 'खटले भरण्यांत आलेले आहेत' ह्या वस्तुस्थितिनिदर्शक इशाऱ्यांत लंडनच्या जनतेचा गौरवच आहे आणि 'भाडें चुकविणे म्हणजे आपलें ओझें दुसऱ्यावर टाकणें' हा त्या पाटीचा उत्तरार्ध गौरवास्पद आहे, हे सांगायला नकोच.

* * *

'भाडें चुकविण्यासाठीं खटले भरले गेले आहेत' हें वाक्य फार अर्थपूर्ण होतें. लोकांनीं मला सांगितलें, कीं युद्धानंतर लंडनची नीति पार बिघडून गेली आहे. स्त्रीपुरुष संबंधही फार शिथिल झाले आहेत. सार्वजनिक उद्यानांत स्त्रीपुरुषस्नेहाचे विविध विलास चालतात. पण पोलिस आणि न्यायखातें ह्या प्रकाराकडे बरेंच औदार्यानें पाहातें. राहण्याची जागा हें नैतिकतेचें एक मोठें साधन आहे, असें म्हणतात. धोतराचा अगर चादरीचा आडोसा लावून जेथें संसार करावा लागतो तेथें कसली नीति? आणि कसली सभ्यता? लंडनमध्यें राहण्याच्या जागेचा प्रश्न (इतर सर्व शहरांप्रमाणें) फार बिकट झालेला आहे!

एकदा फ्लीट स्ट्रीटमध्यें बससाठीं क्यूमध्यें उभा राहिलों असतां एक मजेदार दृश्य दृष्टीस पडलें. एक तरुण प्रियकर आपल्या प्रियेवर चुंबनाचा वर्षाव करीत होता. चुंबनांच्या विविध प्रकारांचा प्रयोगच जणुं तो करीत होता! पण विशेष लक्षांत घेण्यासारखी गोष्ट अशी, कीं त्यांच्या त्या कामक्रीडांकडे क्यूमधले इतर लोक काडीमात्र लक्ष देत नव्हते!

लीमिंग्टन स्टेशनवर गाडीसाठीं वाट पाहात असलेल्या गर्दीत मला ह्यान्च प्रकाराची पुनरावृत्ति आढळली—प्रियकरांच्या चुंबनांची आणि इतरांच्या उदासीनतेची !

* * *

इंग्रज राष्ट्राचें अंतरंग त्याच्या वृत्तपत्रांतून ओळखतां येईल काय ?

म्हटलें तर होय आणि म्हटलें तर नाहीं, असे केळकरी उत्तर देतो.

वर वर दृष्टीनें पाहिलें तर नाहीं. मी चौदा दिवसांत लंडनच्या वृत्तपत्राचें जें बरेचसें उथळ निरीक्षण केलें त्यावरून तीं वृत्तपत्रें त्या थोर राष्ट्राचीं निदर्शक आहेत असें म्हणतां येईलसें वाटत नाहीं.

लंडन टाइम्स, डेली टेलिग्राफ, गार्डियन ह्यांसारखी कांहीं निवडक वृत्तपत्रें सोडलीं तर इंग्लिश वृत्तपत्रें मला तरी 'सनसनाटीभेरलो' वाटलीं आणि तींच विशेष खपतात.

एखाद्या दरोडेखोराचे तुरुंगांतून पलायन अगर त्याला अटक, एखाद्या रंगेल विधवेचें प्रणयप्रकरण, एखाद्या लहान मुलीचें अपघाती अंतर्धान, इत्यादि विषयच लंडनच्या वृत्तपत्रांना मथळे पुरवितात असें दिसलें. हे विषय नसलेच तर एखादा दरोडा, एखादा रहस्यमय खून, एखादी नागरिक धुमश्चक्री असे विषय हात जोडून उभे असतातच.

ज्यांना 'विशेष स्तंभ' असें म्हणतात त्यांतला नामांकित लेखकांचा मजकूर वाचला तरी तो बड्या लोकांच्या आणि त्यांच्या 'पट्टराण्यां'च्या पोषाखांच्या, दागिन्यांच्या आणि हालचालींच्या वर्णनांनीं भरलेला !

अर्थात् ह्या पत्रांच्या कार्यक्षमतेबद्दल अगर लेखनशैलीबद्दल प्रश्नच नाहीं.

एकदां एका कैद्याला कोर्टांत नेत असतांना त्याच्या गाडीला अपघात झाला. त्या अपघाताचें सचित्र वर्णन तो कैदी अर्ध्यापाऊण तासांत कोर्टांत जाऊन दाखल होण्यापूर्वीच छापून रस्त्यावर आलें !

मी तेथें होतो तेव्हां राजकुमाराचा तिसरा वाढदिवस साजरा झाला. 'इव्हिनिंग स्टँडर्ड 'नें त्याच्या वर्णनाची सुरुवात अशी केली होती :

If you are a prince and if you are celebrating your third birthday you would spend the day in the following manner : ( तुम्ही युवराज असाल आणि तिसरा वाढदिवस साजरा करीत असाल तर

तुम्ही तो दिवस असा व्यतीत कराल : ) आणि मग त्या दिवसाचें साग्रसंगीत वर्णन !

एका मुलावर जुगार खेळल्याचा खोटा आरोप आला होता; कोर्टोत तो निर्दोष सुटला — ह्याचें ' डेली मेल 'मधील वर्णन मला एखाद्या आंग्ल अच्युत बलवंतनें लिहावें तसें वाटलें !

पण ह्या वृत्तपत्रांच्या दृष्टीनें राजे, रजवाडे, नट, नामांकित दरोडेखोर, खुनी ह्याच्या बाहेर जगच नाहीं काय आणि त्यांच्या जीवनाबाहेर कशांत जीवच नाहीं काय ?

अर्थात् टाइम्स, गार्डियन, टेलिग्राफ, सण्डे टाइम्स, ऑब्झर्वर, हीं पत्रें ह्याला ठळक अपवाद आहेत. मी ह्यांना आदर्श समजेन. पण इंग्लिश वाचकांना आदर्श पत्रे पसंत नाहींत !

* * *

लंडनच्या रस्त्यावर इतके भारतीय दृष्टीस पडतात कीं येथें इंग्रजांपेक्षां भारतीयच अधिक आहेत कीं काय, असा संभ्रम उत्पन्न होतो. येथे भारतीयांबद्दल मत मात्र फारसे अनुकूल होत नाहीं. ते फार ताठ्यानें वागतात. अनोळखी भारतीयाकडे अनोळखी चेहेऱ्यानें आणि वृत्तीनें वागण्याचा प्रत्येक भारतीय जिवापाड प्रयत्न करतांना दिसतो ! ह्याचा थोडासा अनुभव मला युरोपमध्येंच आला होता. जिनीवामध्ये फॅमिली हॉटेलमध्यें पांच सहा भारतीय जेवायला येत असत, पण मी कोणी तरी काळ्या खंडांतून आल्याप्रमाणें ते माझ्याकडे पाहात असत !

लंडनमध्यें हल्लीं निग्रो विद्यार्थी-विद्यार्थिनींचे थवेच्या थवे दिसतात. त्यांच्याबद्दलचा श्वेतवर्णीय तिरस्कार निदान दर्शनीं तरी दिसत नाहीं. लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्सच्या भोजनालयांत समाजवादी मित्रांबरोबर मी जेवायला गेलों तेव्हां तेथले अनेक गोरे विद्यार्थी एका तरतरीत आणि सुंदर निग्रेस विद्यार्थिनीभोंवतीं गोंडा घोळत असलेले मला दिसले. लंडन युनिव्हर्सिटीमध्यें प्रो. इरावती कर्वे ह्यांना भेटायला गेलों तेव्हां तेथें मला काळ्या आफ्रिकन विद्यार्थी-विद्यार्थिनींचा बराच भरणा दिसला. आफ्रिकन वसाहतींतील विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या वगैरे देऊन त्यांना आपलेंसे करण्याचा निश्चयात्मक प्रयत्न ब्रिटिश सरकाराकडून सध्या सुरू आहे असें मला समजलें. त्याच्या यशस्वितेबद्दल मात्र मी साशंक आहें. युद्धपूर्व काळांत भारतीय कम्युनिस्टांना

नेत्यांचा आणि अनुयायांचा विशेष लाभ ब्रिटनमध्यें शिकून तयार झालेल्या तरुण विद्यार्थ्यांमधूनच होत असे !

* * *

मी बी. बी. सी. च्या मुख्य इमारतीकडून भारतीय कार्यक्रम करणाऱ्या इमारतीकडे येत होतों तों कोपऱ्यावर मला एक वृद्ध बाई खेळणीं विकत असलेली दिसली. जरा लक्षपूर्वक पाहिलें. ती आंधळी होती, आणि तिच्या गळ्यांत 'मी आंधळी आहें, माझीं खेळणीं घेऊन मला मदत करा' अशा अर्थाची पाटी होती. इंग्लंडमध्यें नुसती भीक मागणारे भिकारी दिसत नाहींत. तुमच्या पैशाचा कांहीं तरी मोबदला (नकला, गायन, वादन, कसल्या तरी रूपानें) देण्याची त्यांची धडपड सुरू असते. मी भिकाऱ्याला कधीं कांहीं देत नाहीं, पण हिच्या पेटींत सहा पेन्सचें नाणें टाकलें.

* * *

लंडनमध्यें स्नॅक बार्स, अन्नपूर्णा पद्धतीचीं 'सेल्फसर्व्हिस' रेस्टोरॉ आणि डिपार्टमेंटल स्टोअर्स ह्यांची खूप गर्दी दिसते. युद्धकालापासून असल्या दुकानांना ऊत आला आहे असें समजलें. स्नॅक बार्समध्यें उत्तम चहा मिळतो. 'सेल्फ-सर्व्हिस'मध्यें स्वस्तांत उत्तम जेवण मिळते आणि डिपार्टमेंटल स्टोअर्समध्यें बहुतेक सर्व वस्तु मिळतात ! एका स्टोअरमध्ये बॅंकेची शाखासुद्धां आढळली ! लंडनमध्यें जेवणाचे मात्र हाल ! म्हणजे जेवण मुबलक मिळतें, पण रद्दी असतें. इंग्रज आचारी म्हणजे बेचव जेवणाचे वस्तादच ! जेवण बिघडविण्यांत त्यांची अंगची अक्कल कमी पडते म्हणून कीं काय, जेवणांत ते ऑलिव्हतेल भरपूर ओततात ! पुष्कळ रेस्टोरॉमध्यें वेट्रेसेस सुंदर आणि लाघवी असल्यामुळें रद्दी जेवण थोडेंसे रुचकर भासतें—पण त्यासाठीं अधिक आकार द्यावा लागतो ! भारतीय पद्धतीचें जेवण खूप ठिकाणीं मिळतें, पण तें तिखट असतें. एका चिनी रेस्टोरॉमध्यें एकदा गेलों. तेथें जेवण दरिद्रीही होतें आणि महागही होतें !

* * *

आतां एक गंमतीदार अनुभव ! मी सहसा टोपी अगर हॅट वापरत नाहीं. प्रथम म्हणजे मला डोक्यावर ओझें सहन होत नाहीं (केससुद्धां !) आणि माझ्या छोट्या डोक्याच्या आकाराची टोपी सहसा मिळत नाहीं. पण युरोपमध्यें हॅट वापरावीच लागते. (कारण, पाऊस केव्हांही पडतो.) एकदां पार्लमेंट-गृहाकडून येत असतांना एकदम वाऱ्याचा झोत आला आणि माझी फेल्टहॅट

अलगत उडाली—आणि मांजराप्रमाणें उड्या मारीत मारीत रस्त्यावरून पळूं लागली ! मी अर्थात् तिच्या मागून धांवत सुटलों ! आमची ही शर्यत पाहणारी एक लहान मुलगी बरोबरच्या आईला म्हणाली, "Mummy, look, look, how the gentleman is chasing the hat!" मला फार गंमत वाटली. मला चेस्टर्नचा "On Chasing the Hat." हा निबंध आठवला.

## : २४ :

एल्फिन्स्टन कॉलेज, हायकोर्ट, कॉर्पोरेशन, बोरीबंदर स्टेशन ह्यांच्या इमारतींसारख्या इमारती तुम्ही मनांत आणा, त्यांची अनेकपट करा, त्यांना बरेचसें ओले काजळ फांसा, आणि विस्तृत रस्त्यांवर दोनही बाजूला त्या उभ्या करा—आणि हो, त्यावर लहरी हवा पसरा—म्हणजे तुम्हांला लंडनचें वातावरण कसें असते ह्याची थोडीबहुत कल्पना येईल.

लंडन हें बेल्ग्रेडप्रमाणेंच विमानहल्ल्यांनीं बरेंचसें बेचिराख झालेलें शहर आहे. बेल्ग्रेडमध्यें नव्या आधुनिक पद्धतीच्या इमारती तुमचें लक्ष वेधून घेतात, तसे लंडनमध्यें होत नाहीं. आधीं अनेक ठिकाणीं उध्वस्त जागेची साफसफाई झालेलीच नाहीं. कांहीं ठिकाणीं ह्या जागेचा उपयोग छोट्याछोट्या बागा अगर तसेंच कांहीं तरी उभारण्यासाठीं केलेला आहे. आणि जुन्या इमारती जुन्या पद्धतीनेंच उभारण्याचा इंग्रजांचा सनातन आग्रह आहे. युद्धाच्या कालांत पार्लमेंटगृहाचें अतोनात नुकसान झालें. त्याच्या पुनर्रचनेचें कार्य अद्याप सुरू आहे. पण हें गृह अंतर्बाह्य जसें होतें तसेंच नेमकें उभारण्यासाठीं सारी बुद्धि आणि सारी कारागिरी खर्च होत आहे.

त्या मानानें बी. बी. सी.ची इमारत मला अगदीं नवीन धर्तीची वाटली. अर्थात् रेडिओ हें अगदीं नवें प्रकरण आहे. त्याच्यांत ब्रिटनची परंपरा आणि तिचा अभिमान गुंतलेला नाहीं. म्हणून नवीन तऱ्हेची इमारत उभारण्याच्या आड ब्रिटिशांचा राष्ट्रीय अभिमान आलेला नसावा. ह्या इमारतीचें वैशिष्ट्य असें कीं तिची सबंध रचना एखाद्या बोटीसारखी आहे. मी लवकरच बोटीनें निघणार होतों आणि त्या बाबतींत समुत्सुक बनलों होतों म्हणून कीं काय नकळे, मला ही रचना फार आवडली !

पण लंडनचें अभिजात दर्शन ह्या इमारतीनें होणार नाहीं. त्यासाठीं पिकॅडली सर्कस अगर ट्राफलगार स्क्वेअरमध्यें गेलें पाहिजे; स्ट्रँड, पॉल माल, शॅफ्ट्स्बरी ॲव्हेन्यू, फ्लीट स्ट्रीट, ऑक्सफर्ड स्ट्रीट, इत्यादि रस्त्यांनीं हिंडलें पाहिजे. पण खरा अभिजात अनुभव व्हाइट हॉलवरून फेरफटका करण्यांत आहे. येथें विख्यात १०, डाउनिंग स्ट्रीट आहे, आणि ब्रिटिश सरकारच्या कचेऱ्या आहेत. १०, डाउनिंग स्ट्रीट हें ब्रिटिश पंतप्रधानाचें निवासस्थान, पण, खरोखर तें एकाद्या पेन्शनर पोलिस-अधिकाऱ्याच्या दगडी घराप्रमाणें दिसतें ! राष्ट्रकुल-संबंधकचेरी ज्या इमारतींत आहे तिची रचना आणि बाह्यांगावरचें शिल्प इतालिअन पद्धतीने सर गिल्बर्ट स्कॉट ह्यांनीं केलेलें आहे. राष्ट्रकुलमधील देशांतलीं अतिआकर्षक दृश्यें त्याच्यावर कोरलेलीं दिसतात. समोरच तो सुप्रसिद्ध व्हाइट हॉल. त्याच्या बॅंक्वेटिंग हाऊसच्या एका खिडकींतून पहिला चार्ल्स राजा फांसावर चढला !

* * *

पुढें लॅंबेथ ब्रिजकडे जाणाऱ्या रस्त्यानें गेलें कीं डाव्या बाजूला पार्लमेंट-गृह लागतें. फेनर ब्रॉकवे प्रभृतींना भेटण्यासाठीं मला ह्या ऐतिहासिक इमारतींत जाण्याची संधि मिळाली. नंतर प्रेस ट्रस्टचे श्री. पेंडसे ह्यांनीं मला प्रेस गॅलरीमध्यें नेऊन कॉमन्सच्या बैठकीचें काम कसें चालतें हें प्रत्यक्ष दाखविलें. मध्यंतरीं कॉमन्सचें सभागृह वैमानिक हल्ल्यांनीं उध्वस्त झाल्यामुळें कॉमन्सच्या सभा लॉर्ड्समध्यें भरत असत. आतां त्या ह्या पुनरुज्जीवित सभागृहामध्यें भरतात. हें सभागृह उभारतांना शक्य तितकी जुनी रचना आणि प्राचीन शिल्प कायम ठेवण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. फक्त जुन्यांतल्या कांहीं अडचणी तेवढ्या काढून टाकण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. प्रेस गॅलरी ही अध्यक्षाच्या अगदीं डोक्यावर आहे. तेव्हां त्याचें दर्शन झालें नाहीं. त्याच्या-समोर जो पुरातन राजदंड आडवा ठेवलेला असतो त्याचें तेवढें दर्शन झालें.

तेथील कामकाजाचें वर्णन काय करणार? आपल्या सारखेंच! तशींच कंटाळवाणीं भाषणें आणि तसेच पेंगणारे कंटाळलेले सभासद !

* * *

ब्रॉकवे वगैरेंना भेटण्यासाठीं मी पार्लमेंटच्या सेंट्रल लॉबीमध्यें गेलों तेव्हां मला ब्रिटिश लोकशाहीचें एक वैशिष्ट्य दिसलें. अनेक लोक स्ट्रेंजर्स गॅलरींत (प्रेक्षकांच्या गॅलरींत) जाण्यासाठीं रांगा लावून उभे होते. आपल्याकडे एम्.

एल्. ए. अगर एम्. पी. चा वशिला असल्याशिवाय विधिमंडळाच्या बैठकीस हजर राहणें अशक्य असतें. ब्रिटनमध्येंही एम्. पी. पासेस देतातच. पण दररोज ४। वाजल्यानंतर (शुक्रवारीं ११–३० नंतर) प्रत्येक नागरिकाला प्रवेश-परवान्यासाठीं तेथील ऑफिसरकडे व्यक्तिशः अर्ज करून प्रेक्षकांच्या गॅलरींत जातां येते आणि आपले प्रतिनिधी काय करीत आहेत (अगर करीत नाहींत) तें पाहातां येतें. पंधरा पंधरा मिनिटांनीं, रांगेंत उभ्या असलेल्या प्रेक्षकांना गटागटानें परवाने दिले जातात.

ही सेंट्रल लॉबी फार भव्य आहे. सभासदांना भेटायला आलेले गृहस्थ येथें बसतात. नेहमीं हळू बोलणारीं इंग्रज माणसें येथें त्याहूनही हळू बोलतात. लॉबीच्या उंच विशाल भिंतीवर चार बाजूस, स्कॉटलंड, इंग्लंड, वेल्स आणि आयर्लंड ह्या चार विभागांच्या राष्ट्रीय संतांचीं चित्रें आहेत. ह्या संतांचें दर्शन घेऊन ब्रिटिश पार्लमेंटचे सभासद आंत जातात आणि आपलें चाणक्यनैतिक राजकारण निष्ठेनें पार पाडतात!

लॉबींत जातांना डाव्या बाजूला एक मोठा विस्तृत हॉल दिसतो. त्याचें दर्शन दरिद्री, धुळकट वाटले. पण ह्याच हॉलमध्ये बादशहा अगर महाराणी ह्यांचा दरबार भरतो. त्या वेळीं उंची गालीचे घालून आणि अन्य सजावट करून ह्याच दरिद्री हॉलचें वैभवशाली बादशाही हॉलमध्ये रूपांतर करण्यांत येतें.

पार्लमेंटगृहाच्या रेस्टोरॉंमध्यें मला प्रथम जॉह्न्स्टन ह्यांनीं नेलें, तेव्हां माझ्या नेत्रांना एक आश्चर्यकारक जाणीव झाली. तेथील चौकोनी टेबलांवर जीं आच्छादनवस्त्रें होतीं तीं तिरंगी होतीं—आणि त्यांचे ते तीन रंग थेट आपल्या राष्ट्रध्वजाच्या सारखे होते. मध्यें मात्र नील-चक्र नव्हतें. हीं टेबलक्लॉथ्स समोर आल्यावर, आपल्या राष्ट्रध्वजाची रंगसंगति अनेक दिवसांनीं माझ्या नजरेस पडली म्हणून मला आनंद झाला, कीं भारताच्या राष्ट्रध्वजाची ऐट मिरविणाऱ्या कापडाचा असा क्षुद्र उपयोग करण्यांत येत आहे ह्याचें वाईट वाटलें हें सांगणें कठिण आहे!

* * *

मी लेबरपार्टीच्या ट्रॅन्स्पोर्ट हाऊसमध्यें जातांना नेहमीं ह्याच रस्त्यानें जात असे. कां नकळे, मला लॅंबेथ ब्रिजचें अतिशय आकर्षण वाटूं लागलें आणि ट्रॅन्स्पोर्ट हाऊसकडे जाणारा रस्ता ह्या पुलाच्या पायथ्याशीं उजवीकडे वळतो.

पार्लमेंटगृहाचें उत्कृष्ट दर्शन वेस्टमिन्स्टर ब्रिजच्या मध्यभागावरून होतें, पण टेम्सच्या कांठावरील पार्लमेंटगृहाचें जें छायाचित्र क्रमिक पुस्तकांत दृष्टीस पडतें, आणि जें माझ्या मनांत लहानपणासून भिनलेलें आहे तें लॅम्बेथ ब्रिजवरून घेतलेलें आहे हें माझ्या लगेच ध्यानांत आलें, आणि मी मुद्दाम लॅम्बेथ ब्रिजवर गेलों आणि तें दृश्य डोळे भरून पाहून घेतलें.

लेबर पार्टीची मुख्य कचेरी ( म्हणजे ट्रॅन्स्पोर्ट हाऊस ) ही एक नमुनेदार कचेरी आहे. एखाद्या सरकारचीं जशीं खातीं असतात तशीं ह्या कचेरींत खातीं आहेत, आणि प्रत्येक खात्यावर अधिकारी व्यक्ति आहे. ह्या कचेरींत आलें म्हणजे सेक्रेटॅरिएटमध्येंच आल्यासारखें वाटतें. फक्त आस्था आणि आतिथ्य ह्यांची भर! त्या मानानें सोशॅलिस्ट इंटरनॅशनलचे ज्यूलियस ब्रॉन्थॉल ह्यांची कचेरी म्हणजे मला एक खाजगी घरच वाटले – तेथल्या वातावरणासकट !

★ ★ ★

पार्लमेंटगृहाकडून व्हाइट हॉलवरून तुम्ही आलात कीं सरळ ट्राफलगार स्क्वेअरमध्यें येतां. हा स्क्वेअर म्हणजे अक्षरशः चवाठा आहे. कोणीही यावें नि येथें सभा भरवावी, गप्पांचा अड्डा मांडावा नाहींतर एखादें माफक भांडण पार पाडावें! येथें केव्हां कोठली सभा चालू असेल ह्याचा नेम नाहीं. रेंगाळणारे भटक्ये येथें नेहमीं आढळतात.

ट्राफलगारच्या लढाईचा विजेता नेल्सन ह्याचा येथें भव्य पुतळा आहे. हा सतरा फूट उंचीचा पुतळा १६८ फूट उंचीच्या स्तंभावर विराजमान आहे. स्तंभाच्या चौकोनी चबुतऱ्यावर 'नाईलची लढाई', 'केप सेंट व्हिन्सेंटची लढाई', 'कोपनहॅगनची लढाई' आणि 'नेल्सनचा मृत्यु' असे चार प्रसंग कोरलेले आहेत. हा चबुतरा ज्या चौथऱ्यावर आहे त्याच्या चार टोंकांना चार सिंह आहेत.

लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे ह्या स्मारकाच्या समोर, व्हाइटहॉलच्या बाजूला, पहिल्या चार्ल्सचा पुतळा आहे. हा पुतळा क्रॉम्वेलनें छिन्नविच्छिन्न कसा केला नाहीं ह्याचें आश्चर्य वाटतें. क्रॉम्वेलची क्रांति ही मार्क्सवादी क्रांत्यांच्या प्रथेंत बसणारी आहे, असें मार्क्सवाद्यांचें म्हणणें आहे. लिऑं ट्रॉट्स्कीनें त्याच्यावर एक पांडित्यपूर्ण भाष्य लिहिलेलें आहे. पण ब्रिटनच्या क्रांतिकारकांची सुद्धां वृत्ति एकंदरींत निराळी दिसते !

★ ★ ★

लंडन शहर हें पुतळ्यांचें शहर आहे हें सुप्रसिद्धच आहे. पिकॅडली सर्कस-मधला इरॉसचा कलामय पुतळा नुकताच, त्याला नवजीवनाची झिलई देण्यासाठीं, काढल्याची बातमी वाचली. त्या पुतळ्यानें माझें तितकेंसें लक्ष वेधून घेतलें नाहीं, ह्याचें कारण तेथली घाई ! माझ्या लक्षांत पुतळा राहिला आहे तो व्हाइटहॉलच्या रस्त्यावरचा लॉर्ड किचनेर ह्यांचा. एकदां बादशहांच्या रक्तवेषधारी संरक्षक घोडेस्वारांची पलटण तेथें शिस्तींत टाप टाप करीत असलेली पाहिली आणि तिच्या रंगदार तेजदार पार्श्वभूमीवर ह्या पुतळ्याचें अविस्मरणीय चित्र माझ्या मनावर उमटलें !

ट्राफलगार स्केअरमध्येंच नॅशनल गॅलरी आणि नॅशनल पोर्ट्रेट गॅलरी अशीं दोन चित्रालयें आहेत. तीं दोनही पाहिलीं. त्यांतील चित्रास्वादामुळें मला कलात्मक आनंद किती झाला हें सागणें कठिण आहे, कारण चित्रकलेंतलें मला फारसें कांहीं कळत नाहीं. पण त्या दोन गॅलऱ्या पाहून माझी जी निराशा झाली तिच्यामुळे ' टेट गॅलरी ' पाहाण्यास मला फुरसत झाली नाहीं ह्याचेंच दुःख विशेष दाटलें आहे. ' टेट गॅलरी 'मध्ये आधुनिक चित्रकलेचे उत्तमोत्तम नमुने आहेत असें मला समजलें. नॅशनल गॅलरींतलीं बरींचशीं चित्रे जुनीं बिब्लिकल विषयांचींच आहेत. माझ्या चित्रकलाविषयक अज्ञानांत ह्या विषयाच्या अज्ञानाची भर पडल्यामुळें मी अगदीं गोंधळूनच गेलो. शिवाय जुन्या चित्रकलेंत स्त्री-पुरुषांचे देह आदर्श सौंदर्याकाराचे रंगविण्याचा आशय मला आकलन झाला नाहीं आणि आवडलाही नाहीं. त्या मानानें रेम्ब्रॉच्या दालनांत आलों तेव्हां आनंदाच्या लहरी उसळल्या ! इतर कशानें नाहीं तरी रेम्ब्रॉंच्या रंगयोजनेनेंच चित्त बांधलें जातें. रेम्ब्रॉचीं आत्मचित्रे ( ऑटो-पोर्ट्रेटस ) म्हणजे चित्रकलेचे अमर नमुने आहेत. टर्नरचीं निसर्गचित्रें अशींच आकर्षक वाटलीं. मला त्याची चित्रपद्धति आवडते म्हणून नव्हे; पण त्याचे विषय, वातावरण आणि रंगकाम, मीं तोंपर्यंत पाहिलेल्या बहुतेक चित्रांच्या पार्श्वभूमीवर वेधक वाटलें !

* * *

नॅशनल पोर्ट्रेट गॅलरी म्हणजे अर्थात् ब्रिटनच्या इतिहासाचें व्यक्तिदर्शनात्मक चित्ररेखाटन. ( अर्थात् असें म्हणतांना इतिहासाकडे पाहाण्याची कार्लाईलची दृष्टि धारण करावी लागते. ) ब्रिटनच्या ऐतिहासिक समृद्धींत ज्यांनीं ज्यांनीं कांहीं अर्थपूर्ण भर टाकली त्यांचीं त्यांचीं चित्रें कालक्रमानें येथें लावलेलीं दिसतील. त्यांत कांहीं शिल्पकृतिही आहेत. माझें लक्ष अर्थात् कवि आणि

लेखक ह्यांच्या 'पोर्ट्रेट्स'कडे अधिक गेलें. हे सारे 'पोर्ट्रेट्स' पाहतांना 'पोर्ट्रेट्स' रंगविण्याच्या निरनिराळ्या तऱ्हांचे संस्कार मनावर होत गेले. पण त्याचबरोबर, ह्या शाखेंत ब्रिटिश चित्रकारांनीं नवनवोन्मेषशालिनी प्रतिभेचा स्वैरविलास फारसा दाखविलेला नाहीं हेंही ध्यानांत आलें; आणि म्हणूनच रेनॉल्डसचीं चित्रें पाहतांना हॅझलिट, रेनॉल्ड्स प्रभृतींच्या वाङ्मयीन आठवणींनींच मन अधिक भरून गेलें. एप्स्टाईनच्या रॅम्से मॅक्डोनल्डच्या शिल्पकृतींत व्यक्त झालेल्या शैलीसारखी विमुक्त शैली येथील शिल्पकारांत अगर चित्रकारांत फारच क्वचित् आढळली. अर्थात् फारशा चित्रांनीं माझें लक्ष बांधून ठेवलें नाहीं हा माझ्या अनभिज्ञतेप्रमाणेंच माझ्या घाईचाही परिणाम असेल. हीं कलागृहें पाहतांना स्वतःला विसरण्याइतकी फुरसत असावी लागते, आणि ती मजपाशीं नव्हती. नॅशनल गॅलरींत एक कलावंत रेम्ब्रॉच्या कलेवर व्याख्यान देत होता आणि अनेक रसिक तें तन्मयतेने ऐकत होते. मजपाशीं हें करायला फुरसत नव्हती – मला त्यांचा हेवा वाटला.

* * *

लॅंबेथ ब्रिजचे आकर्षण मला वाटले ह्याचें कारण पार्लमेंटगृहाचें तेथून होणारें दर्शन. पण वॉटर्लू ब्रिजचे आकर्षण मला कां वाटावे? श्री. ज्ञानेश्वर नाडकर्णी ह्यांनीं मला त्याच्यावर नेलें तेव्हां पाऊस भरपूर पडत होता. पुलावरच्या वाऱ्यानें त्या पावसांत आमची त्रेधातिरपिट उडविली – पण हें आकर्षण कमी झालें नाहीं. लंडनच्या साऱ्या पुलांत हा उत्कृष्ट आहे असें श्री. नाडकर्णी म्हणाले. पण 'वॉटर्लू ब्रिज' हा बोलपट पाहिल्यापासून त्या पुलाबद्दल जी मुग्ध उत्सुकता माझ्या मनांत दाटली होती तीच मला त्याच्याकडे ओढीत होती.

श्री. नाडकर्णींनीं वॉटर्लू ब्रिजवरून मला रॉयल फेस्टिवल हॉल दाखविला. टेम्स नदीच्या दक्षिण तीरावर फेस्टिवलसाठीं उभारलेल्या अनेक इमारतींपैकीं ही इमारत शाबूत ठेवण्यांत आली आहे. मुख्यतः ती संगीतसभेसाठीं बांधण्यांत आली. ह्या गृहांतली ध्वनिव्यवस्था इतकी शुद्ध आहे, कीं बाहेर कोलाहल माजला तरी त्याचा अंशमात्रही उपसर्ग आंत पोचत नाहीं. ह्या इमारतीच्या रचनेवर सर टॉमस बिचॅमसारख्या वयोवृद्ध संगीतज्ञानें सडकून टीका केली, पण स्थापत्यशास्त्रज्ञांनीं त्याचीच टर उडविली, वगैरे माहिती श्री. नाडकर्णी ह्यांनीं सांगितली. श्री. नाडकर्णी ह्यांच्याबरोबर चित्रालयें, नाटकें वगैरे पाहण्यांत माझा फार

फायदा झाला. विविध प्रकारची माहिती देऊन माझी ग्रहणशक्ति ते तयार करीत !

प्रेस ट्रस्टचे पेंडसे ह्यांनीं मला फ्लीट स्ट्रीटमध्यें नेलें आणि रॉयटरचें ऑफिस दाखविलें. फ्लीट स्ट्रीट म्हणजे लंडनच्या वृत्तपत्रव्यवसायाचें केंद्र. येथेंच ब्रिटनच्या मोठमोठ्या पत्रांच्या कचेऱ्या आहेत. ह्या रस्त्याच्या आसपास झालेल्या उलाढालींनीं किती कीर्तिमनोरे उभारले असतील आणि किती जमीनदोस्त केले असतील, जगाच्या इतिहासाला किती वळणें लागलीं असतील अगर लागण्याचें टळलें असेल, किती लेखकांना जन्म दिला असेल अगर त्यांची प्रतिभा गर्भांतच ठार केली असेल, त्या मानानें प्रचंड नसलेल्या ह्या रस्त्या-वरच्या इमारतींत केवढें स्फोटक सामर्थ्य भरलेलें आहे, इत्यादि विचार मनांत येऊन माझें मन गुदमरूनच गेलें ! रॉयटरच्या कचेरींत मात्र टेबलांची जी गर्दी आहे तीच माझ्या मनावर ठसली आहे. रॉयटरच्या कचेरींत मी दुसऱ्या दिवशीं पुनः गेलों. ती माझी भेट एका दुःखद स्मृतीनें काळवंडलेली आहे. प्रेस ट्रस्टच्या टेबलावर एक तार पडलेली होती आणि त्यांत आमच्या फ्री प्रेस कचेरींतले एक अधिकारी मि० सॅम्युएल ठार झाल्याची बातमी होती. हिंदुस्थान सोडल्यापासून भारतांतले वृत्त मला फारच थोडें आणि तें सुद्धा दीर्घ कालावधीनंतर कळत असे. पण ही बातमी मात्र लगेच कळली. पेंडसे मला म्हणाले कीं त्यांच्या बातम्या इतक्या त्वरित येतात कीं बहुधा फ्री प्रेस ऑफिसमधील लोकांना समजण्यापूर्वीच ही बातमी मला समजली असावी !

## : २५ :

चौदा दिवसांच्या मुक्कामांत सारें लंडन पाहण्याचा प्रयत्न करणें म्हणजे एका रात्रींत आकाशांतल्या साऱ्या चांदण्या मोजण्याची ईर्ष्या धरण्यासारखेंच होतें.

म्हणून मीं ती हांव धरलीच नाहीं. मिळतील तितकीं नाटकें पाहायचीं, लंडन शहराबाहेर जाऊन एखादें स्मृतिस्थळ पाहायचें आणि कांहीं विशिष्ट व्यक्तींना भेटायचें—आणि मग उरलेल्या वेळांत लंडन शहर पाहायचें, असा कार्यक्रम आंखला. शिवाय हा कार्यक्रम पार पाडतां पाडतां लंडन शहराचें काय कमी दर्शन होईल ?

लंडनमधलीं बहुतेक रंगमंदिरें पिकॅडली – वेस्ट एण्ड भागांत आहेत. वेस्ट एण्ड भागांत चाळीस थिएटरें आहेत आणि तीं बहुतेक नेहमींच ‘ हाऊस फुल्ल ’ अवस्थेंत सुखाचा संसार करीत असतात. लंडनमध्यें मनोविनोदनाचीं किती साधनें खरोखर आहेत ! म्युझियम, झू, पार्क्स, गार्डन्स, सिनेमा, आर्ट गॅलरी, प्रासंगिक प्रदर्शनें, एक का नाना प्रकार ! लंडनमध्यें कार्टून आणि वार्तापट दाखविण्यासाठीं स्वतंत्र सिनेमामंदिरें आहेत. ह्या सर्वांचा संसार अगदीं समृद्धीनें चालावा अशी सुदैवानें लोकांची अभिरुचि आहे. तरी लंडनमधील रंगभूमि विशेष तळपत असते. दर हंगामाला नवनवीन नाटकें रंगभूमीवर येत असतात – आणि एकेका नाटकाचा ( अर्थात् यशस्वी नाटकाचा ) मुक्काम सहासहा महिन्यांचा ( कधीं अधिकही ) ठरतो.

लंडनचीं थिएटरें कांहीं विशेष निराळीं अगर आधुनिक वाटलीं नाहींत. बहुतेक आपल्या ऑपेरा हाऊससारखींच ! थोडींशीं वैभवशालीं, एवढें मात्र खरें ! लाल लाल मखमलीच्या खुर्चीवर रेलून नाटक बघणें सुखाचें कां नाहीं वाटणार ? काणेकरांनीं स्त्रियांचे उघड्या पाठीचे झगे आणि पुरुषांचे काळे सूट्स ह्यांच्या ज्या जुलमांचें वर्णन केलें त्या जुलमाचें युग मात्र आतां मागें पडलें आहे. प्रेक्षकांच्या पोषाखांत आतां बराच मोकळेपणा दिसला !

लंडनच्या रंगभूमीवरचे देखावे सुद्धां विशेष आश्चर्यकारक वाटले नाहींत ! अर्थात् मी विटक्या पडद्यावर संसार उभारणाऱ्या आपल्या रंगभूमीशीं तुलना करीत नाहीं. पण कांहीं दिवसांपूर्वी मीं मॉरल-रिआर्मामेंटचीं नाटकें पाहिलीं, आणि त्यांच्या रंगभूमीवरील सीनसीनरीनें मी थक्क झालों. जोथॅम व्हॅली नाटकांत दिवस मावळल्यापासून दुसऱ्या दिवशींच्या दुपारपर्यंतचा दिवस-रात्रीचा बदल, केवळ प्रकाशाच्या साहाय्यानें, कसा हुबेहूब ( अभ्रें येऊन जात असतांनाच्या आकाशांतील चंद्राच्या चांदण्यासकट ) वठवितां येतो हें मीं प्रत्यक्ष पाहिलें. स्टेजवरील लाकडी कुंपण आणि मागच्या पडद्यांवरील रंगविलेलें कुंपण ह्यांचा बेमालून सांधा पाहिला आणि ‘ लिटल् हट् ’ कीं ‘ विंटर्स टेल् ’ नाटकांत समुद्राचा भास निर्माण करण्यासाठीं टाकलेल्या आडव्या पडद्याची निर्जीव कृत्रिमता डोळ्यांना कशी खटकत होती ह्याची आठवण झाली. ‘ लिटल् हट् ’ मध्यें झोपड्या आणि नारळाचीं झाडें, त्याचप्रमाणें निवडुंगें वगैरे झुडपें हुबेहूब दाखविण्याचा प्रयत्न आहे, पण हें उसनें अवसान आहे असें सारखें

वाटत होतें. किंवा दिग्दर्शकाला ह्यांतूनही हास्य निर्माण करायचें असल्यानें त्यानें व्यंगचित्रात्मक देखावे प्रदर्शिले असें फार तर म्हणावें !

*     *     *

लंडनच्या प्रेक्षकांबद्दल कांहींतरी लिहिणें भागच आहे ! नाटकाची इतकी आवड आणि अभिरुचि असल्यावर नाट्यकला मरणें शक्यच नाहीं. प्रत्येक नाटकाला, त्याला त्याला अनुरूप असे श्रोते मिळतात आणि त्यांचा उत्साह नुसता उतूं जात असतो.

लंडनच्या श्रोत्यांना एकंदरींत पाचकळ विनोद फार आवडतो असें माझें मत झालें. पुष्कळदां, हे लोक एखादी 'हास्यगुटिका' (लॉफिंग गॅसचा प्रकार!) घेऊन येतात कीं काय असे वाटलें. अनेक ठिकाणीं हे हसतात कां हेंच कळत नसे. मला सगळे संवाद बिनचूक कळत होते असे मी अर्थातच म्हणूं शकत नाहीं. पण ज्यांच्याबद्दल मला शंका नव्हती, तेथेही ही शंका आली !

आणि नाटक संपल्यानंतरचे ते नटनटींचें समूहदर्शन आणि प्रेक्षकांनीं टाळ्यांच्या कडकडाटानें केलेलें त्यांचें अपरिहार्य स्वागत ! त्याला आतां एखाद्या औपचारिक विधीचे स्वरूप प्राप्त झाले आहे. काणेकरांना दर अंकाच्या शेवटीं ह्या विधीचें दर्शन घडले तसें मला घडलें नाहीं हे माझे नशिब !

*     *     *

लंडनला जाऊन एखादें वाङ्मयीन स्मृतिस्थळ पाहिलें नाहीं तर न गेलेलेंच काय वाईट !

एक बहुमोल स्मृतिस्थळ मी ज्या भागांत राहत होतों त्याच भागांत होतें ते म्हणजे 'कीट्स हाउस ॲंड म्युझियम.'

आजसुद्धां हॅम्स्टेड हा भाग म्हणजे एक सुंदर उपनगर आहे आणि जवळच एक मुद्दाम राखलेलें असें 'जंगल' आहे. कीट्सच्या वेळीं हॅम्स्टेड हें एक साधें खेडें होते आणि नागरी जीवनास विटलेल्या त्या सौंदर्यशोधक कवीला त्याचे कोमल आकर्षण वाटलें.

कीट्स ज्या घरांत राहत होता त्याच घरांत ब्रॉन कुटुंब राहत होतें. त्या कुटुंबांत फॅनी नांवाची एक मुलगी होती. तिच्या प्रेमांत कीट्स पडला – आणि म्हणूनच ह्या घराशीं कीट्सप्रमाणेंच फॅनी ब्रॉन हिचीही मधुर स्मृति निगडित झाली आहे. कीट्सचें जीवन ह्या स्मृतींच्या सुगंधानें तरल बनलें होतें आणि

आज त्या घराचें दर्शन झालें म्हणजे तो सुगंध कोठें तरी मनांत दरवळत आहे असें वाटतें.

*　　*　　*

पण त्या स्मृतिसुगंधाचा पुरा दरवळ उपभोगण्याचें माझें भाग्य नव्हतें. कीट्सचें घर दुरुस्तीसाठीं बंद होतें आणि शेजारचा म्युझियम उघडा होता त्याच्या दर्शनावरच समाधान मानून घ्यावें लागलें.

म्युझियमकडे ह्या घरावरूनच जावें लागतें. घराच्या बंद दरवाजाकडे मीं एक निःश्वासयुक्त नजर टाकली. समोरच्या आवारांत कांहीं वृक्ष दिसले. ज्या वृक्षांच्या तळाशीं बसून कवि कीट्स आपले सॉनेट्स लिहीत असे अगर फॅनीचें चिंतन करीत असे तो ह्यांतलाच एक असणार ह्या विचारानें माझें अंतःकरण थोडेंसें हललें !

कीट्स म्युझियम अगदीं छोटासाच आहे, पण त्यात येणारा अनुभव किती समृद्ध !

ह्या म्युझियममध्यें कीट्सच्या कोमल, काव्यमय भावनांनीं आंदोलित झालेल्या जीवनाशीं निगडित असलेल्या किती तरी वस्तूंचा संग्रह आहे.

त्यांत त्यानें लिहिलेल्या पत्रांच्या मूळ प्रती आहेत, त्याच्या पुस्तकांच्या पहिल्या आवृत्तीच्या प्रती आहेत, त्याच्या आवडीच्या वस्तु आहेत, त्याच्या जीवनस्मृतीनें संस्कारलेले कांहीं पदार्थ आहेत, त्याचीं आणि त्याच्या स्नेह्यांचीं छायाचित्रें आहेत, रंगचित्रें आहेत–अनेक गोष्टी आहेत. ह्या वस्तु म्हणजे कीट्सचीं सदेह संस्मरणेंच होत !

*　　*　　*

कांहींचा नुसता उल्लेख केला तरी त्यांचें वैशिष्ट्य आणि महत्त्व ध्यानांत येईल. उदाहरणार्थ, कीट्सनें फॅनीला दिलेली वाङ्निश्चयाची अंगठी. त्याच-प्रमाणें कीट्सचे केस असलेले एक लॉकेट. कीट्सच्या केसांचा तंतूसारखा उपयोग केलेला आणि ग्रीक वीणेच्या आकाराचा एक ब्रूचही तेथें आहे. ह्या ब्रूचची हकीकत मजेदार आहे. सेव्हर्नपाशीं, कीट्सच्या मृतदेहावरून कापून घेतलेले कांहीं केस होते. त्याबद्दल सेव्हर्न म्हणतो, 'I have some hair of poor Keats, and have thought of a little conceit, as a present to poor Miss Brawne–to make a Brooch in the form of my Greek lyre, and make the strings of poor Keat's hair, but I

cannot find any workman to do it." ( मिस फ्रॉनला देण्यासठीं ग्रीक वीणेच्या आकाराचा ब्रूच, कीट्सच्या केसांचा तंतूसारखा उपयोग करून, बनविण्याची माझी थोडीशी गंमतीदार कल्पना आहे, पण मला कोणी कारागीरच भेटत नाहीं.) अखेरीस एक कारागीर भेटला. ब्रूच तयार झाला. पण तो फॅनी ब्रॅनकडे कधीं गेलाच नाहीं. १८६१ मध्यें सेव्हर्ननें तो आपल्या मुलीच्या लग्नांत तिला भेट म्हणून दिला !

मुंबईच्या वकील नांवाच्या गृहस्थांनीं दिलेल्या दोन वस्तु ह्या संग्रहालयांत आढळल्या : जोसेफ सेव्हर्न ह्यानें केलेल्या कीट्सच्या एका तैल चित्राची प्रतिकृति ; आणि प्रोफेसर एडवर्ड डौडेन ह्यांच्या मूळ मालकीच्या असलेल्या एका कवितासंग्रहाची एक प्रत.

ह्या वस्तु पाहिल्या आणि मुंबईबद्दलच्या खऱ्याखुऱ्या अभिमानाच्या क्षणांत एक अमोल भर पडली !

* * *

कीट्सचे स्मरण झाल्यावर शेली आणि बायरन ह्यांचें स्मरण झाल्याशिवाय कसें राहील ?

ह्या संग्रहालयांत शेलीची एक लिहिण्याची दौत आहे आणि त्याच्या कांहीं कवितासंग्रहाच्या पहिल्या आवृत्त्या आहेत.

त्याचप्रमाणें बायरनचें एक पत्र आणि एक छोटा पुतळा आहे.

* * *

ह्या सर्व वस्तु पाहतांना – कीट्सच्या जिव्हाळ्याच्या वस्तु नजरेखालून घालतांना, त्याच्या पिंगट केसांच्या अवशेषांवरून आतुर नजर फिरवितांना, फॅनी ब्रॉनच्या केसांचे अवशेष पाहतांना, कीट्सनें फॅनीला दिलेल्या अंगठीवरून भावनानिर्भर डोळे फिरवितांना, फॅनी ब्रॉनचा चष्मा, वीणकामाची पेटी, पेन्सिलींची पेटी, चाकू, कात्री, पाकीट, इत्यादि वस्तु डोळे भरून पाहतांना – त्याचप्रमाणें इंग्रजी वाङ्मयाच्या ह्या महान् मानकऱ्यांचे हस्ताक्षर नेत्रांत सांठवितांना, त्यांच्या ग्रंथांवरून, चित्रांवरून, वस्तूंवरून मुग्ध नजर फिरवितांना एक विचार पुनः पुन्हां माझ्या मनांत येत होता.

—नव्या पिढीचे हें केवढे थोर वाङ्मयीन शिक्षण आहे ! अमर स्मृतींनीं उजळलेल्या ह्या वस्तूंच्या दर्शनानें उमलणाऱ्या तरुण लेखकांना केवढी थोर

स्फूर्ति ह्यानें मिळत असेल ! लेखकांच्या-कवींच्या-विद्यार्थ्यांच्या-वाचकांच्या वाङ्मयीन स्वप्नांना येथें कसे पंख फुटत असतील !

असे दिव्य संस्कार घडविणारीं संग्रहालयें भारतांत कां निर्माण होऊं नयेत ? हे स्फूर्तीचे झरे भारतीयांच्या जीवनांत कां उत्पन्न होऊं नयेत ?

★ ★ ★

ब्रिटिश म्युझियम पाहतांना माझ्या मनांत नेमका हाच विचार उसळ्या मारीत होता !

ग्रेट रसेल स्ट्रीटवरचा हा म्युझियम म्हणजे एक अवाढव्य प्रकरण आहे. त्यांतलें ग्रंथालय हें जगांतल्या दोन बड्या ग्रंथालयांपैकीं एक आहे आणि त्याच्या वाचनालयानें ऐतिहासिक कीर्ति संपादन केलेली आहे. मार्क्सनें आपलें त्रिखंड दास कॅपिटल ह्या वाचनालयांत बसूनच लिहिलें. लेनिन, क्रोपोट्किन प्रभृतींनीं ह्याच वाचनालयाचा आश्रय घेतला.

ह्या म्युझियमला एकामागून एक अशीं एवढीं प्रचंड दालनें आहेत कीं आंत पाऊल टाकलें कीं छाती थोडीशी दडपूनच जाते. हा म्युझियम एका खेपेंत समग्र पाहण्याची महत्त्वाकांक्षा जवळजवळ राक्षसी महत्त्वाकांक्षेंतच जमा होणारी ठरेल. हा म्युझियम आपण 'पाहिला' असें मानसिक समाधान मिळण्याची आशा बाळगूच मी एका दालनांतून दुसऱ्या दालनांत प्रवेश करूं लागलों.

★ ★ ★

हस्तलिखितांचा भाग पाहतांना मन अर्थातच वेधून जातें. थॅकरे, डिकन्स-सारख्या आवडत्या आणि परिचित लेखकांचीं हस्ताक्षरें पाहून त्यांच्या सान्निध्यांत आल्यासारखें वाटतें. तें हस्ताक्षर कालमानानें कसें बदलत गेलें हें पाहून निरनिराळे विचार मनांत येतात. जितकें हस्ताक्षर वाईट तितकी प्रतिभा मोठी अशी एक समजूत मनांत घर करून बसलेली असते. पण थॅकरेचें हस्ताक्षर सुधारतच गेलेलें दिसलें. ह्याचा अर्थ त्याची प्रतिभा मंदावत गेली असा करायचा काय ?

शेक्सपिअरनें आपलीं नाटकें स्वतःच लिहिलीं काय, असा जसा वाद आहे त्याचप्रमाणें त्याला लिहितां येत होतें काय असाही एक वाद ( आपल्याकडे शिवाजीच्या तद्विषयक सामर्थ्याविषयीं आहे तसाच ) तिकडे आहे. त्या वादाचा निर्णय लावणारा एक 'कागद' हस्ताक्षरांच्या दालनांत आहे. एका गहाण-खतावर शेक्सपिअरची चक्क सही आहे.

प्रसिद्ध लेखकांचीं हीं हस्ताक्षरें पाहतांना माझ्या मनांत 'तो' विचार सारखा आला : तरुण विद्यार्थीना आणि होतकरू लेखकांना स्फूर्तीचा हा केवढा खजिना वाटत असेल !

* * *

प्राचीन रोमन आणि इजिप्शिअन वस्तु पाहतांना त्यांच्या प्रचंडपणानेंच मन स्तिमित होऊन जातें. पण पौर्वात्य कारागिरीमध्यें जी नाजूक कलामयता आहे ती तेथे अभावानेंच वावरते, असें वाटलें. आसामांतील नाग लोकांनीं विणलेल्या कापडाचे कलासुंदर नमुने पाहून मन आश्चर्यानें थक्क झालें. ब्रह्मदेशामधील कॅरेन आणि कॅचिन ह्यांच्या कारागिरींतली कला ह्याहूनही मनोज्ञ वाटली. झाग्रेब येथें छायाचित्रांचें प्रदर्शन पाहतांना लुक्झेंबर्ग आणि हॅांगकॅांग येथील सुंदर सुंदर चित्रें पाहून जें वाटलें होतें तें ह्या कोपऱ्यांतील जमातींचें कलाकौशल्य पाहून वाटलें !

जावांतलें शिल्प पाहून आणखी एक अनुभव आला. तें थेट दक्षिण भारतीय शिल्पासारखें आहे. हें आश्चर्यकारक साम्य पाहिलें आणि भारत व बृहन्भारत ह्यांतील सांस्कृतिक संबंधांचा सारा ( म्हणजे मला माहीत असलेला ) अगस्त्यप्रणीत इतिहास माझ्या डोळ्यांसमोर उभा राहिला.

* * *

कीट्स म्युझियम अगर ब्रिटिश म्युझियम येथील वाङ्मयधुरंधरांचीं स्मृतिचिन्हें पाहतांना माझ्या मनावर जे संस्कार झाले त्यांच्या अगदीं विरुद्ध स्वरूपाचे वेस्टमिन्स्टर ॲबेमध्यें, निदान माझ्या भारतीय मनावर झाले. त्या प्राचीन प्रसिद्ध ॲबेंत शिरल्याबरोबर माझे पाय अर्थात् 'पोएट्स कॉर्नर'कडे वळले. ह्या कोपऱ्यांत ब्रिटनच्या अनेक थोरथोर लेखकांचे मृतदेह पुरलेले आहेत— आणि कांहींचे तेथें पुतळेही आहेत. पण जेथें ते देह पुरले आहेत तेथेंच भूमीवर उभें राहण्यास मला कसेंसेंच वाटूं लागलें. मानवी देहाची कालांतरानें माती बनते ( Dust thou art, to dust thou returnest ) हें अगदीं खरें, पण आपल्या पायाखालील भूमींत ह्या दिव्य देहांची माती मिसळलेली आहे— थोडक्यांत म्हणजे आपण ह्या देहांवर उभे आहोंत—ही भावना कांहीं फारशी सुखकारक नाहीं !

ह्याच ॲबेमध्यें राज्यारोहणाची खुर्ची ( कोरोनेशन चेअर ) आहे ; ब्रिटिश इतिहासांतील अनेक थोर व्यक्तींचीं थडगीं आहेत-पण माझें सारें चित्त कवींच्या कोपऱ्यांत गुंतलें होतें आणि अगदीं अस्वस्थ होऊन गेलें होते !

★ ★ ★

वेस्ट मिन्स्टर ॲबेप्रमाणें सेंट पॉलमध्यें जाण्यास मला फुरसत झाली नाहीं. पण सेंट पॉलच्या घुमटाचें बाह्य दर्शनच विशेष वेधक आहे. कारण त्याची भव्यता. सेंट पॉलची इमारत साऱ्या लंडनमध्यें विशाल आणि उत्तुंग आहे आणि तिच्यावरचा पंधरा फूट उंचीचा क्रॉस चारशें फुटांवरून साऱ्या लंडनवर आपली उन्नत दृष्टि फिरवीत उभा असतो ! युद्धांत ह्या इमारतीचें गर्वहरण करण्याचा प्रयत्न हिटलरच्या लुफ्तवाफनें फार केला, पण तो बहुतांशीं निष्फळ ठरला. प्रचंडपणा हें ह्या चर्चेचें वैशिष्ट्य रात्रीच्या मंदधूसर वातावरणांत अधिकच जाणवलें.

★ ★ ★

ब्रिटनमध्यें वाङ्मयीन प्रवृत्तीच्या व्यक्तीनें लेक डिस्ट्रिक्टमध्यें गेलें पाहिजे, वेसेक्समध्यें संचार केला पाहिजे, केंब्रिज-ऑक्सफर्डला भेटी दिल्या पाहिजेत-आणि अर्थात् स्ट्रॅटफर्ड-ऑन-एव्हनला गेलेंच पाहिजे. मला हें सारें करायला फुरसत नव्हती. श्री. ज्ञानेश्वर नाडकर्णी ह्यांच्या उत्साहामुळें शेक्सपिअरच्या जन्मग्रामास तेवढी भेट देऊं शकलों.

शेक्सपिअरने दिगंत कीर्ति प्राप्त करून दिलेली असतांना देखील स्ट्रॅटफर्ड अद्याप एक खेडेंच राहिलें आहे. अर्थात् आधुनिक आणि सुसंस्कृत ! इंग्लंडांत स्ट्रॅटफर्ड नांवाचीं दोनचार खेडीं आहेत, पण शेक्सपिअरचें चटकन ध्यानांत यावें म्हणून त्याच्यांतून वाहणाऱ्या एव्हन ह्या नदीचे नांव त्याच्या नांवांत गोवून दिलेलें आहे. पण त्या नदीचा संबंध आज एवढाच उरलेला नाहीं. शेक्सपिअरचें अर्थपूर्ण स्मारक आज ह्याच नदीच्या कांठावर असून शेक्सपिअरचें स्मारक म्हणून उभारलेलें शेक्सपिअर मेमोरिअल थिएटर ह्याच नदीच्या विमल प्रवाहांत आपलें भव्य प्रतिबिंब खेळवीत उभें आहे. हें नाट्यगृह आणि तें शिल्पस्मारक ह्यांच्या दरम्यान एक साधेंच पण प्रसन्न असें उद्यान आहे.

लॉर्ड रोनल्ड गोव्हर ह्या शिल्पकारानें तयार केलेलें हें स्मारक अतिशय दर्शनीय आहे. ह्या स्मारकाची रचनाच विलोभनीय आहे. मधोमध चबुतऱ्यावर खुर्चीवर बसलेल्या शेक्सपिअरचा पुतळा आहे. चबुतऱ्याच्या चार कोपऱ्यांना

फॉलस्टाफ, प्रिन्स हॅाल, हॅम्लेट आणि लेडी मॅक्बेथ् ह्यांचे चार नाट्यमय पुतळे आहेत. त्यांच्या व्यक्तिरेखनाचे भाव त्या पुतळ्यांभोवतीं, ज्योतीभोवतीं वलय असावें त्याप्रमाणें खेळत आहेत असें वाटतें. ढेरपोट्या फॉलस्टाफ हातांत दारूचा पेला धरून गप्पा झोकीत आहे; प्रिन्स हॅाल आपल्या अत्यवस्थ बापाचा मुकुट डोक्यावर घालण्यासाठीं वर उचलून धरीत आहे; विचारग्रस्त हॅम्लेट यॉरिकची कवटी एका हातांत धरून व दुसरा हात कपाळाला लावून बसला आहे आणि निद्रावस्थेंत फिरणारी लेडी मॅक्बेथ् आपले रक्ताळलेले हात धुऊन स्वच्छ करण्याचा प्रयत्न करीत आहे.

ह्या चबुतऱ्याच्या चार कोपऱ्यांवर चार वचनें कोरलेलीं आहेत. समोरचें—

Consideration like an angel came
And whift the offending Adam out of him.

हें चौथ्या हेन्रीच्या मरणासंबंधीचे आहे. मागचें—

Life's but a walking shadow, a poor prayer
That struts and frets his hour upon the stage.
And then is heard no more.

हे मॅक्बेथ्च्या तोंडचें आहे. पुतळ्याच्या डाव्या हातचें—

Good night, sweet Prince,
And flights of angels sing thee to thy rest!

हें हॅम्लेटच्या मरणानंतरचें आहे; आणि उजवीकडचें—

I am not only witty in myself; but the
Cause that wit is in other men.

हें फॉलस्टाफचें एक स्वगत आहे. ह्या वचनांच्या निवडीवर भाष्य करण्याची गरज आहे काय? त्यांचा त्या चार पुतळ्यांशीं जितका संबंध आहे तितकाच शेक्सपिअरच्या जीवनाशीं आहे—आणि तुमच्या आमच्या तरी कां नाहीं! शेक्सपिअरचीं तीं वचनें, म्हणजे तत्त्वज्ञानाच्या कुप्याच! जीवनावरचीं तीं भाष्यें. तीं अमर आहेत, कारण तुमच्या आमच्या जीवनांतलीं सत्यें तीं हळुवार हातानें जागीं करतात!

* * *

इतकें अर्थपूर्ण स्मारक डोळे भरून पाहण्याचा आनंद वर्णिण्याचें कारण आहे काय?

इतर स्मृतिस्थळांना भेट देऊन हें स्मारक पाहायला आलों तेव्हां वातावरणांत अंधेर चांगला दाटला होता—आणि दिवे तो दूर करण्याचा प्रयत्न करीत होते. स्मारकाच्या पलीकडेच एक लहानसा पूल आहे, त्याच्यावर उभा राहून मी पाहत होतों. नदीप्रवाहावर प्रकाशाचीं प्रतिबिंबें लहरत होतीं. उद्यानांतले गवताचे गालिचे त्या प्रकाशांत रेशमी वस्त्रांसारखे दिसत होते आणि म्हणूनच त्या सबंध दृश्याला स्वप्नभूमीचें सौंदर्य प्राप्त झालें होतें. नदीच्या कांठावरचीं छोटींछोटीं झाडें, थंडाव्यामुळें अंग आखडून घेऊन तें स्वप्नदृश्य आणि पाण्यांतलीं त्यांचीं स्वप्नमय प्रतिबिंबें निश्चल नजरेनें पाहत होतीं. पलीकडचे लाल विटांचें नाट्य-गृह अंधारांत निद्रावश झाल्यासारखें दिसत होतें. कांहीं वेळ मी मुग्ध, विस्मृत नजरेनें पाहत राहिलों. नदीच्या पाण्यांत कोणीतरी खळबळ केल्यामुळेंच भानावर आलों.

* * *

येथें येण्यासाठीं मीं दिवस मात्र चांगला शोधला नव्हता. रविवार असल्या-मुळें नाट्यगृह बंद होतें, वस्तुसंग्रहालयही बंद होतें आणि शेक्सपिअरची पत्नी ॲन हॅथावे हिची झोपडीही बंद होती.

पण ही झोपडी बाहेरून पाहणें हा सुद्धां एक असाधारण अनुभव आहे. आधीं सायंकाळच्या संधिप्रकाशांत शेतांतील आडवाटेनें ॲनच्या शॉटरी खेड्यांत जाणें हाच मुळीं एक अविस्मरणीय अनुभव. चहूंकडे सारें कसें शांत, स्तब्ध, हिरवेंगार आणि प्रसन्न ! आणि त्यांतच कसलें तरी अबोध आकर्षण. ॲनच्या झोपडीकडे जाण्याचा रस्ता एके ठिकाणीं वृक्षाच्छादित ओढ्यावरून जातो. त्या ओढ्याच्या पलीकडे गेलों—झोपडी दृष्टिपथांत आली—आणि कालाचा पडदा दूर सरकून आपण भूतकालांत दूर दूर गेलों असें वाटलें.

मोठमोठ्या खिडक्या असलेली ती शाकारलेल्या उतरत्या छपराची झोपडी म्हणजे शेक्सपिअरच्या गूढ रहस्यांचा अमोल ठेवाच वाटला ! भूतकालांत जाऊनही हा रहस्यमय ठेवा रहस्यमयच राहण्यांत कांहीं वेगळाच आनंद असतो नव्हे का ?

शेक्सपिअरचें कौलारू घर गांवांतच आहे. स्मारकाच्या स्वप्नभूमींतून जागें झाल्यावर मीं तें पाहिलें. अभिजात इंग्रजी पद्धतीच्या त्या लाकडी घराकडे पाहून मला फारसें कांहींच वाटलें नाहीं. बहुधा माझा पाहण्याचा क्रम चुकला.

काय असेल तें असो, ॲनच्या झोपडींत जो ‘ रोमान्स ’ आहे तो शेक्सपिअर-च्या ऐहिक यशस्वितेचें द्योतक म्हणून उभ्या असलेल्या घरांत निदान मला तरी वाटला नाहीं !

## : २६ :

लंडनमध्यें मला भेटलेल्या लोकांचा जेव्हां जेव्हां मी विचार करतों तेव्हां तेव्हां मिसेस् इव्हलिन रेनॉल्ड्स ह्यांची ती उंच, सडपातळ, कांहींशी विशविशित मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर प्रथम येते.

लंडन सोडल्यावर मीं त्यांना लिहिलें, “ माझ्या ह्या युरोपच्या प्रवासांत कोणता एक मित्र मीं निश्चितपणें जोडला असे मला वाटत असेल तर तुम्ही ! ”

आणि हा माझा विश्वास फुकट गेला नाहीं.

पण मिसेस् रेनॉल्ड्स ह्या प्रत्येक भारतीय समाजवाद्याच्याच अशा मित्र आहेत. भारतीय समाजवादाबद्दल त्यांना जी आस्था अगर आकर्षण वाटतें त्याचें निर्विकार शब्दांनीं वर्णन करणें शक्य नाहीं. त्यांचें आकर्षणच भावनात्मक आहे आणि तें वर्णिण्यासाठीं भावनांचाच आधार घेतला पाहिजे.

स्वातंत्र्यापूर्वी महात्मा गांधी आणि भारतीय स्वातंत्र्य ह्यांना आपली समग्र जीवननिष्ठा अर्पण केलेल्या कांहीं व्यक्ति ब्रिटनमध्यें नव्हत्या का ? त्यांचा विचार मनांत आणा, म्हणजे मिसेस् रेनॉल्ड्स ह्यांच्या निष्ठेची कल्पना तुम्हांला येईल.

त्यांची निष्ठा जयप्रकाश आणि भारतीय समाजवाद ह्यांना अर्पण केलेली आहे एवढाच फरक !

आणि ही निष्ठा अशी जडण्याचें कारण ?—केवळ योगायोग.

* * *

मिसेस् रेनॉल्ड्स मूळच्या ऑस्ट्रियन. युद्धोत्तर काळांत एका दोस्तराष्ट्रीय कमिशनबरोबर गेलेल्या एका ब्रिटिश इन्जिनिअरबरोबर त्यांचा विवाह झाला आणि त्या ब्रिटिश नागरिक बनून नॉटिंगहॅम येथे राहावयास आल्या.

त्यांना भारताबद्दल लहानपणापासून एक प्रकारचें सुप्त आकर्षण होतें. कारण त्यांचे आईवडील थिओसॉफिस्ट आहेत. त्यांना थिओसॉफीचें आकर्षण

कधीं वाटलें नाहीं. त्यांच्या बाबतींत आकर्षणाचें संक्रमण झालें — थिओसॉफी-कडून भारताकडे !

भारतांत येण्यासाठीं त्यांनीं नोकरी करून अडीचशें पौंड शिल्लक टाकले. त्या हिंदुस्थानांत एकंदर पांच महिने राहिल्या. अगदीं साध्या हॉटेलांत राहून आणि तिसऱ्या वर्गाने प्रवास करून त्यांनीं आपले पैसे कसेबसे पुरविले. मी गेलों तेव्हां हिंदुस्थानला पुन्हा येण्यासाठीं त्या पुनः नोकरी करून पैसे शिल्लक टाकीत होत्या.

त्या मुंबईत येऊन दाखल झाल्या तेव्हां — केवळ योगायोग ! — जयप्रकाश नारायण ह्यांचा मुक्काम मुंबईत होता. त्यांनीं जयप्रकाशजींची भेट घेतली आणि त्या पहिल्या भेटींतच जयप्रकाशांवर त्यांची निष्ठा जडली.

( त्या निष्ठेचें सुवर्ण कसें अस्सल नंबरी आहे ह्याचा प्रत्यय आम्हा मित्र-मंडळीला, जयप्रकाशजींच्या उपोषणांत त्यांच्या ज्या तांतडीच्या तारा-टेलिफोन आले त्यांवरून आला आणि आतां तर त्या भारतांत जयप्रकाशांच्या विधायक कार्यात सामीलच झाल्या आहेत. )

★ ★ ★

मला त्या ब्रेल्स्फर्डकडे भेटल्या. ब्रेल्स्फर्डनीं आपल्या अधिकारी लेखणीनें, 'न्यू स्टेट्समन-नेशन'मध्यें भारतीय समाजवाद्यांबद्दल एखादा लेख लिहावा — निवडणुकींत त्याची त्यांना मदत होईल — म्हणून त्यांना विनंती करण्यासाठीं त्या नॉटिंगहॅमहून मुद्दाम आल्या होत्या.

आम्ही ब्रेल्स्फर्डकडे तासभर गप्पा मारल्या. त्या गप्पांत त्यांना भारतीय समाजवादाची बरीच सूक्ष्म माहिती आहे हें माझ्या ध्यानांत आलें. त्यांनीं नुकताच प्रसिद्ध झालेला समाजवाद्यांचा जाहीरनामा सुद्धां काळजीपूर्वक अभ्यास-लेला होता.

पण एवढ्या वेळांत आमचा औपचारिक परिचय मात्र करून द्यायचा राहिला होता. म्हणून मी ब्रेल्स्फर्डच्या घरांतून बाहेर पडतां पडतां मिसेस् ब्रेल्स्फर्डना म्हटलें,

" अहो, ह्यांची मला ओळख करून द्या ना — ह्यांचं मला नांवही माहीत नाहीं. "

लगेच रेनॉल्ड्स म्हणाल्या, " चला — त्याची कांहीं गरज नाहीं. मीही तुमच्या-बरोबरच बाहेर पडत आहें. मीच तुम्हांला माझी सारी माहिती सांगतें. "

आणि मग आम्ही आमच्या बिऱ्हाडीं आलों आणि आम्ही दोन तास आणखी गप्पा मारीत बसलों. दुसऱ्या दिवशीं साडेअकरा वाजतां पुन्हा भेटलों आणि साडेतीन वाजेपर्यंत गप्पा मारल्या. मला फेनर ब्रॉकवेना भेटायला जायचें नसतें तर आणखी गप्पा मारल्या असत्या आणि मला दुसऱ्याच दिवशीं लंडन सोडायचे नसतें तर आणखी भेटलों असतों.

पण त्यानंतर पत्रानें नेहमीं भेटतों आणि गप्पा मारतों !

—साऱ्या गप्पा समाजवादाबद्दल !

* * *

रेनॉल्ड्सची भारतीय समाजवादाबद्दल जी निष्ठा आहे ती पूर्वी फेनर ब्रॉकवे ह्यांची भारतीय स्वातंत्र्याबद्दल होती.

आज मात्र त्यांची ती निष्ठा कांहींशी लुप्त झालेली मला आढळली.

ब्रॉकवेंनीं मला अतिशय आस्थेनें आणि अगत्यानें वागविलें.

मला भेटल्याबरोबर त्यांचा सत्प्रवृत्त चेहेरा स्नेहानें उजळला. ते प्रेमळपणानें हसले. भावनिर्भरतेने त्यांनीं हस्तांदोलन केलें—आणि चहा पिण्यासाठीं मला पार्लमेंटगृहाच्या रेस्टोरॉमध्यें घेऊन गेले. मला त्यांनीं आपल्या हातांनीं चहा करून दिला.

खरें म्हणजे ब्रॉकवे ह्यांचे दर्शनच आकर्षक आणि आश्वासक आहे. त्यांचा चेहेरा देखणा, मार्दवयुक्त आणि स्नेहशीलतेनें स्निग्ध वाटणारा आहे. एखाद्या नाजुक स्प्रिंगला स्पर्श केल्याबरोबर ती कंप पावेल असें वाटतें, तसें त्यांच्या संवेदनाशील अवयवांकडे पाहिल्याबरोबर वाटते.

पण त्यांचें भारताकडे पूर्वीसारखें लक्ष नाहीं हेंच खरे.

* * *

आपलें सारे लक्ष आतां आफ्रिकन वसाहतींच्या विमोचनाकडे लागलेलें आहे, असें त्यांनीं मला स्पष्टच सांगितलें. ते म्हणाले, “ तुमचं स्वातंत्र्य आतां सिद्ध झालेलं आहे. तुमचे प्रश्न आतां तुम्ही सोडविले पाहिजेत.”

ही त्यांची मला प्रधान वृत्ति दिसली. आपल्याकडे, स्वातंत्र्यासाठीं देह आणि आत्मा झिजविणाऱ्या पुष्कळ लोकांनीं स्वातंत्र्यप्राप्तीनंतर सुटकेचा निःश्वास टाकला आणि कृतकृत्य होत्साते ते स्वातंत्र्योत्तर प्रश्नांबद्दल उदासीन बनले, तशीच त्यांची वृत्ति मला दिसली.

पण एक फरक आहे—महत्त्वाचा फरक आहे. स्वतंत्र भारताकडून त्यांनीं आपलें लक्ष आतां स्वातंत्र्योत्सुक आफ्रिकेकडे वळविलें आहे. 'दि कॉंग्रेस ऑफ पीपल्स अगेन्स्ट इन्पीरिॲलिझम्'चे ते सध्यां अध्यक्ष आहेत.

ह्यांत जी स्वातंत्र्याची निर्भेळ, निरपेक्ष उपासना दिसते ती केवळ अनमोल नव्हे काय?

* * *

फेनर ब्रॉकवेंनीं मला सोरेन्सेनच्या स्वाधीन केलें आणि ते कोणत्या तरी सभेसाठीं निघून गेले. सोरेन्सेन मला अतिशय वेधक गृहस्थ वाटले. ब्रॉकवेंच्या मानानें त्यांचा चेहेरा कमी संवेदनाशील आहे, पण त्याची मुद्रा अतिशय प्रेमळ वाटली.

त्यांचें भारताकडे अधिक लक्ष दिसलें. ते मला कॉमन्सच्या युद्धोत्तर काळांत बांधलेल्या नव्या तळघरांत घेऊन गेले. येथें कांहीं अभ्यासू सभासद वाचीत बसलेले दिसले. ही निवांत जागा मुख्यतः ह्यासाठींच दिसली.

आम्ही भारतीय आणि ब्रिटिश समाजवाद्यांच्या सहकार्याबद्दल बोलत असतांना इंडिया लीगचे चिटणीस मि. ज्यूलियस सिल्वरमन तेथें आले. (सॉरेन्सेन अध्यक्ष आहेत.) मग आमचें संभाषण भारताच्या राजकारणाकडे वळलें. ते दोघेही नेहरूंचे कट्टर पक्षपाती दिसले.

पण कश्मीरचा प्रश्न उद्भवल्याबरोबर दोघांनींही नेहरूंच्या धोरणावर शरसंधान सुरू केलें!

तेव्हां मीं त्यांना सर ओवेन डिक्सन ह्यांनीं मांडलेल्या योजनेबाबत काय झालें ह्याची आठवण दिली आणि म्हटलें, "हें पाहा, तुम्ही आम्हांला नुसता असा दोष देत बसूं नका. त्यापेक्षां असं करा. तुम्ही येथल्या मित्रांनीं कश्मीर-बाबत एखादी न्याय्य योजना तयार करा, तिला पाकिस्तानची संमति मिळवा, आणि मग आम्हीं तिचा विचार करण्याचं नाकारलं तर आम्हांला बोल लावा."

माझ्या ह्या 'आव्हाना'चा दोघांवरही चांगला परिणाम झालेला दिसला. दोघेही मनापासून हसले—आणि मला त्यांत सद्भावनेचें दर्शन झालें!

* * *

ब्रेल्स्फर्डची भेट घेतल्याशिवाय मी गेलों तर माझें लंडनला येणें विफल असें मला सारखें वाटत होतें.

सुदैवानें ज्यूलियस ब्रॉथॉल ह्यांचे आणि ब्रेल्स्फर्डचे संबंध अतिशय जिव्हाळ्याचे. त्यांनीं माझी मुलाखत लगेच फोनवर ठरवून टाकली !

माझी मुलाखत त्यांनीं साडेचार वाजतां ठरविली होती, पण माझा काय घोटाळा झाला नकळे, मी सहा वाजतां ह्या समजुतींत राहिलों.

मी सहा वाजतां बेल्साईझ पार्कमधील त्यांच्या घराची घंटी दाबली, तेव्हां जरा वेळानें दार उघडणारी एक मध्यमवयस्क स्त्री, आपल्या हालचालीइतक्याच तरल भासणाऱ्या चकित वृत्तीनें म्हणाली,

"अहो, हें हो काय ? आम्ही तर साडेचार वाजल्यापासून तुमची वाट पाहून राहिलों आहोंत."

काय घोटाळा झाला हें माझ्या तत्काळ ध्यानांत आलें. मी अगदीं शरमिंधा झालों. क्षमायाचनेच्या आर्जवी स्वरांत म्हणालों,

"मग मी जातों."

"छे छे !" मला हातांनीं नाहीं पण हावभावांनीं आंत ओढीतच ती म्हणाली, "तुम्ही केव्हांही येऊं शकतां. आम्हांला सात वाजतां दुसरं काम आहे, म्हणून पुरेशा गप्पा मारतां येणार नाहींत ह्याचं वाईट वाटतं."

असें म्हणून त्या इतक्या मनमोकळ्या हसल्या आणि त्या हास्यांत इतका अगत्यपणा होता कीं लगेच मी स्वस्थचित्त झालो आणि त्यांच्या मागून ब्रेल्स्फर्ड बसले होते त्या दिवाणखान्यांत गेलों. तेथेंच रेनॉल्ड्सही होत्या.

* * *

अठ्याहत्तर वर्षांचे वृद्ध ब्रेल्स्फर्ड एका कलत्या सोफ्यावर आरामशीर पडले होते. त्यांनीं एक शाल पांघरली होती. आंत आल्याबरोबर सौ. ब्रेल्स्फर्डनीं ती शाल विस्कटली होती ती हळूवार हातानें ठाकठीक केली.

ब्रेल्स्फर्डच्या खंगलेल्या चेहेऱ्यावरच्या शुभ्र केसांनीं माझें लक्ष वेधून घेतलें. त्या केसांत एक विशिष्ट तेज होतें. त्यांचे डोळे तसेच तेजस्वी वाटले. त्यांच्या खंगलेल्या चेहेऱ्यावरही एक प्रकारचें पाणी खेळत होतें.

त्यांच्याकडे पाहतांना सौ. ब्रेल्स्फर्ड ह्यांच्या नजरेंत काळजी आणि कौतुक ह्यांचें मजेदार मिश्रण दिसे. त्या एखाद्या खारीसारख्या इकडेतिकडे धावत होत्या. पण त्यांचें मन सारखें आपल्या 'डार्लिंग'ची काळजी करीत असल्याची जाणीव होत होती.

सौ. ब्रेल्स्फर्ड अगदीं लहानसर बांध्याच्या आहेत. पण त्यांचा सुबक देह आणि त्यांचे बॉब केलेले केस ह्यांमुळें त्या बाहुलीसारख्या भासतात. त्यांची तरल वृत्ति ह्याच्याशीं सुसंगतच होती.

मिसेस् ब्रेल्स्फर्ड चित्रकार आहेत. त्यांच्या त्या दिवाणखान्यांत त्यांचीं अनेक चित्रें दिसलीं. वर जाणाऱ्या जिन्याच्या भिंतीवरही चित्रें टांगलेलीं होतीं. सध्यां त्या आपल्या ' डार्लिंग 'चा एक ' पोर्ट्रेट ' तयार करीत होत्या. अर्धवट तयार झालेला तो पोर्ट्रेट पलीकडेच फळ्यावर दिसत होता.

* * *

मी युगोस्लाव्हिआला जाऊन आलों आहे हे कळल्यावर ब्रेल्स्फर्डनीं माझ्यावर युगोस्लाव्हिआसंबंधींच्या प्रश्नांचा नुसता भडिमार केला. ते नुकतेच युगोस्लाव्हिआला जाऊन आलेले होते. मी मॅसेडोनिआला जाऊन न आल्याबद्दल त्यांनीं माझी थोडीशी कींव केली. " भारत आणि मॅसेडोनिआ ह्यांच्यांत फार साम्य आहे, " ते म्हणाले.

त्यांनीं मला कश्मीरबद्दल विचारलें. नेहरूंबद्दल त्यांना फार प्रेम वाटतें पण नेहरूंचें कश्मीरविषयक धोरण त्यांना मान्य दिसलें नाहीं. ( रेनॉल्ड्स मला मागाहून म्हणाल्या, ब्रेल्स्फर्डना नेहरूंचे धोरण कायदेबाज वाटते. )

आमच्या गप्पा सुरू असतांनाच सौ. ब्रेल्स्फर्डनीं माझ्यासमोर चहाचा कप आणि निरनिराळ्या प्रकारच्या केक्स असलेली बशी ठेवली. एखाद्या आईनें मुलाला आग्रह करावा तसा त्या मीं केक्स खाव्या म्हणून आग्रह करीत होत्या. जवळ येऊन प्रत्येक केककडे बोट दाखवून तिचें गुणवैशिष्ट्य मनावर बिंबवीत होत्या.

बाहुलीसारख्या दिसणाऱ्या सौ. ब्रेल्स्फर्डमध्ये मातृवात्सल्य उड्या मारीत होतें. केकबद्दलसुद्धा तशीच आपुलकी !

आमच्या गप्पा ७। पर्यंत चालल्या—आणि मग मात्र त्यांनीं आपल्या ' डार्लिंग 'ला सात वाजतांच्या कामाची आठवण दिली.

गप्पा बंद व्हाव्या हें कोणालाच रुचत नव्हतें—पण आतां मला उठणेंच भाग होतें.

* * *

बंडखोर मजूरपुढारी अर्नेस्ट बेव्हन यांना भेटण्याची मला फार इच्छा होती. मी ब्रॅंथॉलपाशीं ती बोलून दाखविली. त्याबरोबर थोडेसे झटक्यानें ते

म्हणाले, "I can introduce you only to my friends." (मी तुमची फक्त माझ्या मित्रांशीं ओळख करून देऊं शकेन.) आणि मीं तो विचार तेथेंच सोडून दिला.

## : २७ :

प्रवासांत अविस्मरणीय व्यक्ति भेटतातच! प्रवास म्हणजे अपरिचिताचा शोध! ह्या जगांत अनेक अजब चिजा भरलेल्या असतात. त्यांचें ज्ञान नसतें, कल्पनाही नसते. अशीच एखादी अपरिचित चीज भेटली म्हणजे ती अविस्मरणीय ठरते!

स्ट्रॅटफर्ड-ऑन-एव्हनहून परत येत असतांना मला अशी एक व्यक्ति भेटली कीं जिचें वर्णन मी 'अविस्मरणीय' ह्याच एका विशेषणानें करूं शकेन.

* * *

आमची गाडी प्रमाणाबाहेर 'लेट' झाली होती. आम्ही लंडनला वेळेवर पोंचणार नाहीं, ट्यूब, टॅक्सी कांहीं मिळणार नाहीं, सारा घोंटाळा होईल म्हणून आम्ही थोडेबहुत चरफडतच होतों—

पण आमच्या डब्यांत एक गृहस्थ होता, त्याचे मुळीं ह्या उशिरामुळें विमान चुकणार होते आणि त्यामुळे त्याचें चारशें पौंडांचें नुकसान होणार होतें—

आणि तरी तो स्वस्थ होता, हसत खेळत होता, थट्टामस्करी करीत होता, आणि आपल्या गप्पांनीं आम्हांला आमच्या विवंचनेचा विसर पाडीत होता.

पण त्याचें विमान चुकलें ही त्याच्यावरची खरी आपत्ति नव्हतीच. जें कांहीं आपल्यापुढें वाढून ठेवलें आहे तें भयंकर आहे अशी त्याची खात्री होऊन चुकली होती.

काय वाढून ठेवलें होतें?

मरण!

आपण मृत्यूच्या गुहेंत प्रवेश करण्यासाठीं निघालों आहोंत ह्याबद्दल त्याची मनोमन खात्री झालेली होती. 'I am going to a certain death,' तो सारखा सांगत होता. पुनः पुन्हा सांगत होता.

तो मलायाकडे निघाला होता. दोन महिन्यांपूर्वी सहा महिन्यांच्या रजेवर तो मायदेशीं आला होता, पण त्याच्या सहकाऱ्याचा खून झाल्याची तार आली आणि त्या सहकाऱ्याची जागा घेण्यासाठीं तो निघाला होता –

मृत्यूच्या शिळेवरही आपण आपल्या सहकाऱ्याची जागा घेणार अशी ठाम समजूत त्याची झाली होती. तो म्हणाला, "आम्ही चौघे सहकारी. चौघेही जण मळेवाले. कौला लम्पूर येथें एकाच बंगल्यांत राहात होतों. गेल्या दोन वर्षांत माझ्या तीन सहकाऱ्यांचा एकामागून एक असा खून झाला. आतां चौथी पाळी माझी!"

मीं त्याला सांगितलें कीं आम्हा भारतीयांत इजा-बिजा-तिजा अशी समजूत आहे. तिघांचें भाग्य सारखें असतें – चौथ्याचें निराळेंच असण्याचा संभव.

पण आपला खून होणार ह्या विषयींची त्याची खात्री मी ढळवूं शकलों नाहीं.

खरें म्हणजे, मी त्याला आश्वासन देण्याच्या बुद्धीनें बोलत होतों, पण त्याला त्याची काडीमात्र गरज नव्हती. स्वतःच्या खुनाचें भेसूर चित्र तो नजरेसमोर नाचवीत होता, पण त्याची वृत्ति जरा देखील चळलेली दिसत नव्हती.

दुसऱ्या दिवशीं मि. जेम्स जॉहन्स्टन ह्यांच्यापाशीं बोलतांना ह्या गृहस्थाच्या ह्या स्थितप्रज्ञतेचा मीं उल्लेख केला. त्यांनीं त्याची कारणमीमांसा ब्रिटिशांच्या कर्तव्यविषयक जाणिवेंत शोधली.

* * *

तें खरें असेलच. पण आयुष्यांत तो अनेकदां धोक्याच्या धारेवर चाललेला होता. त्याच्या अंतःकरणांतले भीतीचे कांटे पूर्वीच झिजून गेलेले असावेत.

युद्धकालांत त्यानें अनेक ठिकाणीं संचार केलेला होता. तो रशियांत होता. भारतांत होता. भारतांत असतांना मुंबई, बंगलोर, हैदराबाद, दिल्ली येथें होता. मराठा लाइट इन्फन्ट्रींत असल्यानें आम्ही मराठे त्याला जवळचे वाटत होतों.

नुकताच तो चीन-तिबेटमधून प्रवास करून आलेला होता.

चीनबद्दल त्याचीं मोठीं आगळीं भाकितें होतीं. दोन वर्षांत रशिया आणि चीन ह्यांची जुंपणार आणि ह्या संग्रामांत अमेरिका चीनच्या बाजूनें लढणार ह्याबद्दल त्याला शंका नव्हती!

चीनचें भवितव्य उज्ज्वल आहे. चीन हें जगांतलें एक श्रेष्ठतम राष्ट्र होणार आहे. भारतही थोर राष्ट्र बनणार आहे. ब्रिटनचे दिवस गेले. ब्रिटन आतां दुय्यम दर्जाचें राष्ट्र होणार. ब्रिटननें ह्यांतच समाधान मानून आपलें कर्तव्य

करीत राहिलें पाहिजे–अशीं मतें तो, चारपांच चेंडू हातांत एकदम खेळवावे तशीं खेळवीत होता.

"Britain has had her days, you know." समोरच्या ब्रिटिश बाईकडे पाहून तो ठांशीव स्वरांत बोलला !

आणि हें सारे खेळकर बेफिकिरीनें. "ह्या रेल्वेनें माझे चारशें पौंड बुडविले, आतां तिच्यावर एक चांगला जबरदस्त दावाच लावतों," पॅडिंग्टन स्टेशनवर उतरतांना तो म्हणाला––

पण 'थांब, तुझं घर आतां उन्हांतच बांधतों' ह्या थाटांत !

★ ★ ★

जिनीव्हा येथें भेटलेल्या मदाम मॉरीन ह्या माझ्या अशाच पक्कया लक्षांत राहिल्या आहेत.

एक दिवस दुपारीं मला हॉटेलमध्यें त्यांचा फोन आला. "मला हॅमोरींनीं आपल्याला भेटायला सांगितलं आहे, मी अर्ध्या तासांत आलेंच."

अर्ध्या तासानें हॉटेलच्या लाउंजमध्यें एक भारतीय साडी परिधान केलेली गौरवर्णीय स्त्री आढळली. मी आल्याबरोबर तिनें माझें हास्यानें भरलेल्या चेहेऱ्यानें स्वागत केलें आणि आपल्या बिऱ्हाडीं घेऊन गेली.

हें बिऱ्हाड म्हणजे अस्ताव्यस्त सामानाचें मुक्त प्रदर्शन.

"अहो, मी पुढल्या महिन्यांत हिंदुस्थानला जाणार आहें. म्हणून ही जागा दिली आहे भाड्यानें. तेव्हां थोडी साफसफाई चालू आहे.

"हिंदुस्थानला जायचं आहे, पण अद्याप तिकिटाची व्यवस्था नाहीं, काय विचित्र लोक आहेत पाहा. थॉमस कुक, अमेरिकन एक्स्प्रेस, सर्वांना रोज दोन तीनदां भेटतें, पण मला तिकिट मिळालं आहे कीं नाहीं हेंच कोणी सांगू शकत नाहीं. ही पाहा, इंडिया ऑफिसच्या लालकडून जलजवाहरचें तिकिट मिळाल्याची तार आहे, पण ह्या मेल्या थॉमस कुक, अमेरिकन एक्स्प्रेसना मात्र शिंद्या कंपनीकडून खात्री करून घेण्याचं जमत नाहीं. काय छळवाद तरी हा !"

त्याची भानगड अशी होती, कीं ह्या बाईचे पॅरिसच्या बॅंकेंत पैसे होते आणि फ्रेंच फ्रॅंकमध्यें भाडें भरण्याची तिची कोशीस चालू होती–पण जिनीवांतल्या कंपन्या तें कांहीं करूं शकत नव्हत्या. मात्र लालवर तिचा विश्वास दांडगा !

पांच तारखेच्या बोटीचें तिकिट मिळणार, मुंबईला येणार, मला भेटणार ह्याबद्दल तिला शंका नव्हती.

निदान तिच्या बहिर्मनाला – कारण अन्तर्मन मधूनमधून ‘ हो पण तिकिट मिळालें तर ’ असे हुंदके देतच होतें.

* * *

मी गेल्याबरोबर शेगडीवर ठेवलेल्या गरम पाण्यानें तिनें कॉफी बनवली, केकची बशी पुढें केली आणि आग्रह करकरून केक खायला लावल्या.

“ काय करूं हो, हें माझं घर असं विस्कटून ठेवलं आहे म्हणून – नाहींतर माझ्या हातानें भारतीय जेवण करून तुम्हांला वाढलं असतं. ”

माझें तिच्या बोलण्याइतकेंच तिच्या शेगडीकडे लक्ष होतें. शेकतांना विस्तव फुकट जाऊं नये म्हणून नाना क्लृप्त्या करून पाणीही बरोबर तापविण्याची व्यवस्था होती. शेगडींत कोळशांप्रमाणें कागदाचेंही जळण पडत होतें.

ती शेगडी म्हणजे अस्ताव्यस्त ध्यान होतें, पण तें तिच्या खोलीच्या आतांच्या अवताराला अगदीं शोभून दिसत होतें आणि तिकिटाच्या भानगडीमुळें झालेल्या तिच्या मनाच्या अवस्थेशींही तें सुसंगत होते !

कॉफीकेक घेताघेतां तिनें भारतीय राजकरणाची कसून चौकशी केली. त्यांत तिची भारतीय भक्ति भरपूर दिसली. तिची भक्ति मात्र व्यक्तिनिष्ठ ! गांधींशीं तिची ओळख होती आणि नेहरूंशीं तर अगदीं स्नेहाचे संबंध ! नेहरूंमुळें कृष्ण मेननवर अगदीं जिव्हाळ्याचा लोभ !

* * *

तिचा निरोप घेऊन निघालों तेव्हां “ इंडिया ऑफिसच्या लालना भेटा आणि तेवढं तिकिटाचं पाहा ” असें तिनें मला म्हटलें त्यानंतर तिला मी दोनदां भेटलों. त्या दोनही भेटी पहिलीच्या प्रामाणिक आवृत्त्या ठरल्या. आणि दोनही खेपेस “ इंडिया ऑफिसमध्यें लालना भेटा आणि तेवढं तिकिटाचं पाहा ” हीच विनंती ! “ मला हिंदला जायचं, तिकिट काढून् कां हो द्यायना ? ” हें जणुं तिचें गाणें बनलें होतें.

मी लालना भेटलों – पण तिकिटाचें जमलेंच नसावें. हिंदुस्थानला कांहीं ती आली नाहीं.

: २८ :

रिव्हिएराची सौंदर्यभूमि आणि सौंदर्यसागर दृष्टीस पडावा म्हणून जिनोआला जातांना मी मुद्दाम नीसमार्गें गेलों, पण आज त्या प्रवासाची खरी अमर स्मृति एका व्यक्तीच्या रूपानें उरली आहे.

*　　　*　　　*

पॅरीसच्या गार्द लिऑन्समध्यें जिनोआच्या गाडींत मी शिरलों आणि ती अविस्मरणीय व्यक्ति भेटली —

मी डब्यांत शिरलों तेव्हां सार्‍या जागा भरलेल्या दिसल्या. फक्त एक रिकामी होती. तिच्यावर कोणी बसलेलें आहे कीं काय अशी मी चौकशी करूं लागल्याबरोबर कोपर्‍यांतल्या जागेवर बसलेला एक प्रचंड महापुरुष आपल्या मुलुखमैदानी आवाजांत गळा भरून हसूं लागला! हसतां हसतां त्यानें त्याच्या समोरच बसलेल्या लाकडी पायाच्या गृहस्थाकडे साभिप्राय बघितलें.

मीं त्याला म्हटले, “ आपण इंग्रजी बोलतां काय ? ”

तो उत्तरला, “ दुर्दैवानें मला फक्त इंग्रजीच येतं ... ”

त्याच्या ह्या उत्तरानें मी गोंधळून गेलों. त्याच्या शेजारचीच जागा रिकामी होती, तिच्यावर आसन ठेवलें – आणि म्हटलें, “ It’s so lucky to meet a person who knows a language you understand. ”

मीं एवढें म्हटल्यावर त्यानें तो तसा आभाळासारखा कां हसला तें मला सांगितलें. असें झाले होतें कीं तो डब्यांत शिरला तेव्हां त्याची स्थिति नेमकी माझ्यासारखीच झाली होती – आणि त्या समोरच्या, फ्रेंचखेरीज अवाक्षर न जाणणार्‍या लाकडी पायाच्या माणसानें ती पाहिली होती.

त्याची माझी दोस्ती जमण्यास एवढें कारण पुरेसें होतें. त्यांतच —

माझें लक्ष गेलें आणि त्याच्या हातांतलें पुस्तक दान्तेची ‘ डिव्हाईन कॉमेडी ’ हें होतें, हें ध्यानांत आलें.

मी थक्क झालों. प्रवासांत वाचण्यासाठीं दान्तेची अमर कविता निवडणारा हा प्राणी कांहीं निराळाच आहे हें ध्यानांत येण्यासाठीं आणखी कशाची गरज नव्हती.

गाडींत वाचण्यासाठीं त्यानें हें पुस्तक निवडलें ह्याबद्दल मीं आश्चर्य व्यक्त केलें. तेव्हां तो उद्गारला,

" Why not? It's a classic!" (कां? ती एक अभिजात कलाकृति नव्हे काय?)

आणि मग आमचें वाङ्मयासंबंधीं बोलणें सुरू झालें. मला वाङ्मयांत रस आहे हें ध्यानांत आल्याबरोबर त्याला अतिशय आनंद झाला. जणुं स्फुरणच चढलें! तो लगेच उठला. त्यानें वरच्या रॅकवरून एक लठ्ठशी बॅग काढली आणि त्यांतून भराभर चार सहा पुस्तकें आणि नियतकालिकें बाहेर काढलीं.

त्यांत एक वाईल्डच्या नाटकांचा संग्रह होता आणि एक जेम्स जॉयसवर काढलेला ' एनव्हॉय ' नांवाच्या आयरिश नियतकालिकाचा विशेषांक होता.

आणि मग त्यानें आपल्या मृदुंगासारख्या आवाजांत वाङ्मयावर बोलण्यास सुरुवात केली : " Is not Synge a fine writer? Is not Shaw a mighty writer? And how do you like Yeats? Wilde is simply beautiful – don't you think? And Joyce? Oh! He is a super genius, all others rolled into one! Have you read Ulyssis? (मीं म्हटलें, नाहीं, मी ' डब्लिनर्स ' वाचलें आहे.) Yes, Dubliners? How splendid!" (सिंज सुंदर लेखक नाहीं का? आणि शॉ प्रचंड, नाहीं? तुम्हांला येट्स कसा काय वाटतो? वाईल्ड म्हणजे केवळ सौंदर्य! – तुम्हांला काय वाटतें? आणि जॉयस? – जॉयस म्हणजे प्रतिभेचा साक्षात् अवतार! सारे त्याच्यावरून ओवाळून टाकावेत! तुम्ही युलिसिस् वाचलें आहे? नाहीं? डब्लिनर्स वाचलें आहे! किती छान!)

त्याचें तें बोलणें ऐकून मला नाटककार वर्तक ह्यांची आठवण झाली. तोच उत्साह, तीच अतिशयोक्ति, तसाच घुमणारा आवाज! वाङ्मयाविषयींचा युगायुगाचा उत्साह एकदम साकार होऊन जणुं तुमच्यापुढें उभा राहिला आहे!

मी एन्व्हॉयचा अंक घेऊन त्यांत प्रसिद्ध झालेलीं पत्रें वाचूं लागलों. हें पाहिल्याबरोबर सद्गृहस्थानें तो माझ्या हातांतून काढून घेतला-घेतांना म्हणाला,

" I will give you that, I will give you that. I am glad to give it to a friend from India." (मी तो तुम्हांलाच देईन, तुम्हांलाच देईन. एका भारतीय मित्राला तो देण्यास मला आनंदच वाटेल.)

—आणि त्यानें आपली वाङ्मयचर्चा पुढें चालू केली.

पण हा कोण गृहस्थ आहे–तो आयरिश असावा हें मीं ताडलेंच होतें; तो नेमका आयरिश लेखकांबद्दल बोलत होता–ह्याचा वाङ्मयाबद्दल इतका उत्साह कां हें जाणून घेण्याची मला तीव्र इच्छा झाली. मीं त्याला विचारलें,

" आपलं वाङ्मयावर इतकं प्रेम कां ? "

"Because I am an artist–and literature is a form of Art!" (कारण मी एक कलावंत आहें, आणि वाङ्मय हा कलेचा एक प्रकार आहे).

माझ्या मनांत वाङ्मय आणि चित्रकला ह्यांचा फार गाढ संबंध जडून गेलेला असल्यामुळें कीं काय नकळे, मीं त्याला विचारले,

" आपण चित्रकार आहांत का ? "

" नाहीं, पण मी एका चित्रकार–मित्राकडेच चाललों आहे. मी एक गायक आहें."

गायक म्हणजे धंदेवाईक नव्हे, तर उत्साही !

अधिक बोलण्यांतून त्याची माहिती मला मिळाली ती अशी कीं, तो डब्लिनचा एक मोठा व्यापारी होता. सालिना सहा लाख पौंडांचा व्यवहार करणाऱ्या एका बेकनविक्या कंपनीचा तो भागीदार होता. पण कलेचें फार वेड ! त्या वेडापायींच त्यानें अद्याप लग्न केलें नव्हतें. आतां जुळलें होतें. मात्र त्यानें आपल्या वाग्दत्त वधूऐवजीं कलेविषयीं बोलणेंच अधिक पसंत केलें.

वाङ्मयावर बोलतां बोलतांच तो झोपीं गेला.

★ ★ ★

सकाळीं सहा वाजतां मार्सीय आलें. कांहीं वेळानें पूर्वेकडे तांबडे फुटलें ! आम्ही दोघे कॉरिडॉरमध्यें जाऊन बाहेरचीं निसर्गाचीं बदलतीं दृश्यें पाहत उभे राहिलों.

आतां युरोपचें दर्शन बदललें होतें. दक्षिणेकडची भूमध्यसमुद्राची हवा जाणवत होती. डोंगराळ प्रदेशावर मोठमोठीं झाडें आणि मधूनमधून तालवृक्ष दिसत होते. मुख्य म्हणजे अनेक झाडांचीं पानें गळलीं नव्हतीं–अगर एकदम तांबडीं पिवळींही झालीं नव्हतीं. मला हिंदुस्थानचा साक्षात्कार होत आहेसें वाटलें आणि आंत कोठें तरी आनंदाच्या अस्फुट लहरी उसळूं लागल्या.

जरा वेळानें आकाशांत सूर्योदयपूर्व रंगांचा बदलता विलास सुरू झाला. आकाशाची कडा लालच लाल झाली. वर तरंगणारा एक ढग सोनेरी दिसूं लागला. झाडांच्या हिरव्या पानांवर सोनेरी छटा खेळते आहेसें भासूं लागलें.

मी आपला अनिमिष नेत्रांनीं पाहत होतों. भारतांतलें रोजचेंच दृश्य—पण आज अनेक दिवसांनीं दिसत होतें आणि मी तें सारें डोळ्यांत सांठविण्याचा प्रयत्न करीत होते.

माझा आयरिश मित्र मात्र सारखा "How Beautiful! How Beautiful!" असें करीत होता.

जरा वेळानें पर्णराजीनें शृंगारलेल्या एका टेकडीमागे सूर्यबिंब उगवलें आणि एक किरण सरळ आमच्याकडे आला. तो एकदम उद्गारला,

"How—how nice for a painter!"

मीं म्हटलें, "How nice for a singer!"

त्याला फार आनंद झालेला दिसला!

मार्सोय ते नीस आगगाडी डोंगराळ प्रदेशांतून जाते. दक्षिण फ्रान्समधला हा प्रदेश पाहून मला आमच्या इकडच्या डोंगराळ प्रदेशाची आठवण झाली. तसेच खडकाळ डोंगर, तशीच स्वैर वाढलेली जंगली झाडी. झाडांचीही वाढ चांगली. मधुनमधून लाल मातीचे तुकडे लागत. मला कोंकणची आठवण होई आणि हिंदुस्थानकडे निघालेलें माझें अंतःकरण एकदम अधीर होई. पण लगेच वाटे, "खरं म्हणजे, हें असंच पाहत राहावं; पुन्हा थोडंच पाहायला मिळणार आहे!"

★ ★ ★

नीस येण्यापूर्वींच आम्हांला भूमध्यसमुद्राचें दर्शन झाले—आणि तेव्हांपासून समुद्राची संगत सुरू झाली, जिनोआपर्यंत अखंड, अव्याहत सोबत!

साडेनऊच्या सुमारास नीस आलें आणि माझा आयरिश मित्र चांगला विस्तृत निरोप घेऊन निघून गेला.

एकामागून एक स्टेशनें येत. मध्येंच मॉण्टे कार्लोसारखें एखादे परिचित नांव स्टेशनच्या फलकावर वाचायला मिळे.

आणि कादंबऱ्यांत ह्या प्रदेशाचीं आणि येथील जीवनाचीं वाचलेलीं वर्णनें आठवत आणि एकमेकांत मिसळून मनाच्या पटावर तरल अस्थिर क्षणचित्रें उभीं करीत.

पण हीं ऐषआरामी दृश्यें पाहून मला फारसें समाधान झालें नाहीं. मला तें सारें कृत्रिम वाटलें.

हें सारें गुलछबूंचें, खुशालचेंडूंचें जीवन. १७।१८।१९।२० व्या शतकांत युरोपीय भांडवलशाहीनें आणि साम्राज्यशाहीनें जगभर संचार करून जी संपत्ति लुटली तिचेच हे उद्रेक! साम्राज्यशाहीच्या मधुपेल्यावरील फेंस! ज्याला कुणाला येथें येऊन अलकापुरीचा साक्षात्कार होत असेल त्याला मागासलेल्या जगांतल्या नरकापुरीस ही अलका जबाबदार आहे ही जाणीव नसते एवढेंच !

माझी ही जाणीव एका गोष्टीनें दाटलीच. व्हिंटिमिली येथें आम्ही सरहद्द ओलांडली आणि इटालियन प्रदेशांत प्रवेश केला. इटालियन रिव्हिएराचें दर्शन इतके संपन्न वाटलें नाहीं.—कारण इटालिअन साम्राज्यशाही इतकी समर्थ कधीं नव्हतीच.

★ ★ ★

उजवीकडचें समुद्राचें दर्शन मात्र प्रसन्न होतें. रिव्हिएरांतून आगगाडीनें जातांना समुद्राशीं स्नेह जमणें अपरिहार्यच ठरतें. समुद्र अगदीं तुमच्या पायाशीं येऊन खेळतो—पायाशीं म्हणजे आगगाडीचे रूळ ज्या धक्क्यावरून जातात, त्यांच्याशीं !

हा समुद्र दूरवर नजरेपार पसरलेला होता. मी मधुनमधून त्या सागराच्या अथांग पृष्ठभागाकडे पाहीं, आणि माझें मन विलक्षण अंतर्मुख बने. वाटे, हा समुद्र येथे ह्या किनाऱ्याशीं खेळत आहे, तसाच आतां ह्या क्षणीं तो हिंदुस्थानच्या, मुंबईच्या, रत्नागिरीच्या किनाऱ्यावर खेळत असेलच! मला एकदम त्या समुद्राबद्दल एक प्रकारचा गूढ जिव्हाळा वाटूं लागला !

जिव्हाळा वाटावा असेंच त्याचें दर्शन होतें. मधूनच त्याचें पाणी शेवाळी-हिरवें दिसे, मधूनच काळ्यानिळ्याशार शाईसारखे! आणि ह्या गडद, गहरी, काळ्यानिळ्या पाण्याच्या लाटा किनाऱ्यावर येऊन फुटल्या म्हणजे, आल्प्सवर पाहिलेलें बर्फच येथें येऊन पाण्याबरोबर खेळतें आहे असे वाटे.

मधूनच धक्क्यापलीकडे 'वाळू'चा किनारा दिसे—पण ती वाळू नव्हती तर लहान गोट्यांची रेती होती. कधीं काळी, कधीं सफेद-पिवळी, तर कधीं लालट! पिसांच्या मऊ गाद्यागिरद्यांवर लोळणाऱ्या रिव्हिएराच्या खुशालचेंडूंना तें मऊ सुख पोहत असतांना मिळावें अशी सागरराजाची इच्छा दिसली नाहीं!

उजवीकडच्या सागरदर्शनांत, मधुनमधून बोगद्यांतून जावें लागे तेव्हां, खंड पडे. डावीकडे कांठच्या प्रदेशावर अस्ताव्यस्त पसरलेला सहस्रपाद पर्वत जणुं पाण्यांत आपले खडकाळ पाय बुडवूनच राहिला होता !

मी भूमध्यसमुद्राच्या कांठानें चाललों होतों. आकाशांत सूर्य चांगला प्रकाशत होता. इंग्लंडमध्यें आकाशांतल्या रविराजाकडे नजर रोखून पाहतां येत असे तें आतां अशक्य झालें. तरी पण हवेंत गारठाच होता आणि डब्यांत येणारें ऊन सुख घेऊन येत होतें.

## : २९ :

जिनीवाइतकी नाहीं, पण थोडीशी उत्सुकता जिनोआबद्दल माझ्या मनांत होतीच. कां तें मी सांगूं शकत नव्हतों पण, जिनोआंत थोडाबहुत फेरफार केल्यानंतर थोडी थोडी कल्पना येऊं लागली —

ही उत्सुकता अबोध मनांत दाटलेली होती. कारण जिनोआचें नांव, कोलंबस, मॅझिनी, गॅरिबाल्डी ह्यांच्या नांवांशीं संलग्न आहे आणि ह्या श्रेष्ठांच्या जीवनाचा परिचय करून घेत असतांना तें केव्हां तरी माझ्या अंतर्मनांत जाऊन बसलें असावें.

* * *

स्टेशनच्या बाहेर चौकांतच कोलंबसाचें स्मारक आहे. जिनोआ ही कोलंबसाची जन्मभूमि. मी स्टेशनसमोरच एका हॉटेलांत राहात असल्यानें ह्या स्मारकाचें दर्शन नेहमीं होई आणि युरोपच्या सागरसफरींत ह्या शहराचें स्थान एका काळीं किती उच्च असेल ह्याची कल्पना येई.

मी लॉइड त्रिएस्तिनोच्या बोटीनें येणार होतों. साहजिकच त्रिएस्तिनोच्या कचेरींत जावें लागे—आणि जातांना गॅरिबाल्डी आणि मॅझिनी ह्या दोघांही राष्ट्रवीरांच्या स्मृति जागृत होत. लॉइड त्रिएस्तिनोच्या कचेरीकडे 'व्हाया गॅरिबाल्डी' ( म्हणजे गॅरिबाल्डी रस्त्यावरून ) जावें लागे—आणि मॅझिनीचें स्मारक तिकडे जाणाऱ्या रस्त्याच्या उजव्या बाजूसच आहे. व्हाया दांते नांवाचा रस्ताही ह्या शहरांत आहे.

* * *

माझें हॉटेल शहराच्या ह्या पुरातन भागांत होतें, हें माझें भाग्यच म्हटलें पाहिजे. जीर्णपणाच्या खुणा ह्या भागावर आहेतच. घरें मोठमोठ्या वखारीसारखीं वाटतात. तीं एका बाजूनें टेकडीवर आल्यानें तीं आहेत त्याहून उंच भासतात. रस्ते अरुंद आहेत आणि काळ्या फत्तरानीं बांधून काढलेले आहेत. पूर्वी येथलें वातावरण रस्त्यावरून जाणाऱ्या घोड्यांच्या टापांनीं दुमदुमत असेल; आज तें ट्रॅमच्या खडखडाटांनीं हैराण होत असते आणि तरी ह्या रस्त्यावरून चालण्यांत एक प्रकारचें मुग्ध समाधान वाटत होतें. अंगावर धावत येणाऱ्या ट्रॅमचा आणि गोंधळगर्दीचा त्रास होत असला तरी पदपथावरून जातांना, एखाद्या दुकानांत डोकावून पाहतां येत असे आणि ह्या जीर्ण नगरांत आधुनिकत्व ओतण्याचा प्रयत्न हे दुकानदार कसे करीत असत ह्याची कल्पना येत असे. एखाद्या प्राचीन विद्यापीठावरून जातांना, ह्या मध्ययुगीन व्यापारी शहरांत विद्याही फार पूर्वीपासून नांदत होती ह्याची कल्पना येई आणि जरा पुढें गेल्यावर जें प्रचंड प्रार्थनामंदिर ( चर्च ) दिसे, त्याने इटालिअन जीवनांत रोमन कॅथॉलिक धर्माला जें स्थान आहे त्याचीही जाणीव होई. हे चर्च बंद होतें आणि एका बाजूनें ढांसळलेलें होतें. युद्धकालांतील वैमानिक हल्ल्यांत तें सांपडलें होतें. चर्चच्याच चौकांत मोठमोठ्या जुन्या इमारती आणि राजवाडे, जिनोआच्या मध्ययुगीन वैभवाची साक्ष देत उभे आहेत.

रोममध्यें जो अनुभव आला तोच येथें ( ह्या जुन्या भागांतही ) आला. इतालिअन स्त्रिया फार सुंदर आहेत—आणि त्यांची कांति फार उत्तेजक आहे. अर्थात् जिनोआच्या स्त्रियांच्या सौंदर्याची आरासच ज्याला पाहायची असेल त्यानें सायंकाळीं ५ ते ७ च्या सुमारास व्हाया लुचोलीवर गेलें पाहिजे.

* * *

जिनोआ शहर हें मोठमोठ्या दगडी इमारतींचें आणि दगडी रस्त्यांचें—थोडक्यांत म्हणजे दगडांचें शहर वाटतें. व्हाया बाल्बीनें पुढे गेले म्हणजे एक प्रचंड बोगदा लागतो आणि तेथून जाणारीं वाहनें प्रचंड खडखडाट करतात तेव्हां ही दगडी जाणीव दाटते.

पण ज्या टेकड्या खोदून हा अगर असे दुसरे बोगदे जातात त्यांच्याकडे पाहिलें म्हणजे ह्या दगडी शहरांतही जिनोआच्या लोकांनीं निसर्गाची कोवळिक उमलविण्याचा कसा प्रयत्न केला आहे ह्याची जाणीव होते. ह्या टेकड्यांवर बंगले दिसतात, घरें दिसतात, त्यांच्या आसपास झाडें दिसतात, फुलझाडें

दिसतात. शहराचा बराचसा भाग टेकड्या खोदून बांधलेला आहे आणि टेकडीच्या शक्य त्या भागावर निसर्गाची कोवळी माया पसरण्याचा प्रयत्न केलेला आहे.

* * *

जुन्या भागांत पायीं हिंडल्यानें जें समाधान मिळतें तें थॉमस कूक अगर अमेरिकन एक्स्प्रेस ह्यांच्यातर्फें दोन तीन तासांत, धावत्या पळत्या मोटरींतून आणि धांदल्या वर्णनांतून होणाऱ्या शहरदर्शनानें खात्रीने होत नाहीं. तो अनुभव मीं घेतला. त्यामुळें शहराचा नवा भाग पाहूं शकलों. एका टेकडीवरील उद्यानांत जाऊं शकलों, तेथून जिनोआ बंदराचें दर्शन घेऊं शकलों, जिनोआ-मध्यें जें एक अपूर्व स्मशान आहे तेथील सौंदर्याचा (त्या 'स्मशान–सौंदर्याचा!') अनुभव घेऊं शकलों आणि कोळ्यांच्या वस्तींतही जाऊं शकलों. पण हें सारें माझ्या मनानें स्वैर भटकतांना करतां आलें असतें तर कोण समाधान लाभलें असतें! आमच्याबरोबर जो वाटाड्या होता त्यानें, हें कोलंबसाचें घर, हें मॅझिनीचे घर असें सांगितलें म्हणजे मन भूतकालांत जाऊन ऐतिहासिक स्मृतींत रममाण होऊं लागे, तोंच ही म्युसोलिनीच्या कारकीर्दीत बांधलेली ३२ मजली आकाशगामी इमारत, असे तो ओरडे–आणि साऱ्या रम्य स्मृति त्या इमारतीच्या गच्चीवरून आत्महत्येची उडी घेत! हें शहर-दर्शन पैसे खर्च करण्याचें उत्कृष्ट साधन असेल, पण शहराचे दर्शन आत्मसात् करण्याचें अगर त्याच्या आनंदांत रममाण होण्याचें तें खात्रीने साधन नव्हे.

* * *

त्यांतल्या त्यांत स्टॅलीएनो (Staglieno) स्मशानांतला फेरफटका मात्र समाधानकारक झाला. कारण तेथें मोटार जाऊं शकत नव्हती!–हें स्मशान एखाद्या वेगगतियुक्त यंत्रानें पाहण्याची सोय झाली तर हेंही समाधान मिळणार नाहीं.

ह्या स्मशानांत आम्ही खर्च केलेला अर्धा एक तास हा एक अपूर्व अनुभव होता. हे स्मशान एका टेकडीच्या पायथ्याशीं आहे. टेकडीवर जुन्या भिंतीचे अवशेष आणि नव्या पाणी व्यवस्थेचे नळ दिसतात. जुन्या भिंतीच्या स्मृति कांहीं ऐतिहासिक लढ्याशीं निगडित झालेल्या आहेत.

Death is no respector of persons: मृत्यूममोर सारे सारखे असें म्हणतात. पण स्मशानांतील स्मारकांना हा नियम मुळींच लागूं नाहीं. ह्या स्मशा-

नाचा जो उघडा भाग आहे त्यांत हजारों गरीब लोक पुरलेले आहेत. त्यांच्या थडग्यांवर एकादा लाकडी क्रूस उभारला गेला तर तें त्यांचें नशिब म्हणायचें. गरीबांच्या ह्या 'मृत' लोकसंख्येत कांहीं मध्यमवर्गीय मृतही मिसळलेले दिसले, एवढेंच त्या गरीबांचें भाग्य !

पण ज्यांच्याजवळ पैसा आहे आणि सामर्थ्य आहे त्यांनीं, आपल्या प्रिय जनांची स्मृति मात्र समृद्ध स्मारकांनीं उजळली आहे. ह्यासाठीं खास इमारत उभारलेली आहे. ह्या इमारतींत शिल्पकृतीचे नाना नमुने दिसतात. ह्या शिल्पकृतींत कल्पनांप्रमाणेंच शैलीचीही विविधता आढळते आणि प्रत्येक शिल्पकृतीच्या कल्पनेवरून तिला कारण झालेल्या जीवनावरही प्रकाश पडतो. उदाहरणार्थ, एकादा पिता गेला तर त्याच्या मागे शोक करणाऱ्या कुटुंबाचें, त्याच्या प्रेमाचें ; आई गेली तर दुःखावेगानें करुणेच्या मूर्ति बनलेल्या बालकांचें; अथवा एखादा नेता गेला तर अनाथ बनलेल्या अनुयायांचेंही थोडेसें दर्शन त्या शिल्पदृश्यांतून घडतें.

★ ★ ★

हें श्रीमंतीचे प्रदर्शन असो, पण 'ह्या लोकांनीं मृत्यु सुंदर करून सोडला आहे' (They have beautified death) असे उद्गार हे शिल्प पाहतांना निघाल्याशिवाय राहत नाहींत.

पण ह्या श्रीमंतीच्या सौंदर्यात एका गरीब स्त्रीच्या सौंदर्याचेंही दर्शन घडतें. एक गरीब स्त्री – साधी फळें विकणारी. तिनें हें स्मारकशिल्प पाहिलें आणि तिला वाटलें, आपलेंही असें स्मारक कां होऊं नये. ती त्या वेळच्या एका नामांकित शिल्पकाराकडे गेली आणि 'माझा असा पुतळा कर' म्हणून तिनें त्याला विनविलें. त्यानें पुतळा बनवायला कांहीं हजार लागतील म्हणून सांगितलें.

'ठीक आहे,' ती म्हणाली आणि निघून आली. तेव्हांपासून पैपै करून पैसे जमविण्यास तिने सुरुवात केली. ह्या एकाच गोष्टीचा ध्यास तिनें घेतला. तिचें सारें जीवन मरणोत्तर स्मारकमय बनलें.

अखेरीस तिनें पुरेसा पैसा जमविला आणि आपला पुतळा करून घेतला.

एका प्रमुख जागीं तो पुतळा आज उभा आहे. तिच्या हातांत सुक्या फळांची माळ आहे. तिच्या नजरेंत सफलतेचें समाधान आहे. त्या मूर्तींत एक प्रकारचा अहंकार आहे, पण एक निष्ठाही आहे – आणि त्या श्रीमंतांच्या मेळाव्यांत ही स्त्री त्या एका ध्यासामुळेंच उभी असल्यामुळे तिला एक प्रकारची

ऐतिहासिकताही प्राप्त झाली आहे. जिनोआ म्हटले म्हणजे कोलंबस प्रभृतींचें नांव सारेच घेतात, पण ह्या स्त्रीची आठवण जिनोआचे लोक एक प्रकारच्या समाधानानें काढतात. ह्या समाधानांत इच्छापूर्ति आहे म्हणून ते खोटे असले तरी सार्थ आहे. लोकांच्या जीवनांत त्याला महत्त्व आहे.

★ ★ ★

ह्या स्मशानांत जातांयेतांना आम्हां भारतीयांना परिचित असा एक अनुभव आला. भिकारी आणि फुलें-माळ-मेणबत्त्या वगैरे विकणारे फेरीवाले ह्यांनीं आमच्याभोवतीं झुंबड केली! इटली आणि भारत ह्यांच्या आत्म्यांतल्या साम्याचा जो एक अनुभव इतालियन वाङ्मय वाचतांना मिळतो त्याचा थोडासा लाभ झाला.

★ ★ ★

स्मशानाकडे जातांना एका टेकडीच्या टोकावरून जिनोआ बंदरचें दर्शन घेतलें. जिनोआ हें युरोपांतलें एक प्रमुख बंदर आहे, पण येथून त्याच्या पसाऱ्याची खरी कल्पना आली. स्मशान पाहून झाल्यावर आम्ही एका जवळच्या उपनगरांतील कोळ्यांच्या वस्तींत गेलों. नमुनेदार दर्शन!—किनाऱ्यावर होड्यांना लागून होड्या आणि किनाऱ्यापलीकडे घरांना लागून घरें! फक्त कोळ्यांची गर्दी दिसली नाहीं. एक आडोशाचें स्थान पकडून एक प्रेमी युगुल आयुष्यांतील रेशमी क्षणांच्या कानगोष्टी करतांना दिसलें.

इतक्यांत क्षितिजावर टेकलेलें सूर्यबिंब आम्हांला दिसलें. आमच्याबरोबर एक जर्मन जोडपें होतें. पत्नीनें बाहेर कॅमेरा काढला आणि त्या दृश्याचें ती छायाचित्र घेऊं लागली—

पति म्हणाला, “ तें नीट येणार नाहीं. ”

पत्नी उत्तरली “ न कां येईना, पण युरोपांतील सूर्यास्ताची ही शेवटची स्मृति चार वर्षे जवळ तर बाळगतां येईल. ”

दुसऱ्या दिवशीं दुपारीं मी जिनोआ सोडणार होतों. युरोपचा निरोप घेणें म्हणजे काय, ह्याची जाणीव ह्या संवादानें मला झाली. मी आकुल दृष्टीनें त्या सूर्यास्ताच्या दृश्याकडे आणि मागें गेलेल्या सूर्यामुळें थोड्या काळवंडलेल्या रिव्हिएराच्या टेकड्यांकडे—टेकड्यांवरील बंगल्यांकडे, झाडाझुडुपांकडे पाहूं लागलों.

ह्या सूर्य मला पुनः कधीं पाहायला मिळेल का? ह्या सौंदर्यानें माझे नेत्र पुनः कधीं भरून जातील का? हा जो अनुभव अकल्पित आला तो पुनः कधीं येईल का?—आंतल्या आंत नाना प्रश्नचिन्हें उमटूं लागलीं.

पण वाटलें, पुन्हाचें कोणीं सांगितलें आहे? आज पाहायला मिळतें आहे तें पाहा—डोळे भरून पाहा—अंतःकरण भरून पाहा.

मला काणेकरांच्या ओळी आठवल्या. हें दृश्य पाहत असेंच चिरकाल राहावें. पुतळा बनून पाहत राहावें.

मी तें सारें अंतःकरणांत सांठवून ठेवूं लागलों—

इतक्यांत वाटाड्यानें पुकारा केला, ड्रायव्हरनें हॉर्न वाजविला—

माझी सारी सफर कशी झाली ह्याचा जणुं प्रतीकात्मक हा अनुभव आला. आणि आंतल्या आंत विषाद वाटला.

★ ★ ★

परत येतांना आम्हांला दोन इमारती दाखविण्यांत आल्या—आणि मला आश्चर्याचा थोडासा धक्काच बसला!

युरोपांत स्कायस्क्रेपर्स—गगनचुंबी इमारती—नाहींत अशी माझी खात्री होती, पण माझ्यापुढें ३२ मजल्यांची एक आणि २४ मजल्यांची दुसरी, अशा दोन आकाशभेदी इमारती उभ्या होत्या. म्युसोलिनीच्या राजवटींत त्या बांधल्या!

म्युसोलिनीच्या उध्वस्त स्मृतीशीं ह्या इमारती संलग्न व्हाव्या हें विचित्रच आहे, पण लगेच त्यांची अपरिहार्यता माझ्या ध्यानांत आली—

न्यूयॉर्कमध्ये गगनचुंबी इमारती कां आल्या? जागा नाहीं म्हणून—मर्यादित जागेंत अमाप लोकसंख्येची सोय करणें भाग पडलें म्हणून.

पण मॉस्कोमध्यें अशा इमारती कां उभारल्या जात आहेत? मॉस्कोच्या आसपास मोकळी जागा तर मुबलक आहे!

कारण, हुकूमशहांची ती एक मानसिक गरज आहे. भव्यतेची आराधना ही त्यांची एक शक्ति आहे. त्यांत मानसशास्त्र आहे आणि सत्ताशास्त्रही आहे!

जिनोआच्या मागें हवी तितकी विस्तृत मोकळी भूमि धारण करून टेकड्यांची रांग उभी असतांना म्युसोलिनीला ह्या दोन गगनचुंबी इमारती बांधणें भाग पडलें ह्याचें कारण हेंच—हुकूमशहांचें राजकारण!

# : ३० :

टिल्हवाल्डी संध्याकाळीं पांच वाजतां सुटणार होती, पण पांच वाजून गेले तरी ती सुटण्याचें कांहीं लक्षण दिसेना – आणि जरा वेळाने समजलें कीं बोट मध्यरात्रीं सुटणार. जिनोआचा निरोप घेण्यासाठीं अनेक लोक मध्यरात्रींपर्यंत जागत राहिले होते. पण रात्रीं बोट सुटणार नाहीं, अशीं सारीं लक्षणें दिसत होतीं, म्हणून मी खुशाल झोंपीं गेलों आणि सकाळीं मात्र लवकर उठलों आणि जिनोआच्या निरोपाची सारी ' गंमत ' अनुभवण्यासाठीं तयार झालों.

पण —

वर डेकवर आलों तर सारें ओलेंचिंब ! आणि बाहेर पावसाच्या धारा ! सारें जिनोआ शहर पावसाच्या धवल वस्त्रांत वेष्टिलेले दिसलें. उजळणाऱ्या दिव्यांमुळेंच त्याचें अस्तित्व जाणवत होते. ते दिवे एखाद्या मृताच्या आत्म्याप्रमाणें भासत होते !

साडेसात आठ वाजतां बोटीचा भोंगा वाजला आणि मी वर गेलों.

आतां पाऊस कमी झाला होता. शहराला वेष्टिणारें धूसर वस्त्र अगदीं विरल झालें होतें. टेकडीच्या कुशींतले बंगले, कारखाने, गगनचुंबी इमारती आणि मनोरे आपलें तरल दर्शन देऊं लागले होते.

* * *

जरा वेळानें आकाश स्वच्छ झालें. सूर्याचे किरण शुद्ध स्वरूपांत बाहेर आले आणि पावसानें ओल्या बनलेल्या जगावर विलसूं लागले.

आम्हांला निरोप देणारें जिनोआ जणुं प्रसन्न झालें ! आम्ही सारे प्रवासी – आम्ही आमच्या कार्याला चाललों ह्याचें त्याला समाधानच वाटलें असावें ! पण मी मात्र, युरोप सुटलें म्हणून थोडासा खिन्नच झालों होतों.

पण नापोलीला ( नेपल्सला ) आमची बोट थांबणार होती. युरोपचा आणखी एकवार स्पर्श होणार असें मनाचें समाधान करून घेऊन मी आजूबाजूचीं दृश्यें पाहूं लागलों.

बोट बाहेर आली, पाण्याच्या विशाल पृष्ठभागावर आपला मार्ग आक्रमूं लागली. डाव्या बाजूला इटलीचा खडकाळ पण सुंदर किनारा दिसत होता –

किनाऱ्यावर नारळीच्या झाडांचीं बनें असतीं तर हें कोंकणच वाटलें असतें. अधूनमधून डाव्या बाजूच्या खडकांवर धुक्याचीं पुटें बसलेलीं दिसत आणि इटलीच्या रोमन कॅथॉलिक आत्म्याची आठवण करून देणाऱ्या धर्मगुरूंचें स्मरण होई.

* * *

दुपारीं चार वाजतां आम्हीं चहा पिण्यासाठीं वर डायनिंग रूममध्यें गेलों इतक्यांत 'एल्बा, एल्बा' असें कोणीतरी ओरडलें आणि 'नेपोलिअननें अजरामर करून ठेवलेले तेच हे एल्बा बेट' अशी जाणीव होऊन मी चहा टाकून तसाच डेकवर पळालो. ते खडकाळ बेट एखाद्या अजस्र राक्षसासारखे भासलेंच, पण त्याच्या सभोवतीं समुद्र असा कांहीं खवळलेला पिंगा घालीत होता आणि तो विक्राळ समुद्र तेथे इतका कांहीं खोल भासत होता कीं अशा समुद्रावरून एखाद्या उफराट्या काळजाच्या चांच्याप्रमाणे पळ काढणाऱ्या नेपोलिअनचे धाडस खरोखर उरांत धडकी भरविणारेच भासलें.

* * *

नेपल्सला आम्ही अगदीं वेळेवर म्हणजे सकाळीं पोचलों. सकाळचा चहा, अल्पोपहार वगैरे आटपून आम्ही गांवात भटकण्यास मोकळे झालो. आमच्या-बरोबर युगोस्लाव्ह पेण्टर वेरा निकोलिच् आणि ते जिनोआला भेटलेले जर्मन जोडपे होते.

आम्हांला नेपल्सची कांहींच माहिती नव्हती. पण 'मला माहीत आहे, माझ्याबरोबर या' असें वेरा निकोलिच् जोरांत सांगत होती आणि तिला फारसे कांहीं माहीत नाहीं हे स्पष्ट दिसत होतें तरी आमची निर्हेतुक भटकण्याचीच सिद्धता असल्यानें तिच्या अज्ञानयुक्त ज्ञानावर आरूढ होऊन आम्हीं नेपल्सवर स्वारी करण्याचे ठरविलें.

बंदराच्या बाहेर पडल्यावर लगेच एक जुनाट किल्लेवजा राजवाडा लागतो. नेपल्सचा तो संरक्षक रखवालदारच वाटला. (मात्र त्याचा सरकारी कचेरीसाठीं उपयोग होत असतो!) त्या राजवाड्याबाहेरच एक सार्वजनिक बाग आहे, पण त्या हिंवाळ्यांत ती अगदीं शुष्क दिसली व आम्ही तिच्या-बद्दल उसना उत्साह आणण्याच्या फंदांत न पडतां सरळ राजवाड्यांत प्रवेश केला.

राजवाड्यांत एका मांजरानें आनंदाचा संसार मांडल्याचें ध्यानांत आलें. हें मांजर फारच आतिथ्यशील दिसलें. आम्ही आंत गेल्यावर तें आमच्या स्वागतास आलें—आणि बाहेर जाताना आम्हांला निरोप देण्यासही तें सिद्ध होतें. त्याची निरोपाची हिरवी नजर मला अद्याप आठवते.

* * *

वेरा निकोलिच्च्या मागून आम्ही चाललो. डाव्या बाजूला एक मोठें थोरलें थिएटर लागलें, तें फार उत्कृष्ट आहे हा तिचा अभिप्राय ग्रहण केला. नंतर कॅम्पानाच्या विधिमंडळाचें सभागृह लागले. त्यानें आकृष्ट होण्यास मात्र वेराबाईच्या शिफारशीची गरज लागली नाहीं. त्या इमारतीवर नापोलीच्या ऐतिहासिक पुरुषांचे जे भव्य आणि शक्तिशाली पुतळे दिसतात त्यांनीं तुमची नजर बांधली जातेच! नापोलीचा इतिहास माहीत असता तर तेवढ्यांतल्या तेवढ्यांत त्या पुतळ्यांशीं मीं थोडे संभाषणही करून घेतले असतें.

* * *

नंतर आम्ही एक छोट्याशा उद्यानात आलो आणि नेपल्सच्या खऱ्या सौंदर्याचें एक पुष्पच जणुं आमच्या समोर उमललें.

डाव्या बाजूला आणि समोर समुद्र. समुद्रांत लहानमोठीं जहाजे. समुद्राच्या पलीकडे शहराचा भाग आणि त्याच्या मागें विश्वविख्यात विसुविअस आपला सारा क्रुद्ध इतिहास आणि अज्ञात भवितव्य घेऊन उभा—

विसुविअस! आज नेपल्सला त्यानें सौंदर्याची आणि आकर्षणाची अपूर्व पार्श्वभूमि दिली आहे! पण त्याच्या आकर्षणांत भीतीच्या गूढ छटा अपरिहार्यपणें उमटतात. पॉम्पीचें सारें वैभव त्यानें हांहां म्हणतां उध्वस्त केले. समुद्र आपला वडवानल पोटांत घालून शांत असतो, तसा आपल्या साऱ्या क्रुद्ध ज्वाला पोटांत घालून आज तो शांत उभा असेल, पण उद्यां तो आजवर अनुभवास न आलेली आग ओकणार नाहीं, ह्याची खात्री काय?

विसुविअस शांत होता, स्तब्ध होता, निश्चल होता; साऱ्या दृश्यावर भव्य सौंदर्याचा सुश्लिष्ट वर्षाव करीत होता. पण मला तरी त्याची ती समाधि म्हणजे मगरीची जलनिद्राच वाटली!

त्या उद्यानाच्या दोनही बाजूंना राजरस्ते होते आणि समुद्रकांठच्या रस्त्याला सुंदर धक्का होता. मी धावत धक्क्याकडे गेलों, त्याच्यावर चढलों आणि एकदां सारें दृश्य डोळे भरून पाहिलें—

पण पुढें काय दृष्टीस पडणार आहे ह्याची कल्पनाच नव्हती. त्या उद्यानाच्या टोंकाला दोनही रस्ते एकात्म होऊन उजवीकडे वळले—आणि एकदम मुंबईचा मरीन ड्राईव्ह समोर उघडला !

नजर पोंचेपर्यंत हा रस्ता समुद्राच्या कांठानें जातो आणि त्यानें जातांना आपण मरीन ड्राईव्हवरून चालत आहों असेंच वाटतें.

पण नेपल्सच्या मरीन ड्राईव्हचे भाग्य थोडें अधिक. उजव्या बाजूला टेकडी पसरली आहे आणि त्याच्यावर बंगले-बगिचे पसरले आहेत, त्याचें मला फारसे कांहीं वाटलें नाहीं—मरीन ड्राईव्हसमोर मलबार हिलचे सौंदर्य पसरलेलें नाहीं काय ?—पण ह्या ड्राईव्हच्या उजव्या बाजूला मानवाच्या कृत्रिम जीवनांतील केविलवाण्या अहंकाराची साक्ष देत उभे असलेले बंगले नाहींत. त्यांच्या ऐवजीं लांबवर पसरलेलीं मोकळीं उद्यानें आहेत, त्याचें हिरवेंगार वातावरण आहे !—

आणि मधूनमधून कांहीं सांस्कृतिक संस्था आहेत. उदाहरणार्थ, एक ओपन एअर ( उघडे ) थिएटर, आणि एक मत्स्यालय !

अर्थात् आपल्या मरीन ड्राईव्हवरही मत्स्यालय आहे, कैवल्यधाम आहे, बालकोद्यान आहे आणि क्रिकेटचीं मैदाने आहेत, ह्याची मला आठवण आहे. पण तेवढेंही नसतें तर मरीन ड्राईव्हचें स्मरण तरी कशाला झालें असतें ?

पण मुंबईचा मरीन ड्राईव्ह अगदीं थेट नेपल्सच्या मरीन ड्राईव्हचा अवतार असता तरी विसुविअसची पार्श्वभूमि त्याला थोडीच लाभली असती ?

पण कल्पना करा, निसर्गराणा उद्यां अगदीं प्रसन्न झाला आणि ज्वालामुखीच्या पार्श्वभूमीचें वरदान करतों असे म्हणाला तरी तुम्ही तें स्वीकाराल काय ?

विसुविअसनें उध्वस्त केलेलें पॉम्पी पाहा—आणि मग काय तें उत्तर द्या.

दुपारीं जेवण झाल्यावर आम्ही पॉम्पीचें उध्वस्तनगर पाहण्यास गेलों.

* * *

प्रथमच तेथलें वस्तुसंग्रहालय पाहिलें. त्यांत त्या वेळचीं शस्त्रें, हत्यारें, भांडींकुंडीं, दागिने, शिल्प वगैरे वस्तु पाहिल्या. ह्या वस्तूंनीं अन्तःकरण फार हललें नाहीं, पण लाव्हा रसानें भरलेला एक स्त्रीदेह तेथें आहे तो पाहिला आणि मग मात्र त्या प्रचंड ऐतिहासिक शोककथेचे चटके बसूं लागले !

पण त्या उध्वस्त शहरांतून हिंडतांना शोकभावनेंत संशोधक बुद्धि मिसळते ; पॉम्पीचे नागरिक कसे राहत होते, त्यांचीं घरें कशीं होतीं, त्यांचीं दुकानें कशीं होतीं, तेथे रस्ते कसे बांधीत, त्यांच्या सभागृहांची, मंदिरांची, बाजारांची बांधणी आणि मांडणी कशी होती—थोडक्यांत म्हणजे त्यांची संस्कृति कशी होती, हे प्रश्न प्रधान बनूं लागतात आणि आमच्या बरोबरचा वाटाड्या आपल्या बसलेल्या आवाजानें, झिजलेल्या वृत्तीने आणि कृत्रिम उत्साहाने आम्हांला ह्याच प्रश्नांचीं उत्तरें देत होता !

एकमेकांना छेदून पण समांतर जाणाऱ्या रस्त्यांवरून त्या वेळच्या नगरांची रचना किती प्रमाणशीर होती ह्याची कल्पना आली ; सभामंडपांची भव्यता पाहिली आणि त्या वेळच्या लोकशाहींत लोकचैतन्य बरेच असावे असे वाटलें ; अपोलो, ज्यूपिटर ह्यांचीं देवळें पाहिलीं आणि त्या वेळच्या धर्मभावनांत सृष्टिपूजनाचे सौंदर्य मिसळलें होतें हे ध्यानांत आले ; घरांचे लहानमोठे नमुने पाहिले आणि समजांतील वर्गभेदांचा अंदाज आला ; मदिरेचीं दुकाने आणि मदिरानिर्मितीचीं साधनें पाहिलीं आणि लोकांच्या जीवनासक्तीवर प्रकाश पडला ; सार्वजनिक स्नानगृहें पाहिलीं आणि ह्या जीवनासक्तीच्या सार्वजनिक विलासाचा अनुभव आला ; एका घरांतील गुप्त दालनांतलें एक अश्लील चित्र बघितले आणि त्या वेळच्या संस्कृतींत किती प्राथमिकता होती ह्याची कल्पना आली ; रंग-मंदिरें पाहिलीं, क्रीडामंदिरे पाहिलीं आणि त्या जीवनांतही संस्कार होते हें ध्यानांत आलें.

पॉम्पीचें उत्खनन कित्येक शतकें चालू आहे, आणि मानवाची संशोधन-बुद्धि शाबूत असेपर्यंत तें चालूही राहील—

* * *

पण ते कां ? माझ्या मनांत हाच विचार सारखा येत होता. आम्ही तरी धावत हें उध्वस्तनगर पाहण्यास कां आलो ? तो वेळ गांवांतील इतर सौंदर्यस्थळें पाहण्यांत कां खर्च केला नाहीं ?

ह्या उध्वस्त दृश्यांतही एक सौंदर्य प्रतीत होत होतें—तें कां ?

मानव वर्तमानांत वावरतो, भविष्याबद्दल उत्सुक असतो, पण त्याला भूत-काळाची ओढ असते, हेंच खरें. ती विरही ओढ असते. गतायुष्य, गतानुभव, गतजीवन—आपले व आपल्या पूर्वजांचें गतजीवन—ह्यांच्या विरहानें विव्हळ झालेलें माझें मन तिकडे ओढ घेत असतें.

मी हें वर्णन तरी त्याच ओढीमुळेच लिहीत नाहीं का ?

*　　　*　　　*

मी लहानपणीं लॉर्ड लिटन्‌ची ‘दि लास्ट डेज् ऑफ् पॉम्पी’ ही कादंबरी वाचली होती. त्यांतली ती आंधळी फुलवाली मुलगी !

मी तें शहर पाहत असतांना ती सारखी माझ्याबरोबर वावरत होती. त्या वेळच्या जीवनाचे रंग अंतरंग मला दाखवीत होती. हसत होती, खेळत होती आणि शोकाविग्रही होत होती !

तें पॉम्पी शहर म्हणजे मला त्या अंधकन्येची शोकमूर्ति वाटलें ! त्या मुलीचे आणि त्या नगरांत राहणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचें !

## : ३१ :

सकाळीं नेपल्स सोडलें आणि युरोपच्या भूमीचा अखेरचा निरोप घेतला. पण भूमध्यसमुद्रांत प्रवेश करीपर्यंत मधूनमधून युरोपचें दर्शन होणार होतेंच—आणि तें दूरदर्शन असल्याने सौंदर्यपूर्ण असणार ह्याबद्दलही खात्री होतीच.

*　　　*　　　*

सुदैवानें निसर्गानेंही ह्यांत मदत केली आणि काप्री बेटापाशीं एक आश्चर्यकारक दृश्य पाहावयास मिळाले.

सकाळीं दहा-साडेदहाचा सुमार होता. एका ठिकाणीं समुद्राचें पाणी कारंजासारखे वर उडत आहे आणि वरचा आकाशांतला ढग एखाद्या स्तंभासारखा लोंबकळून त्याला भेटायला खालीं येत आहे—आणि अखेरीस त्यांचें मीलन होऊन, आकाश आणि समुद्र ह्यांच्यामध्यें जणुं एक विशाल मनोराच निर्माण झाला आह, असें दिसलें. सूर्याचे किरण त्या मनोऱ्यावर खेळूं लागले आणि तो जलस्तंभ इंद्रफुलांनीं फुलून निघाला. ह्या दृश्यांत पुरेसें सौंदर्य प्रकट झालें नाहीं असें निसर्गाला वाटल्यामुळें कीं काय, मोठा वारा आला आणि तो सबंध मनोरा झपाट्यानें काप्रीच्या कड्याकडे जाऊं लागला !—अखेर तो त्या कड्यावर आपटला आणि एखादी बिलोरी कांचेची सुंदर शिल्पकृति दगडावर आपटून तिचा चुराडा व्हावा तसा त्या दृश्याचा आमच्या डोळ्यां-

देखत चुराडा झाला ! स्वप्नांचा चुराडा होणे म्हणजे काय ह्याचें जणुं मूर्तरूप पाहायला मिळाले !

★ ★ ★

काप्री बेटाची गणना जगांतल्या निवडक सुंदर बेटांत होते. हें बेट सौदर्यासक्त लोकांच्या स्वप्नांत जसें अमर झालेले आहे तसेच तें वाङ्मयांत आणि अनेक वाङ्मयसेवकांच्या जीवनांत अमर झालेलें आहे. मॅक्झिम गॉर्की कित्येक दिवस ह्याच बेटावर वास्तव्य करून असे. लेनिननें मुद्दाम त्याला प्रकृतिस्वास्थासाठीं तेथे पाठविले होतें. डॉ. ॲक्झेल मुन्थी ह्यांचे 'दि स्टोरी ऑफ सान मायकेल' हें विख्यात पुस्तक म्हणजे ह्या बेटाच्या ओढीनें स्फुरलेली एक कलासुंदर कहाणी आहे. ग्रेसी फील्ड्स ह्या प्रसिद्ध नटीने ह्या बेटावर एक हॉटेल काढल्याचें मीं नुकतेंच वाचलें होतें.

ह्या बेटावर पाऊल टाकण्याचें भाग्य मला लाभलें नाहीं. पण माझी एका अलौकिक निसर्गदृश्याची, किंवा अधिक अचूक बोलायचे म्हणजे निसर्गचमत्काराची स्मृति ह्या बेटाशीं निगडित झाली आहे हें तरी एक भाग्यच नव्हे काय ?

★ ★ ★

रात्रीं साडेआठ वाजतां आमची बोट स्ट्रांबोली बेटाच्या बाजूने गेली. स्ट्रांबोली नांवाचा एक बोलपट मुंबईत येऊन गेला होता. मीं तो पाहिला नव्हता, पण त्याच्या नांवानेंच माझ्या मनाची पकड घेतलेली होती. आतां ह्या नांवांत एक नवीनच आकर्षक अर्थ ओतला गेला.

स्ट्रांबोलीवर एक जागृत ज्वालामुखी आहे. हा विसुविअससारखा क्रोधाग्नीचा वर्षाव करणारा नाहीं, तर अग्निसौंदर्याचें सिंचन करणारा आहे—निदान बाजूनें जाणाऱ्या बोटींतील उतारूंना तरी तो असा वाटतो—आणि म्हणून मला वाटलें, हा भारताच्या बाजूला असता तर आमच्या, निसर्गसौंदर्योंत परमेश्वरी साक्षात्कर शोधणाऱ्या, पूर्वजांनीं त्याचें एखाद्या भव्य ज्योतिर्लिंगांत रूपांतर केलें नसतें काय ?

कधीं कधीं तो आपल्या ज्वाला आकाशांत उंच फेंकतो—आणि मग त्या बाजूचें सारें आकाश लाल लाल होऊन जातें—त्यांत हिरव्या, पिवळ्या, जांभळ्या छटा पसरतात, आणि तें सारें दृश्य सुंदर सुंदर दिसतें असें आम्हांला बोटीवरच्या अधिकाऱ्यांनीं सांगितलें.

—पण आज मात्र, तो ज्वालामुखी प्रसन्न झाला नाहीं. आपल्या गुहेत निपचित पडून राहणाऱ्या आणि पडल्या पडल्याच क्षणभर डोळे उघडून मोठ्या अनिच्छेने एखादी दबेल आरोळी ठोकणाऱ्या सिंहासारखाच तो वागला. आम्ही डोळे फाडफाडून बघत राहिलो—रात्रीच्या काळोखात स्ट्रांबोली दाटलेल्या अंधाराच्या राशींसारखा दिसत होता, पण डोळा उघडून त्यांतला प्रकाश दाखविण्याची कांहीं त्याची इच्छा दिसेना. बराच वेळ झाल्यावर, पटकन वीज चमकावी, क्षणमात्र लख्ख व्हावे आणि पुनः जिकडेतिकडे काळेंमिट्ट, तसें झाले. स्ट्रांबोलीनें क्षणभर—फक्त क्षणभरच—डोळे किलकिले करून बघितले !

पुनः तो अशी कृपा करील म्हणून मी पाहात राहिलों. इतर सारे आंत जेवायला निघून गेले. मी कठड्यावर रेलून पाहात राहिलों—पण फुकट ! वाटलें, दिवस असता तर निदान लाव्हा रसाने रंगलेले आसमंत तरी दिसलें असते. माझ्या उत्सुक नजरेसमोर, त्याच दिवशीं सकाळीं, नेपल्स सोडतांना पाहिलेले विसुविअसचे बाह्यस्वरूप उभें राहिले. आजुबाजूला कित्येक मैल लाव्हा रसाचे गोठलेले लाल–काळे–जाभळे प्रवाह दिसत होते. त्याचे ते थरावर थर पाहून मन थोडेसे थरकांपलेच होते.

* * *

रात्रीं बारा एकच्या सुमारास आमची बोट मसीनाच्या सामुद्रधुनींत शिरली. मसीनाशीं इटलीचे दक्षिण टोक आणि सिसिली बेट हीं हस्तांदोलनासाठीं पुढें सरकतात, पण समुद्र कांहीं त्यांना मीलनस्पर्शाचे सुख अनभवूं देत नाहीं.

ह्या चिंचोळ्या समुद्रांतून जातांना दिवसा म्हणे फारच सुंदर देखावा दिसतो. कारण मसीनाचें दर्शन होत असतांना त्याच्या मागें उभा असलेला एटना पर्वत हा सारखा दृष्टीसमोर असतो. एटना हा इटलींतला सर्वांत मोठा ज्वालामुखी आहे. खरोखर निसर्गसौंदर्याच्या दृष्टीनें इटली अतिशय भाग्यवान देश ! हें सौंदर्य निसर्गाच्या विमल हास्यानें निर्माण झालें आहे तसेंच त्याच्या विखारी क्रोधानेंही निमार्ण झालेलें आहे.

आतां रात्रीं एटनाचे दर्शन अशक्य होतें, पण म्हणून सौंदर्य वाढलें कीं कमी झालें हें सांगणें मात्र कठीण आहे. खाडीच्या दोनही बाजूंस टेकड्या आहेत. टेकड्यांवर शहरें व गांवें वसलेलीं आहेत आणि तीं अर्थात् रात्रीं आपल्या विद्युन्नेत्रांनीं पाहात असतात.

हें दिव्यांचें दृश्य अनेक मैलांवरून दिसतें. एखाद्या डोंगरावर लाललाल रानफुलें फुललेलीं दिसावीं तसे हें दृश्य दिसत होतें. वर आकाश जसें तारकांनीं फुललें होतें तसें खालचें अंधाराचें अवकाश ह्या दिव्यांनीं फुललें होतें. ग्रह-ताऱ्यांच्या उगवण्या-मावळण्यामुळे आकाश-दर्शन बदलतीं स्वरूपें धारण करतें त्याप्रमाणें आमची बोट जसजशी अंतर तोडीत होती तसें हें दीपदर्शनही बदलतीं स्वरूपें धारण करीत होतें. एक वेळ तर अशी आली कीं आमच्या भोवतीं दिव्यांचे एक प्रचंड वलयच निर्माण झालें आहे.

हें खरें युरोपचें अखेरचें दर्शन होतें. मुग्ध मनानें आणि भारावलेल्या डोळ्यांनीं मी तें दृश्य पाहात राहिलों आणि इकडे आमची बोट युरोपचें पाणी सोडून भूमध्यसमुद्रांत प्रवेश करीत होती. किती तरी वेळानें जाऊन मीं बिछान्यावर अंग टाकले !

* * *

त्यानंतर जी मला झोंप लागली ती नुसतीच गाढ नव्हती — त्यानंतर दोन-तीन दिवस मी सारखा झोंपतच होतों. भूमध्यसमुद्रांत भारतीय हवेचा अनुभव आल्यामुळें ही झोंप आली कीं काय नकळे ! पण अद्याप हवेंत थंडीची गोड शिरशिरी होती. दुपारीं डेकवर जाऊन उन्हांत वाचत बसण्याचें सुख अमाप होतें. उन्हांत हवें तितकें उबावें, हवे तितकें वाचावे, हवे तर सुखानें डोळे मिटावे. नाहींतर समुद्राचें विशाल दृश्य समोर आहेच !

चित्रकार समुद्राचा रंग रेखाटताना इतका गडद निळा रंग कां वापरतात हें मला भूमध्यसमुद्रांत समजलें. खोल पाण्यात समुद्र असाच दिसतो ! पण कांहीं चित्रकार किनाऱ्याशेजारच्या समुद्रालाच असा रंगवून ठेवतात !

पाणी दुभंगून जाणारी बोट आपल्या मार्गाची खूणरेषा मागें खूप लांबवर ठेवून जाते — आपल्यावर बोटीनें केलेल्या आघातामुळें संतापलेल्या समुद्राच्या भालप्रदेशावरची क्रोधरेषाच जणुं ! पण त्याच्यावर फेसाचीं फुलें पसरलेलीं असल्यानें ती सुंदर दिसते ! बोटीच्या धुराची रेषा मागें जात असते. तिची तरल सावली ह्या रेषेच्या आजुबाजूस नाचत असल्यामुळें तें दृश्य अधिकच मनोज्ञ दिसतें !

* * *

दहा अकरा वाजण्याच्या सुमारास आमची बोट अलेक्झांड्रिया बंदरांत शिरली आणि आम्ही ' आमच्या ' जगांत परत आलों अशी लगेच प्रतीति

आली. बंदरांत गलथानपणाचीं, गैरव्यवस्थेचीं आणि केरकचऱ्याचीं दृश्यें भरपूर होतीं ! धक्क्यावर कापसाचे गठ्ठे हवे तसे टाकलेले होते. लॉऱ्या आणि मोटरी एकमेकांशीं तऱ्हतऱ्हेचे वक्र कोन करून उभ्या होत्या. धक्क्यावर एक चहाकॉफीविक्या आपल्या चहाचा बंब खांद्याला अडकवून गिऱ्हाइकांचें लक्ष वेधण्यासाठीं कपबशीचा खडखडाट करीत होता. एक गावठी जादूगार आपल्या कलेचें दर्शन बोटीवरील उतारूंना घडवून खरेखुरे पैसे गोळे करण्याचा प्रयत्न करीत होता. आपली कला दाखवितांना निरनिराळ्या भाषांचे जे मिश्रण-प्रयोग तो करीत होता त्यांतही जादू होती ! पण मिळणाऱ्या पैशावर मात्र त्याची जादू चालत नसावी ! कारण ब्रिटिश नाणीं घेण्यास त्यानें सक्त नकार दिला ! बाकी फ्रेंच, इटालिअन, भारतीय हवे तें नाणें स्वीकारण्यास त्याची तयारी होती. ईजिप्तमध्यें तेव्हां उसळलेल्या ब्रिटिश–विरोधाचा हा पहिला अनुभव !

धक्क्यावर उभ्या केलेल्या वेड्यावाकड्या मोटरी पाहून बोटीवरचा माझा एक स्विस मित्र मला म्हणाला,

" Why don't they keep the cars in a row ?" ( हे लोक मोटरी एका रांगेंत कां उभ्या करीत नाहींत ? )

मी उत्तरलों, " This is your introduction to the East. " ( ही तुम्हांला पूर्वेची तोंडओळख होत आहे ! )

* * *

पण पूर्वेच्या नव्या मनःस्थितीचीही ओळख होत होती. आमच्या बोटीवर ब्रिटिश उतारू फारसे कोणी नव्हतेच. पण युरोपिअन उतारूंना सुद्धा शहरांत जरा जपून वागा अशा सूचना देण्यांत येत होत्या. आम्ही भारतीय मात्र जोरांत होतों. इतिहासांत अनेक वर्षांनीं आमच्यापेक्षां युरोपिअन लोक कमी असें दृश्य दिसूं लागण्याच्या कालांत आम्ही वावरत होतों. बोटीवर आलेले इजिप्शिअन पोलीस भारतीय उतारूंशीं विशेष स्नेहानें आणि सलोख्यानें हसून खेळून हस्तांदोलन करीत होते. आमची छाती अभिमानानें फुगून गेली. " तुम्ही आमच्याबरोबर चला म्हणजे तुम्हांला कांहीं भीति नाहीं " असें युरोपिअन उतारूंना आम्हीं दिमाखानें सांगितलें !

* * *

शहरांत जातांनाच इमारतींच्या भिंतींवर "You dirty British! Get out." अशा घोषणा रंगविलेल्या दिसल्या. आम्ही थॉमस कुक् कंपनीसमोर उतरून शहर पाहण्याचें भाडें ठरविण्यासाठीं आंत शिरूं लागलों तेव्हां रस्त्यावरच्या एकदोन इजिप्शिअन इसमांनीं आमच्याकडे कुत्सित क्रुद्ध नजरेनें पाहिलेंच! पण कुकच्या कचेरींतले सर्व नोकर इजिप्शिअनच होते!

आम्ही प्रत्येकीं तीन इजिप्शिअन पौंड आकार ठरवून शहरदर्शनास निघालों.

प्रथम आम्ही शहराबाहेरच्या प्रचंड उद्यानांत गेलो. जातांना एका मोठ्या रस्त्यावर मातबरांचे बंगले दिसले. हे जुनाट पद्धतीचे होते आणि समोरच्या दालनावर जाळीचे पडदे टाकलेले होते. पण त्या उजाड प्रदेशांत प्रत्येक बंगल्यासमोर छोटीशी बाग करण्याची आणि बैठ्या बंगल्यावर एकादी रमणीय वेल सोडून देण्याची दक्षता पाहून आनंद वाटला. तें उद्यानही फुलझाडांनीं आणि फुलवेलींनीं समृद्ध होतें. तेथे एक वडाचें झाड दिसलें—आणि माझें अंतःकरण आनंदानें महिरून निघालें. कित्येक दिवसांनीं हिंवाळ्यांत पानें न झडलेलीं झाडें मला दिसत होतीं! त्यांतच हें वडाचे झाड! वटवृक्ष हा खरा भारतीय वृक्ष आहे ह्याचा साक्षात्कार मला तेव्हां झाला.

त्या बागेशेजारींच एका ग्रीक कापूस व्यापाऱ्याचा वैभवशाली बंगला आहे! मात्र वैभव भव्यतेंतच असतें असा गैरसमज तेथें दिसला नाहीं. बंगला आटपशीरच होता. आतां त्या बंगल्यांत कोणी राहत नाहीं. पण फर्निचरचा सारा शृंगार तेथें होता. मुख्य म्हणजे कांहीं फ्रेंच चित्रकारांचीं कांहीं चित्रें तेथें होतीं. ओबडधोबड आकार आणि भडक रंग ह्यांतूनही सौंदर्य निर्माण करतां येतें ह्याची प्रतीति तीं पाहून आली.

बंगल्यांत काम करणारा नोकर हळूच माझ्याकडे आला आणि म्हणाला, "Indian? India good!" त्याच्या नजरेंत बक्षिसाची आशा नव्हती!

* * *

तेथून आम्ही पॅापेचा स्तंभ पाहण्यास निघालों. बागेच्या बाहेर मोकळ्या जागेंत केळीच्या बागा लावलेल्या दिसल्या! वडानंतर केळ! आनंदाच्या अधिक लहरी उठूं लागल्या. आमच्याबरोबर पाकिस्तानमध्यें जाणारा स्वित्झर्लंडचा वकील होता. त्याची बायको केळींच्या दर्शनानें वेडावून गेली. तिला केळीं फार आवडत. "पाकिस्तानांत केळीं मिळतील का हो?" तिनें विचारलें. मीं म्हटलें, "हवीं तेवढीं! आम्हीच त्यांना घडच्या घड पाठवितों."

जरा वेळानें शीवमाटुंग्याकडे दिसतात तसे दोनदोन तीनतीन खोल्यांच्या फ्लॅट्सचे आधुनिक बंगले दिसूं लागले. मला भारताच्या आठवणींची हुरहूर अधिकच जाणवूं लागली!

★ ★ ★

पॉपेचा स्तंभ एका उंच ठिकाणीं वर आहे. तो पाहून मला फारसें कांहीं वाटलें नाहीं. पण पलीकडेच 'स्पिंक्स'चा पुतळा होता, त्याची थोडीशी मोडतोड झालेली असूनही, सिंहाचे शरीर आणि स्त्रीचे तोंड अशी ती मूर्ति पाहून मला गंमत वाटली. तेथें अनेक पुतळ्यांची मोडतोडच झालेली आहे. 'ॲलाबास्टर'च्या दगडाचे गुलाबी तुकडे इकडे तिकडे पडलेले होते, त्यांतला एकेक आठवण म्हणून उचलून आम्ही परत आलों.

★ ★ ★

स्तंभ पाहून झाल्यावर आम्ही समुद्रकाठानें कॉंक्रिटच्या रस्त्यानें परत येण्यास निघालों. सुमारें तीन मैल हा रस्ता समुद्राच्या कांठाकांठानें जातो. अलेक्झांड्रियाचा हा फॅशनबेल फिरण्याचा रस्ता आहे. त्याच्या धक्क्यावर समुद्र धडाका देत असतो. मधूनमधून मुद्दाम समुद्रांत आडवे बांधलेले धक्के आहेत. पोहण्याचे क्लब आहेत. डाव्या बाजूला मोकळीं मैदाने व बंगले आहेत. पण त्या रस्त्यानें भरधांव मोटरींतून जातांना सुद्धां मला मुंबईच्या अगर नेपल्सच्या मरीन ड्राइव्हचें स्मरण झालें नाहीं. कारण आजुबाजूचा उजाडपणा!

मध्येंच एका आडव्या रस्त्यानें आम्हीं समुद्रकांठ सोडला आणि शहरांत शिरलों—आणि एका खिश्चन स्मशानांत गेलों! हें स्मशान म्हणजे एक रुंद खोल विहीर! रोमन साम्राज्यांत खिश्चन लोकांचा छळ होत असे, तेव्हां प्रेतांची गुपचूप विल्हेवाट लावण्यासाठीं ही विहीर खोदली होती. तेथें निरनिराळीं दालनें पाडून तेथें प्रेतांच्या पेट्या ठेवण्यांत येत असत! आतां नुसतीं मोकळीं दालनें आहेत! वाटोळ्या जिन्यानें तळापर्यंत जावें लागतें. तळाशीं विहीर वाटोळी बांधलेली आहे. विहीरींत पाणी आहे—आणि सभोंवार हीं दालनें! येथें आल्यावर यमपुरी कशी असेल ह्याची किंचित् (अर्थात् अगदीं किंचित्) कल्पना आली! प्रेतें तेथें आणून ठेवीत तेव्हां अर्थात् साक्षात् यमपुरीच निर्माण होत असावी!

★ ★ ★

परत येतांना पाण्याचीं डबकीं सांचलीं आहेत, कचरा पडला आहे, त्यांत मळकट कपडे घातलेलीं पोरें खेळत आहेत, शेजारीं खजुराचीं, कबाबाचीं दुकानें आहेत. त्यांच्यावर माशा घोंघावताहेत, पण त्यांतच कडेला खाटा टाकून लोक खुशाल पाव-परोठे खात आहेत, चहा पीत आहेत, असें दिसलें– आणि हिंदुस्थानची खोल खोल आठवण झाली !

## : ३२ :

आमची व्हिवाल्डी बोट अर्धी मालवाहू होती. पण विलायतच्या बोटी म्हणजे प्रथम दर्जाचीं हॉटेलें हें वर्णन तिलाही लागूं पडत होतें. खाण्यापिण्याची चैन होती–ऐषआरामाची खैरात होती.

* * *

जिनोआहून बोट सुटली त्या दिवशींच सकाळीं स्मोकिंग रूममध्यें एक भुऱ्या रंगाचा पोरगेलासा अमेरिकन विद्यार्थी एका जपानी बाईशीं मोठ्या सलगीनें गप्पा मारतांना दिसला. मी तेथे गेल्यावर त्याने मला 'हल्लो' करून गप्पा मारण्यास पाचारण केले. त्या जपानी स्त्रीनेही आपले बारीक डोळे अधिक आकुंचित करून आणि अपल्या जिवणीभोवतीं उथळ हास्याची रेषा मुरडून त्याला साथ दिली.

आपण कलकत्त्याचे आहोंत अशी माहिती त्यानें दिली. पण गेलीं ८ वर्षें तो अमेरिकेंत शिकत होता. आईबाप कलकत्त्याला व्यापार करीत होते. जिनोआला तो बोटीनें आला होता आणि येतांना आपण नुसता उनाडटप्पूपणा केला असें त्यानें थोडेंसें अभिमानानें सांगितलें. पण उरलेल्या प्रवासांत आपण एक कादंबरी लिहून काढणार असें तो म्हणाला आणि त्या जपानी स्त्रीकडे त्यानें एक लाघवी नजर टाकली.

आणि मग तो माझ्याशीं अमेरिकन वाङ्मयाबद्दल आणि भाषाशैलीबद्दल बोलूं लागला. मी जेव्हां त्याला इंग्रजी भाषेच्या अमेरिकन पुनर्जन्माबद्दल प्रश्न विचारले–आणि ट्रूमन कॅपोटेच्या लिखाणाचा उल्लेख केला तेव्हां त्यानें विषय बदलणेंच पसंत केलें.

त्याचे उच्चार अमेरिकन होते. पण आपल्या भारतवासीयत्वाचा अभिमान दाखविण्यांत त्याला फार आनंद होत होता. मधूनच तो एखादा हिंदी शब्द झोंकून देत होता.

स्टँडर्ड केमिकलचे संस्थापक डॉ. घोष आणि त्यांची रशियन पत्नी हे माझे भोजन-सहकारी ( टेबल-कंपॅनिअन ) होते. त्यांचे असे मत पडले, कीं हा अमेरिकन नसून अँग्लो-इंडियन असावा. तो असो वा नसो, तसा तो दिसत होता ह्यांत शंका नाहीं.

★ ★ ★

त्यानंतर त्या ' कादंबरी 'काराच्या आणि माझ्या कधीं गप्पा झाल्या नाहींत. तो कादंबरीलेखनांत रमून गेला होता असेही दिसलें नाहीं.

पण तो कादंबरीलेखनासाठीं बहुमोल अनुभव गोळा करीत होता ह्यांत शंका नाहीं.

एक दिवस रात्रीं मी डेकवर गेलो, तेव्हां कॅप्टनच्या केबिनच्या शेजारीं काळोखांत हा ' अमेरिकन कादंबरीकार ' एका तरुण मुलीला अगदीं जवळ घेऊन तिला जीवनाची ऊब देत असतांना मला दिसला.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं चहा प्यायला मी वर गेलों तों तेथे ती जपानी स्त्री डोक्याला एक पांढरें फडकें करकचून आवळून कसल्यातरी पुड्या घेतांना दिसली. मीं विचारलें तेव्हां, ' डोकं दुखतं ' एवढेंच तिनें मला त्रासिक मुद्रेनें सांगितलें.

★ ★ ★

ती मुलगी म्हणजे एका डॅनिश कौंटची मुलगी होती. त्यांचा एक गटच बनला. त्यांत थोडेसे इंदूरचे महाराज यशवंतराव होळकर, त्यांची अमेरिकन पत्नी, आमच्या पॅरिसच्या वकिलातीचा एक चिटणीस, वगैरे मंडळी दिसत.

ती जपानी स्त्री आणि तिचा इंग्रज नवरा हीं त्या वर्तुळाच्या परिघावर असत.

एक दिवस माझा स्विस मित्र मला सांगूं लागला —

" तुम्हांला कळलं का ? "

मीं म्हटलें, " काय ? "

" त्या डॅनिश कौंटनें आपल्या दोस्तांना आज एक ' कॉक्टेल पार्टी ' दिली. पण तिला त्या जपानी बाईला आणि तिच्या नवऱ्याला निमंत्रण नव्हतें—ह्या पार्टीची सारी व्यवस्था त्यानें केली होती बरें ! "

मी म्हटलें,

"No wonder—Our Danish friend is a farmer. As John Gunther said about our Vallabhbhai Patel, his only culture is agriculture."

माझा मित्र मनमुराद हसला.

* * *

त्या स्विस मित्राची व माझी ओळख कशी झाली समजत नाहीं. त्याचें नांव सँडो. स्वित्झर्लंडच्या हॉंगकॉंग येथील कॉन्सलेटमध्यें त्याची चिटणीस म्हणून नेमणूक झाली होती.

एक दिवस ह्या गृहस्थाचा घसा पार बसला—आणि सपाटून दुखूंही लागला. त्यानें आपल्या बिछान्यांत बरीचशी डी. डी. टी. पावडर टाकली होती आणि तीच त्याला बाधली होती.

डॉ. घोष मला म्हणाले, "ज्या पावडरमुळें मुंग्या, ढेकूण मरतात ती आपल्याला सुद्धां इजा करण्याचा संभव आहे हें ह्याच्या ध्यानांत नको होतं का यायला?"

ह्यानेंच अलेक्झांड्रियांतल्या बंदरांत मोटरी वेड्यावांकड्या उभ्या असलेल्या पाहून मला म्हटलें होतें,

"Why don't they keep the cars in a row?"

* * *

आमच्याबरोबर एक स्विस प्राध्यापक आणि त्याची जर्नालिस्ट बायको होती. प्राध्यापकमजकूर कलाशास्त्राचे तज्ज्ञ होते आणि सहा महिन्यांची रजा घेऊन भारतीय कलेचा अभ्यास करायला निघाले होते. त्यांचें अंड्यासारखें डोकेंच माझ्या अधिक लक्षांत राहिलें आहे.

त्यांच्या पत्नीचे बटबटित डोळे सारखे हसत असत. तिला इंग्रजी फारसें येत नव्हतें. ती मला म्हणायची,

"You are a clever man."

प्रथम प्रथम खुशालल्यासारखें वाटायचें. पण माझ्या लवकरच ध्यानांत आलें कीं clever (हुशार) हा शब्द ती intellectual (बुद्धिजीवी) ह्या अर्थानें वापरीत होती!

आम्हांला कॅप्टननें जें भोजन दिलें (त्याला 'कॅप्टन्स डिनर' म्हणतात) त्या वेळीं तिनें डॉ. घोषच्या रशियन बायकोकडून घेतलेली भारतीय साडी पेहनली होती—भारतीय साडीची इतकी केंविलवाणी अवस्था मीं पूर्वी कधींच पाहिली नव्हती !

* * *

आमच्या वर्तुळाच्या परिघावर असलेले कांहीं गृहस्थ होतेच. त्यांत स्वित्झर्लंडचा कराचीला चाललेला वकील होता.

तो एका राष्ट्राचा वकील होता. त्याची पत्नी वृद्ध होती आणि तिला कांपरें भरलेले असे, आणि तरी त्यांच्याबरोबर सेक्रेटरी, नोकर वगैरे कोणी नव्हता. त्यांच्याबरोबर एक कुत्रा होता, त्याची सारी निगा वकील आणि वकिलीणबाईच ठेवीत.

त्या मानानें आमच्या पॅरिसच्या वकिलातींतले जे चिटणीसमहाशय होते ते आपल्या देशाच्या इभ्रतीला अधिक जपत होते ! त्यांच्यापाशीं एक नोकर आणि नोकराणी होती—आणि हे वैभव इतरांच्या लक्षांत येईल अशा बेतानें ते त्यांना वागवीत होते !

एक दिवस सकाळीं मी वरच्या दिवाणखान्यांत ( स्मोकिंग रूममध्यें ) गेलों तों एका कोपऱ्यातल्या टेबलापाशीं एक गृहस्थ भलें थोरले पॅड पसरून कांहीं तरी घाईघाईनें लिहीत असताना दिसला. मीं बोटीवर बरेंच लिखाण करायचें ठरविलें होतें—आणि एक पानही लिहून होत नव्हते, म्हणून मला त्याचें आश्चर्य वाटलें आणि हेवाही वाटला.

त्याच दिवशीं दुपारीं चहा पितांना सॅंडोने त्याची माझ्यापाशीं ओळख करून दिली—त्याची म्हणजे तिची. कारण तो गृहस्थ नव्हता तर स्त्री होती. दुरून तो मला गृहस्थ दिसला, ह्यांत केवळ माझा दृष्टिभ्रम नव्हता एवढें मात्र ध्यानांत घेतले पाहिजे. तिचा आवाज सुद्धां पुरुषी होता.

हीच ती युगोस्लाव्ह चित्रकर्त्री, वेरा निकोलिच.

* * *

एक दिवस ती माझ्याकडे आली आणि म्हणाली,

"Will you give me a sitting ? I want to sketch you. "

त्या पंधरा दिवसांत तिनें माझीं पांच-सहा स्केचेस केलीं. शेवटीं तिला एकानें विचारलें कीं एकाच व्यक्तीचीं इतकी स्केचेस तूं कां करतेस ?

ती म्हणाली, " You see, he has a good forehead!"

पण तिने जीं स्केचेस केलीं त्यांच्यावरून कांहीं माझ्या डोक्याच्या ह्या विशेषाचा मला प्रत्यय आला नाहीं आणि तिच्या चित्रकलेतील कौशल्याचाही आला नाहीं.

तिने मला आपल्या तैलचित्रांचे कांहीं फोटो दाखविले. एका निसर्गचित्राच्या फोटोंत मला कांहीं प्राण्यांच्या आकृत्या दिसल्या. मी तिला नवकलेबद्दल धन्यवाद देऊं लागलों—पण ती गोंधळूनच गेली. तोपर्यंत त्या आकृत्यांची तिला जाणीवच नव्हती !

* * *

सॅडोनें एक दिवस तिचा बॅरोनेस असा उल्लेख केला आणि मला कळलें कीं ती सरदार घराण्यातली आहे. माझे कुतूहल जरा वाढले. युगोस्लाव्हिआ-बद्दल कांहीं विशेष माहिती हिच्याकडून मिळविता येईल अशी आशा वाटली—आणि ती सार्थ टरली.

ती मोठी धर्मनिष्ठ ख्रिश्चन होती. दर रविवारी बोटीवर 'मास' साजरा होई, तेव्हां ती त्या सामुदायिक प्रार्थनेत नुसती सामील होई एवढेच नव्हे, तर स्वतःला विसरून जाई. तिच्या धर्मभोळ्या चेहेऱ्यांत ख्रिस्त संचारला आहे असें वाटे.

बाई मोठी गंमती होती आणि बोलकीही होती. बोटीवरील फ्रेंच, जर्मन, इटालिअन व इंग्रज लोकांशीं ती ह्या साऱ्या भाषांत मोठमोठ्या आवाजांत गप्पा मारतांना नेहमीं आढळत असे. तिला ह्या साऱ्या भाषा चांगल्या बोलतां येत.

एक दिवस सकाळीं तिनें आम्हांला फ्रेंच, जर्मन, इटालिअन आणि इंग्रज प्रेमिक आपल्या प्रियेशीं प्रेमालाप कसे करतात, ह्याची साभिनय नक्कल करून दाखविली. तेव्हांपासून बोटीवर ह्या नकलेचे निदान पांचसहा प्रयोग झाले-प्रत्येक वेळीं ती स्वतः प्रेमिक बने आणि कोणाला तरी प्रिया म्हणून निवडी. ती स्वतः प्रेमिक बनल्यानें कोणातरी पुरुषावर प्रिया बनण्याची आपत्ति ओढवे !

ती पुरुषासारखी दिसे ती मात्र नक्कल नव्हती !

* * *

खरें म्हणजे बोटीवरचें जग हे स्वतंत्र जगच असते. जगात ज्याप्रमाणें अनेक लोक एकत्र येतात, राग-लोभद्वेष-प्रेमाचे खेळ मांडतात, आणि एक दिवस पट उधळून चालूं लागतात, तसेच थोडेसे येथें होते. बोटीवरच्या जगांत

नवे स्नेहसंबंध, नवीं प्रेमप्रकरणें, नवे खेळकंपू निर्माण होतात – पण एका अर्थानें हें जग अधिक तत्त्वज्ञानी असतें. बोटीवर वावरतांना मला ' अतिथि आणि राजा ' ह्या गोष्टीची नेहमीं आठवण होत असे. जगांत आसक्ति न धरतां जगावे अशी ज्ञानी ऋषींची शिकवण असते. प्रत्यक्ष जीवनांत ती आपण पाळूं शकत नाहीं, पण बोटीवर पाळतां येते. कारण ठराविक दिवसांनीं आपण एकमेकांचा निरोप घेणार आणि पुनः बहुधा भेटणार नाहीं ह्याची जाणीव असते. म्हणून सारे संबंध निरासक्त वृत्तीनेंच आपण जडवून घेतों. शेवटीं निरोप घेतांना, हे संबंध तोडतांना, फारसें वाईटही वाटत नाहीं, कारण त्या मर्यादित जगांत तेच तेच जीवन जगून आणि तेच तेच चेहरे पाहून आपण इतके कंटाळून गेलेले असतो कीं केव्हां एकदां ह्यांतून बाहेर पडतों असें होऊन गेलेलें असते.

## : ३३ :

आमची बोट पोर्ट सैदला थांबणार होती, पण आम्हांला बंदरावर उतरण्याची मात्र परवानगी नव्हती. सुएझ कॅनालच्या विभागांत गडबड होती, इजिप्शिअन राष्ट्रवादी आणि ब्रिटिश सैनिक ह्यांच्या चकमकी उडत होत्या, आणि अर्थात् पोर्ट सैदला काय अगर सुएझला काय, किनाऱ्यावर पाय ठेवण्याची कल्पना आम्हांला सोडून द्यावी लागली होती.

हें आमचें मोठें नुकसान होतें. नेहमींची पद्धति अशी कीं पोर्ट सैदला (किंवा युरोपला जातांना सुएझला) उतरायचें, मोटरनें कायरोला जायचें, कायरोचे सुंदर शोभिवंत शहर नजरेखालून घालायचें, तेथून पंधरा मैलांवर जाऊन जगद्विख्यात पिरॅमिड्स डोळे भरून पाहायचे आणि मोटरनें सुएझला (अगर पोर्ट सैदला) यायचें. पण आम्हांला ती अशक्य झाली. अलेक्झांड्रिया आमच्या वेळापत्रकांत नसूनही बोट तेथें थांबली. तेव्हां कायरो चुकल्याची थोडीशी भरपाई झाली, अशी आम्ही मनाची समजूत घालून घेतली ! पण पिरॅमिड्सचें काय? पिरॅमिड्स जितके कल्पनेनें सुंदर वाटतात तितके प्रत्यक्ष वाटत नाहींत, हा काणेकरांचा अभिप्राय आठवला आणि समाधान मानून घेतलें.

( पण एक आठवण ह्या समाधानावर आपली छाया पाडीत होती. मी धनंजयराव गाडगीळांच्या हाताखालीं शिकत होतों, तेव्हां त्यांनीं मला एक पुस्तक वाचण्याची शिफारस केली, आणि तें रद्दी आहे असें लगेच म्हटलें, तेव्हां मी म्हणालों, ‘ मग मला वाचायला कां सांगतां ? ’ ‘ पण तें रद्दी आहे हें तुमचं तुम्हीं वाचून ठरविलं पाहिजे, ’ धनंजयराव उत्तरले. )

* * *

सुएझ कालव्यांतून मनाला वाटेल तेव्हां जातां येत नाहीं. ठराविक वेळीं गटागटानें निघावें लागतें. ह्याचा त्या विभागांतील गडबडीशीं कांहीं संबंध नाहीं. कालवा अरुंद आहे. एकाच वेळीं बोटींना जातां येतां येत नाहीं. सुएझच्या बोटी पोर्ट सैदला आल्या कीं पोर्ट सैदच्या सुएझला जाण्यासाठीं निघतात. म्हणजे बोटींचा एक काफिलाच जावयास निघतो.

तसाच आमचा निघाला. आमच्या खेरीज साऱ्या बोटी मालवाहूच होत्या – आणि आमची अर्धी मालवाहू ! मधुनमधून तेलवाहू टॅंकर्स दिसत होते. पोर्ट सैद सोडल्यापासून कराचीला पोचेपर्यंत आम्हांला मालवाहू आणि तेलवाहू बोटीच चिक्कार भेटल्या. तेलवाहू बोट पाहिली कीं इराणी तेलप्रकरण आठवे, आणि ही बोट ॲंग्लो–इराणिअन कंपनीची असेल का, ही इराणचे तेल आणण्यास ( अगर घेऊन ) निघाली असेल का, असे विचार मनात येत.

आणि मग जिनोआच्या हॉटेलमध्यें मला भेटलेली स्विस मुलगी आठवे. ही आबादानला निघाली होती. तिचे एका इराणी इंजिनिअरशीं लग्न ठरले होते. दिसायला इतकी साधी ( साधी म्हणजे साधरण ! स्विस मुली बहुतेक अशाच ! ) पण चेहेऱ्यावर असा आनंद खेळविणारी मुलगी मीं तोंपर्यंत पाहिलेली नव्हती. ती आबादानला एका मालवाहू बोटीनें निघाली होती. मीं विचारलें “ तुला पोचायला किती दिवस लागतील ? ” “ कुणीं सांगावें ? ” ती उत्तरली, “ लागतील पांचसहा आठवडे. ” “ मग तुझा वेळ कसा जाणार ? ” “ कां ? ” ती मान मुरडून म्हणाली, “ माझ्यापाशीं स्वप्नं खूप आहेत. ”

नजरेवर स्वप्नांचीं फुलपांखरें खेळविणारी कोणतीही स्त्री सुंदर दिसते हेंच खरें – मी मनाशीं म्हणालों.

कालवा दोनही बाजूंस दगडांनीं पक्का बांधलेला आहे. अलेक्झांड्रियामध्यें फ्रेंच संस्कृतीच्या परिणामाचा अनुभव आलाच होता, येथे कालव्याकांठीं मैलांच्या खुणांऐवजीं किलोमीटर्सच्या खुणा पाहिल्या – आणि हा परिणाम

आठवला—व लगेच ध्यानांत आलें कीं आज ह्या कालव्यावर ब्रिटिशांच्या बागनेटांचें प्रभुत्व असलें तरी मुळांत तो फ्रेंचांनीं बांधलेला होता.

* * *

आजुबाजूचा सारा प्रदेश वालुकामय आहे. कालव्याच्या बाजूनें जाणाऱ्या रस्त्याच्या कांठाने मधुनमधून एखादें खेडें अगर पोलिसी ठाणें लागलें कीं तेथें दोनचार घरें आणि आजुबाजूला खजुरीच्या आणि इतर झाडांची हिरवळ आढळे. त्यांचा थंडावा बोटींत येतोसा वाटे !

पोर्ट सैद सोडल्यावर डावीकडे लगेच वाळूच्या टेकड्या वगैरे दिसत होत्या, पण उजवीकडे, बराच वेळ, वाळूच्या प्रदेशापलीकडे समुद्राच्या पाण्याचे निळसर पट्टे दिसत होते. तें समुद्राचे उथळ आखात होतें.

सुएझचा कालवा दोन सरोवरांमधून जातो. एका सरोवराच्या कांठीं इस्मैलिया हें शहर आहे. त्या शहरांतली गर्द झाडी पाहिली आणि आश्चर्य वाटले. त्या झाडींतून मशिदीचा घुमट आणि कांहीं बंगल्यांचीं छपरें दिसत होतीं. बंदरावरच्या धक्क्यावरच्या मोटरींचे वगैरे जें दूरदर्शन घडलें त्यावरून हे शहर चांगलें समृद्ध असावे अशी कल्पना झाली.

तसे सुएझबद्दल वाटलें नाहीं. पण सुएझ बंदर गांवापासून बरेंच दूर असावें. आमची बोट बंदरापासून खूपच दूर उभी राहिली होती, त्यामुळें ही अंतराची जाणीव अधिकच दाटली.

* * *

बोट सुएझमध्ये शिरते तेव्हांच ती लाल समुद्रांतही शिरते.

ह्या समुद्राला लाल समुद्र कां म्हणतात ते मात्र मला माहीत नाहीं. ऐकलें होते कीं आजुबाजूच्या वाळवंटावर वादळें उसळलीं कीं लाल लाल वाळू समुद्रावर येते आणि पाण्यावर पसरते—आणि मग सारें पाणी लालट दिसते, म्हणून त्याला लाल समुद्र म्हणतात.

पण आमची बोट एका बाजूनें किनारा दृष्टिपथांत राखूनच चालली होती, तरी आम्हांला कांहीं लाल पाणी कोठें दिसलें नाहीं. बहुतेक वेळां पाणी काळें-निळें अगर नारिंगी—हिरवेंच दिसत असे. एकदां दुपारींच काय तें भूमध्य-समुद्राच्यासारखें निळें निळें दिसलें.

कदाचित् त्या वेळीं वादळ उसळलेंच नसेल.

शक्य आहे—कारण लाल समुद्रांत आमची बोट केव्हां बिथरलीच नाहीं. लाल समुद्रांत बोट हलली नाहीं आणि उतारूंना लागली नाहीं असें सहसा कधीं होत नाहीं. ह्यांतच उकाड्यानें जीव जातो. वातावरण नुसतें शिजत असतें.

पण आम्ही डिसेंबरांत येत होतों. डिसेंबरमध्यें हवा कृपा करते.

मध्यंतरीं दोन दिवस वारा जबरदस्त सुटला होता.. अगदीं तोंडासमोर वाहत होता. बोट थोडी हालूं लागली—पण आडवी न हालतां उभी हालत होती, त्यामुळें हालण्याचें प्रमाण कमी भासलें. बोटीवर अजस्त्र लाटा मात्र घडाका देत होत्या. एक प्रचंड लाट येई, बोटीवर फुटे, फेंसाळे आणि मागें परते, इतक्यांत दुसरी लाट येऊन तिच्यासकट बोटीवर आदळे ! त्यामुळें बाजूच्या पाण्यांत दऱ्या, खोरीं, शिखरेंच जणुं निर्माण होत आणि पाण्याला डोंगराळ कळा प्राप्त होई !

समुद्राच्या पाण्याचा हा मस्त कारभार चालू असतांना पाण्यांत किती सामर्थ्य असतें ह्याची तत्काळ प्रतीति येई !

पण बोट बेसुमार हालत नव्हती, आणि वेगाचा वारा वाहत असल्यामुळें उकाडाही भासला नाहीं.

* * *

काय चमत्कार झाला नकळे, पण दुसऱ्या दिवशीं सकाळीं डेकवर आलों तर समुद्र अगदीं शांत, स्तब्ध झालेला दिसला. पाणी इतकें सौम्य, प्रसन्न भासत होतें ! त्याच्यावर विलोल तरंग तेवढे उठत. मधूनच एखाद्या माशानें वर तोंड काढलें म्हणजे वलय उमटे. एखाद्या महापुरुषाच्या तोंडावर विमल हास्य पसरावें तसें !

त्या एकाच दिवशीं आम्हांला फ्लाइंग फिश ( उडता मासा ) पाहायला मिळाला आणि डॉल्फिन् मासाही पाहायला मिळाला.

डॉल्फिन् हा मोठा प्रमत्त मासा आहे. बोटीच्या आगमनानें त्याच्या विश्वांत खळबळ उडते, तो बिथरतो, बोटीवर संतत हल्ला करतो—आणि बिचारा मरून पडतो.

बोटीच्यामागें जी खूणरेषा राहते त्याच्या आसपास त्याचें अगतिक प्रेत तरंगतांना दिसतें.

* * *

सूर्य मावळण्याच्या जरा अगोदर आमची बोट एडन बंदरांत शिरली.

खडकाळ डोंगराच्या कुशींत वसलेलें हें शहर रुक्ष भकास दिसतें. तरीपण तेथल्या लोकांनीं तेथें एक मोठी बाग केलेली दिसली, आणि रात्रीच्या अर्धप्रकाशांत अर्धअंधारांत सुद्धा ती बरीच सतेज, समृद्ध दिसली.

डोंगरापलीकडे सॉलोमनचें तळें आहे, पण तें पाहण्यास वेळ नव्हता.

मेनरोडवरील दुकानांच्या दर्शनी रांगेमागें हिंदी बाजार आहे. तेथे आल्यावर एखाद्या परदेशी मुस्लीम मोहल्लयांत आल्यासारखें वाटलें. फळें, भाज्या रस्त्यावर मांडून विकणारे फेरीवाले, घासलेटचे दिवे जाळीत बसलेले दिसले.

* * *

एडन सोडल्यावर बोट अरबी समुद्रांत शिरते आणि खरोखर घराच्या परड्यांत आल्यासारखें वाटते. पण बोट उत्तरेकडे चालू होती. डाव्या बाजूला वाळूच्या टेकड्या दिसत होत्या. इराणी आखाताची आठवण झाली आणि येथे समुद्राच्या तळाशीं मोत्ये असतील असा विचार आला. इतक्या रुक्ष प्रदेशाला निसर्गानें हें केवढें वैभव बहाल केलें आहे! ह्या प्रदेशांतले अनेक लोक मोत्यें काढण्याचा उद्योग करतात. म्हणून अर्थात् त्यांचे आयुष्य दाणेदार असेल असें नाहीं.

* * *

कराचीला पोचण्याच्या आदल्या रात्रीं कॅप्टनने सर्व उतारूंना भोजन दिलें.

हें भोजन म्हणजे ख्रिस्मसमधील एखादा समारंभ असावा असे वाटलें. (ख्रिस्मस अद्याप थोडा दूर होता.) भोजनाच्या दालनांत फुग्यांच्या पताका लावलेल्या होत्या. प्रत्येकाला विचित्र पोषाखांच्या चढाओढींत शोभेल अशी कागदी हॅट घालण्यास दिलेली होती आणि एक ग्रामोफोनच्या स्प्रिंगप्रमाणें गुंडाळलेला आणि तोंडानें फुगविल्यावर उघडणारा फुगा देण्यांत आला होता आणि तो एकमेकांनीं एकमेकांवर लहान मुलांप्रमाणें उडवायचा होता.

थोडक्यांत म्हणजे फॅन्सी ड्रेस कॉपिटीशनप्रमाणें हें फॅन्सी ड्रेस डिनर होतें.

आणि ड्रेसचा प्रश्न कांहीं जणांना फारच महत्त्वाचा वाटत होता.

आमच्याबरोबर औषधी कारखान्याचा एक ब्रिटिश डिरेक्टर होता. त्याला पाहिल्याबरोबरच मला संताप येत असे! तो ब्लिंपचा अवतारच वाटे.

तो डिनरचा काळा पोषाख अगदीं बिनचूक चढवून आला होता.

पण इतर कोणीही भोजनाचा खास पोषाख घातला नव्हता. अर्थात् होळकरचे महाराज अपवाद!

नेपाळला तज्ज्ञ म्हणून निघालेल्या एका स्विस इंजिनिअरला मीं म्हटलें, “आम्ही हिंदुस्थानांत ह्या भोजन-पोषाखाची भानगड पार काढून टाकली आहे.”

तो म्हणाला,

“I congratulate you. Dinner dress is a stupid custom.”

* * *

कराचीला उतरून पाकिस्तानची राजधानी पाहण्याची इच्छा होती. पण भारतीय नागरिकाना खालीं उतरण्यास पाक पोलिसांनीं मनाई केली.

ह्याबद्दल मला मुळींच दुःख झालें नाहीं. थोडासा अभिमानच वाटला. दुःख झाले तें ह्या गोष्टीचे कीं आमच्या कमिशनरच्या ऑफिसमधला एक अधिकारी त्या वेळीं बोटीवर आलेला असून सुद्धां त्यानें, आपल्या स्वदेश-बांधवांच्या ह्या मानहानीबद्दल चक्क बेफिकिरी दर्शविली.

एका उतारूने त्याला ह्याबद्दल सुनावल्यावर थोडासा परिणाम झाला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं खालीं उतरण्यास भारतीयाना परवानगी मिळाली.

पण मी ह्या साऱ्या प्रकारानें इतका उद्विग्न होऊन गेलों होतों कीं बंदरावर उतरावे असें मला वाटलेंच नाहीं !

* * *

पाक पोलिसांनीं केवळ भारतीय नागरिकांचाच उपमर्द केला असें नव्हे. युरोपिअन उतारूंचा तसाच केला.

त्या जपानी बाईचा ब्रिटिश नवरा मजपाशीं पाकपोलिसांच्या मग्रूर वर्तनाबद्दल तक्रार करूं लागला तेव्हां मीं म्हटले,

“Still in the quarrel between India and Pakistan you side with Pakistan ! Why should I not say that it serves you right ?”

* * *

कराचीहून मुंबईला यायला ३६ तास लागणार होते. त्या हिशेबाने आमची बोट सहा वाजतां मुंबई बंदरांत शिरणार होती.

मातृभूमीची ओढ काय असते, हे ह्या ३६ तासांत मला समजलें. माझ्या डोळ्यांपुढें सारखें मुंबई बंदर दिसत होतें आणि हात सामान आवरीत होते.

सेठना नांवाचा एक विद्यार्थी दुसऱ्या वर्गांत होता. तो पांच वर्षें युरोपमध्यें राहून परत येत होता.

"You see, five long years" असें तो सारखा म्हणायचा! 'पांच वर्षे! पांच वर्षे!'...

मुंबईला पोंचायच्या आदल्या दिवशीं मीं लवकर उठण्यासाठीं लवकर झोपीं जाण्याची तयारी केली. म्हणजे बिछान्यावर पडलों. पण माझ्या अंतरंगाचे धागे आंत कोठें तरी विस्कटले होते. काय वाटत होतें तेंच सांगतां येत नव्हतें. झोप अशक्य झाली. दिव्याचें बटन दाबलें आणि वाचण्याचा प्रयत्न केला. अक्षरें डोळ्यांना दिसत होतीं. डोळे शब्दांवरून फिरत होते. पण मेंदूला त्याचा बोध होत नव्हता.

मी उठलो आणि डेकवर गेलो. चांदणे पडलें होतें. आरबी समुद्राचें पाणी बोटीनें कापले जात होतें, फेसाळत होते आणि त्याबरोबर जादूनें भारलेल्या चांदीसारखें चकाकत होते!

क्षितिजाकडे पाहिले. सभोवार पाणी! त्यावर चादण्याचा वर्षाव! क्षितिजावर धूसर अंधार! एकाग्र नजरेनें पाहिले म्हणजे हळुहळू कांहींच दिसेनासे होई— नुसतीं स्वप्नें दिसत.

कितीतरी वेळ असा नुसता पाहतच राहिलो.

केव्हा येऊन झोपलो माहीत नाहीं. बाराचा सुमार असावा. पण सकाळीं चारलाच जागा झालों.

खूप आनंद झाला. आतां दोन तासांत मुंबई! घाईघाईनें उठलों. गरमगरम पाण्यानें आघोळ केली. कपडे बदलेले. पावणेसहाच्या सुमाराला डेकवर आलों—

पण कांही कशाचा पत्ता नाहीं.

पूर्वेकडे तांबडें फुटले होतें. उषःकाल झाला होता. डोंगर दिसत होते. त्यांच्या कडा लाल-काळ्या-निळ्या झाल्या होत्या.

मीं मनांत म्हटलें, "भारताचं पहिलं दर्शन सूर्यदर्शनानें होणार हा काय कमी फायदा?"

माझ्या पुढें कोंकणांत, त्याचप्रमाणें महेश्वरला पाहिलेले सूर्योदय उमलूं लागले!

किनाऱ्याकडे पाहून मी सारखा म्हणूं लागलों, हा नालासोपारा असेल! हा वसईचा किनारा असेल—

पण नक्की कांहींच बोध होत नव्हता.

* * *

हळुहळू इतर लोकही उठले. बोट नवाला मुंबई बंदरांत शिरणार हें त्यांना माहीत होतें.

चहापान आटपेपर्यंत आठ वाजले. बाहेर आलों तों मुंबई आली. सँडोला उतरायचें नव्हतें. तो रिकामा होता. त्याला अगदीं वरच्या डेकवर नेलें. वेरा निकोलिचही आली. त्यांना मी मुंबई दाखवूं लागलों. हा कुलाबा ! हा गेटवे ऑफ इंडिया. हें ताजमहाल हॉटेल. ते काय बरें ? हो, तें हायकोर्ट आणि तो घुमट पोस्ट ऑफिसचा. त्या बराकी कुलाब्याच्या !

तें काय आणि ते पलीकडचें ?—सारखे प्रश्न येत होते. मी उत्तरें देत होतों. उत्तरें देतां देतां मुंबईची मला खरोखर किती कमी माहिती आहे, ह्याची जाणीव होत होती.

तरी मी सांगत होतों. उत्साहानें, आवेगानें, एक प्रकारच्या धुंद धिटाईनें सांगत होतों — ते एरॉस थिएटर !

वेरा निकोलिच एकदम म्हणाली,

" Really, your Bombay is beautiful ! "

" Of course, it is ! "

आणि खरेंच त्याक्षणीं मुंबई मला सुंदर, सुंदर वाटली !

बंदरांत शिरतांना—धक्क्यावर उतरतांना—टॅक्सी करून घरीं येतांना—काळाचौकीच्या बोळांतून येतांनाही—त्या दिवशीं मुंबई मला सुंदर वाटली !

मी मनांतल्या मनांत म्हणत होतों, " Bombay ! My Bombay ! How beautiful ! "

